## नेमिचंद्रप्रतिष्ठातिलकांतील विषयांची

# अनुक्रमणिका

—=×:※:×=—

अनुक्रमणिका समाप्त.

॥ ॐ नम सिद्धेभ्य ॥

॥ अथ श्रीनेमिचंद्रदेवविरचितं ॥

# ॥ प्रतिष्ठातिलकम् ॥

श्रीमत्त्रिलोकीतिलकं जिनेन्द्रं । स्वात्मप्रतिष्ठं सकलप्रतिष्ठम् ॥
नत्त्वा प्रतिष्ठातिलकं प्रवक्ष्ये । संगृह्य सारं जिनसंहितानाम् ॥ १ ॥
इन्द्रनन्द्यादियोगीन्द्रप्रतिष्ठाशास्त्रसंग्रहात् । पूर्वाचार्यप्रणीतं स्यादिदं तेन प्रमाण्यताम् ॥ २ ॥
इदं प्रतिष्ठाशास्त्रौघप्रधानमिति युज्यते । तत्सारसंग्रहात्मत्वाद्गन्धानां गधयोगवत् ॥ ३ ॥

---

१ अंतरंग लक्ष्मी ( अनंत ज्ञान, अनंत दर्शन, अनंत सौख्य व अनंत वीर्य ) व बहिरंग लक्ष्मी ( अष्ट महाप्रातिहार्य, चौतीस अतिशय वगैरे ) या दोन लक्ष्मींनीं श्रीजिनेश्वर युक्त आहेत. ते त्रैलोक्याचें भूषण आहेत. जरी ते आपल्या आत्मस्वरूपामध्येंच असतात तथापि त्यांचें ज्ञान लोक व अलोकाला जाणतें ह्मणून त्यांना सकलप्रतिष्ठ अर्थात् सर्वव्यापक असें ह्मणतात. अशा श्री जिनेन्द्र भगवंतास भक्तीनें नमस्कार करून मी ( नेमिचंद्रदेव ) प्रतिष्ठातिलक नांवाचा ग्रंथ सांगतो. हा ग्रंथ मी अनेक जिन संहितांचा ( अनेक पूर्वाचार्यांनीं केलेल्या प्रतिष्ठापाठ ग्रंथांचा ) सार घेऊन रचणार आहे.

२ हा प्रतिष्ठातिलक नांवाचा ग्रंथ मी इंद्रनंदि, वसुनंदि, आशाधर वगैरे अनेक आचार्यांनीं लिहिलेल्या प्रतिष्ठा–शास्त्रांचा संग्रह करून लिहिला आहे अर्थात् मी माझ्या कल्पनेनें लिहिलेला नाहीं. यांला पूर्वाचार्यांच्या प्रतिष्ठाशास्त्रांचा पाठिंबा आहे यास्तव हा माझा ग्रंथ पूर्वाचार्यप्रणीत आहे असें समजून यास विद्वानांनीं प्रमाण मानावें.

३ सब प्रतिष्ठाशास्त्रांच्या सारभागांचा संग्रह करून हा ग्रंथ मी बनविला आहे यास्तव सर्व सु-

प्रतिष्ठानां प्रधानत्वात् प्रतिष्ठातिलकं मतम् । प्रतिष्ठा स्थापना न्यासो जिनादेः प्रतिमादिषु ॥ ४ ॥
व्यासमध्यमसंक्षेपभेदतः सा त्रिधा मता । तत्र व्यासप्रतिष्ठा तु पूर्वमत्राभिधीयते ॥ ५ ॥
प्रतिष्ठा मध्यमा पश्चात्संक्षिप्ता सा ततः परम् । सिद्धादीनां प्रतिष्ठातस्तत उत्सवसंविधिः ॥ ६ ॥
तत्र व्यासप्रतिष्ठा सा पंचकल्याणलक्षणा । वक्ष्यतेऽद्य प्रपंचेन प्रयोगैर्लक्षणान्वितैः ॥ ७ ॥
प्रतिष्ठादिवसात्पूर्वं दशमे दिवसे दिवा । नांदीनामांतरं शक्रप्रतिष्ठाविधिमाचरेत् ॥ ८ ॥

---

गंधि पदार्थ एकत्र करून त्यांचा काढलेला अर्क जसा अतिशय सुगंध असतो व त्याला जसें मुख्यत्व दिलें जातें त्याप्रमाणें हा ग्रंथ सर्व प्रतिष्ठाशास्त्रामध्यें मुख्य मानला जातो.

४ या ग्रंथामध्यें सर्व प्रतिष्ठांचें वर्णन विशदपणें मुख्यत्वानें केलें आहे यास्तव यास प्रतिष्ठातिलक हें नांव पडलें आहे प्रतिष्ठा ह्मणजे अरहंत, सिद्ध, आचार्य, उपाध्याय, सर्व साधु, श्रुतदेवता, श्रुतस्कंधादि, यक्षयक्षी वगैरेंच्या प्रतिमा व सुवर्ण तांबे वगैरे धातूचीं बनविलेलीं यंत्रें यामध्यें स्थापना करणें यास प्रतिष्ठा असें नांव आहे.

५ या प्रतिष्ठेचे व्यास ( विस्ताराची ) मध्यम व संक्षिप्त असे तीन भेद आहेत प्रथमत आह्मी व्यास प्रतिष्ठेचें या ग्रथांत वर्णन करितों.

६ तदनतर मध्यमप्रतिष्ठेचें आणि संक्षिप्तप्रतिष्ठेचें वर्णन करू. आणि शेवटीं सिद्ध, आचार्य ( उपाध्याय व सर्व साधु याचा आचार्य प्रतिष्ठेमध्यें अतर्भाव आहे ) श्रुतदेवता, श्रुतस्कंधादि यंत्र यक्षयक्षी यांच्या प्रतिष्ठेचें वर्णन करूं. तदनंतर उत्सव विधीचें वर्णन करूं.

७ व्यास प्रतिष्ठा ह्मणजे पंचकल्याणिक विधि जिच्यांत केला जातो–ती हिचें प्रथमतः लक्षणसहित अशा प्रयोगांनीं सविस्तर वर्णन करितो.

८ प्रतिष्ठेच्या दिवसापासून मागील दहाव्या दिवशीं दिवसा नांदी हें दुसरें नांव ज्याला आहे असा इंद्रप्रतिष्ठेचा विधि करावा

प्रतिष्ठादिवसात्पूर्वं नवमे दिवसे निशि । वक्ष्यमाणेन विधिना विदध्यादंकुरार्पणम् ॥ ९ ॥
ततः प्रभृति कुर्वन्तु शांतिहोमविधिं बुधाः । दातृसंघनृपादीनां विश्वविघ्नोपशान्तये ॥ १० ॥
द्वितीयेऽन्हि ततः कुर्यान्मंडपानां प्रसाधनम् । वास्तुदेवबलिं कृत्वा लघुशांतिकपूर्वकम् ॥ ११ ॥
वेदीनिर्वर्तनं कुर्यात्तृतीये दिवसे ततः । सपंचकुंभविन्यासं सवास्तु बालिकर्म च ॥ १२ ॥
अंकुरार्पणतस्तुर्ये नवमे तीर्थतः पुरा । दिवसे विधिवत्कुर्याद् ध्वजारोहणसंविधिम् ॥ १३ ॥
तस्मिन्नेव दिने रात्रौ भेरीताडनमाचरेत् । पंचमेऽह्नि ततः कुर्याज्जलयात्रामहोत्सवम् ॥१४॥
गर्भावतारकल्याणं ततः पष्ठे दिने निशि । निर्वर्तयेन्महायंत्रसमाराधनपूर्वकम् ॥ १५ ॥

---

९ प्रतिष्ठेच्या दिवसाच्या पूर्वी नवव्या दिवशी रात्रीं अकुरार्पण विधि करावा. हा विधि कसा करावा हें आह्मी पुढें सविस्तर वर्णन करणार आहोंत.

१० अंकुरार्पण विधि झाल्यानंतर दररोज बुद्धिमान पुरुषांनीं शांति होमविधि करावा. हा विधि करण्याचा उद्देश दाता ( यजमान ) संघ ( श्रावक, श्राविका, आर्यिका व मुनि ) राजा वगैरेंचीं सर्व विघ्नें शांत व्हावींत हा आहे.

११ अंकुरार्पण विधि केल्यानंतर दुसरें दिवशी मंडप सुशोभित करावा. अर्थात् आंब्याचें तोरण-वगैरे बांधून मंडपाला शोभा आणावी. त्या दिवशीं लघु शांतिहोम करून वास्तुदेवबलिविधान करावें.

१२ तदनंतर तिसरे दिवशी वेदि निर्माण करावी; पांच कुंभांची स्थापना करावी; व वास्तु बलि क्रिया करावी

१३ अंकुरार्पण विधि झाल्यानंतर चवथ्या दिवशी दिवसा प्रतिष्ठाशास्त्रांत सांगितलेल्या विधीस अनुसरून ध्वजा चढविण्याचा विधि करावा.

१४ त्याच दिवशी रात्रीं भेरी ताडन विधि करावा. तदनंतर पांचव्या दिवशीं जलयात्रामहोत्सवाचा विधि करावा

१५ तदनंतर सहाव्या दिवशीं रात्री महायंत्रसमाराधनविधि करून मग गर्भावतार कल्याणिक विधि करावा.

जन्माभिषेककल्याणं सप्तमे दिवसे दिवा । दीक्षाग्रहणकल्याणमष्टमे दिवसेऽह्नि ॥ १६ ॥
केवलज्ञानकल्याणं नवमे दिवसे ततः । कुर्यात्प्राण्हेऽपराण्हे तु देवं पुरि विहारयेत् ॥ ७१ ॥
प्रतिष्ठातो द्वितीयेऽन्हि दिवा वासंतमुत्सवम् । वितन्वन्भव्यसंदोहो देवं पुरि विहारयेत् ॥ १८ ॥
तृतीयेऽन्हि ततः कुर्वन्सुगंधिसलिलोक्षणं । देवं विहारयेत्पुर्यां चतुर्थे दिवसे ततः ॥ १९ ॥
प्रातरेव हि निर्वाणकल्याणविधिमाचरेत् । ततः पूर्ववदानीततीर्थवार्भिर्महोत्सवात् ॥ २० ॥
विधायावभृतस्नानं एकादशमहं विभोः । कृत्वा संघं च संतर्प्य यथाशक्ति यथोचितम् ॥ २१ ॥
अवरोह्य ध्वजं रात्रौ धामाग्रे विनिवेशयेत् । निष्ठापितप्रातिष्ठं तं यष्टेन्द्रं बहु मानयेत् ॥ २२ ॥

---

१६ सातव्या दिवशीं दिवसा जन्माभिषेक कल्याणिक हा विधि करावा. आठव्या दिवशीं दिवसा दीक्षाग्रहण कल्याणिक हा विधि करावा.

१७ नवव्या दिवशीं प्रात:कालीं केवलज्ञान कल्याणिक हा विधि करावा व मध्यान्हसमयीं श्री जिनेश्वराचा शहरांतून विहार करवावा

१८ तिसऱ्या दिवशीं श्रीजिनेश्वराचा सुगंधजलानें अभिषेक करावा व चौथ्या दिवशीं श्रीजिनाचा विहार करवावा.

२०–२१ प्रातःकालींच निर्वाणकल्याणविधि करावा. तदनंतर पूर्वीप्रमाणें आणिलेल्या तीर्थजलांनीं एकादशमहाविधि ( एकादशविध कुम्भन्यास विधि करावा ) अर्थात् श्री जिनेश्वराला अकरा कुंभाच्या पाण्यानें अवभृतस्नान घालावें तदनंतर आपल्या शक्त्यनुसार व संघाच्या योग्यतेला अनुसरून चतुर्विध संघाला सतुष्ट करावें

२२—२३ तदनन्तर रात्रीं ध्वज खालीं काढून घेऊन मग तो जिनमन्दिराच्या शिखरावर स्थापन

सत्कृत्य शक्त्या भव्यास्तं सर्वे यांतु यथायथम् । प्रतिष्ठाया विधिः सोयं प्रोक्तव्यः स विवक्षया ॥२३॥

॥ तत्तत्कर्मविशेषस्तु प्रयोगे प्रतिपाद्यते ॥

। इत्यनुक्रमः ।



करावा. याप्रमाणें सांगोपांग प्रतिष्ठा ज्यानें पूर्ण केली अशा इंद्राचा यजमानानें पुष्कळ आदर सत्कार करावा. सर्व भव्यांनीं इंद्राचा यजमानाचा शक्त्यनुसार सत्कार करून आपआपल्या स्थानीं निघून जावें हा प्रतिष्ठेचा विधि सांगितला या प्रतिष्ठेमध्यें जीं विशेषकार्यें करावीं लागतात त्यांचें वर्णन प्रयोगांच्या प्रकरणामध्यें सांगू.

। या प्रमाणें अनुक्रमणिका संपली ।



## २ अथ तावदिंद्रप्रतिष्ठा [ तद्यथा—



अथ यष्टा प्रतिष्ठार्थं लग्नं निश्चित्य पौर्तिकः । प्रागतो दशमेऽन्हीन्द्रं सुलग्ने स्वगृहं नयेत् ॥१॥
विधृताक्षतपात्रोद्धस्त्रीपु यान्तीपु चाग्रतः । साधर्मिकान्वितो गत्त्वा स पुरंदरमांदिरम् ॥ २ ॥
दत्त्वा फलं समुचितं नत्वा विज्ञापयेदिदम् । हंहो श्रीपूजकाचार्य प्रसीद शृणु मद्वचः ॥ ३ ॥
सर्वाभ्युदयानिःश्रेयसार्थासिद्धिनिबधनम् । नित्यं नित्यमहं कर्तुं निर्माप्य जिनमंदिरम् ॥ ४ ॥
प्रतिष्ठापयितुं तत्र जिनबिंबमिहोत्सहे । समीहितामिदं सद्यः साधु साधयितुं मम ॥ ५ ॥
प्रसीद धर्मवात्सल्याज्जिनयज्ञविशारद । त्वत्सहायादयं धर्मो नूनं सिध्यति मेऽन्यथा ॥ ६ ॥

### २ इंद्रप्रतिष्ठा.

---

१ प्रतिष्ठेच्या दिवसापासून मागील दहाव्या दिवशी चांगलें लग्न पाहून यजमानानें इंद्राला आपल्या घरीं प्रतिष्ठा करण्याकरिता न्यावें. प्रतिष्ठेला प्रारंभ करण्यापूर्वी यजमानानें प्रतिष्ठा करण्याकरितां चांगल्या लग्नाचा—व मुहूर्ताचा निश्चय करून ठेवावा

२—३ ज्यांच्या हातात अक्षतांचें पात्र आहे व ज्यानीं शृंगार केला आहे अशा सुवासिनी स्त्रियाना पुढें करून व बरोबर काहीं धार्मिक लोकाना घेऊन यजमानानें इंद्राच्या घरी जावें. तेथें त्याला योग्य फल देऊन आणि नमस्कार करून अशा रीतीनें प्रार्थना करावी.

४—६ हे पूजकाचार्या ( इंद्र ) मेहरबानी करून माझें भाषण ऐका. स्वर्गादिसुखांची व मोक्षसुखाची प्राप्ति करून देण्यास कारण असा नित्यमहोत्सव ( नित्य पूजा ) करावा म्हणून मी जिन-

क्व चेन्द्रसाध्ययज्ञोऽयं क्व चाहं क्षुल्लको जनः । किमत्र बहुनोक्तेन प्रतिष्ठाविधिसाधनात् ॥७॥
धर्मं संपाद्य मामद्य कृतार्थय कृपापर । इत्युक्त्वा प्रणिपत्यांघ्रौ प्रार्थयेत सहायताम् ॥ ८ ॥
अथांगीकृतकार्यं तं भूत्वा नीत्वा स्वमंदिरम् । चतुष्के तत्र रचिते कोणदीपचतुष्कके ॥ ९ ॥
विष्टरे रक्तवस्त्रेणाच्छादिते विनिवेश्य तम् । मंगलातोद्यसध्वाने सति रक्तप्रसाधनाः ॥ १० ॥
सुवासिन्यश्चतस्रोऽस्य वर्द्धयंतु सुचंदनम् । आशीर्मगलपाठेषु पीतोद्वर्तनपूर्वकम् ॥ ११ ॥

---

मंदिर बांधविलें आहे. व त्या जिनमंदिरामध्ये जिनेश्वराच्या प्रतिबिंबाची प्रतिष्ठा करण्याचा माझ्या मनात उत्साह उत्पन्न झाला आहे. आपण जिनपूजा करण्यामध्यें प्रवीण आहात व आपल्या ठिकाणीं धर्मप्रेम जागृत आहे यामुळें कृपा करून माझें हें प्रतिष्ठेचें कार्य उत्तम रीतीनें आपण पार पाडाल अशी आशा आहे. माझें हें धार्मिक कार्य आपल्या साहायानें पार पडेल. आपलें साहाय झालें नाहीं तर पार पडणार नाहीं.

७—८ सौधर्म इंद्राकडून साध्य होणारा हा महोत्सव कोणीकडे व मी क्षुद्र मनुष्य कोणीकडे; असो. आता मी जास्ती बोलत नाहीं. हे दयाळू प्रतिष्ठाचार्य, हा प्रतिष्ठेचा विधि योग्य रीतीनें सारून मला धर्म संपादन करून द्या व मला कृतार्थ करा. असें बोलून प्रतिष्ठाचार्यांच्या पाया पडून त्याच्या मदतीची प्रार्थना करावी.

९—११ प्रतिष्ठाचार्यानें यजमानाच्या विनतीचा स्वीकार करून त्याचें कार्य करण्याचें कबूल करावें. मग यजमानानें मोठ्या थाटानें त्याला आपल्या घरीं न्यावें. तेथें एक चौक रचावा त्याच्या चार कोपऱ्यांत चार दिवे ठेवावेत त्या चौकाच्या मध्यभागीं एक आसन ठेवावें व तें तांबड्या वस्त्रानें अच्छादावें आणि त्यावर प्रतिष्ठाचार्याला बसवावें. मंगल वाद्यें वाजवावींत व तांबडें वस्त्र नेसलेल्या चार सुवासिनी स्त्रियांनीं त्याच्या अंगाला पिवळी उटी लावावी व चंदन लावावें आशीर्वादयुक्त अशीं मंगल गाणीं इतर सुवासिनी स्त्रियांनीं म्हणावींत

आरोप्य तैलं तत्पीतखल्यापोह्य सुखाम्बुभिः । आसिच्यापादयेद्भूषावस्त्रस्रक्चंदनार्पणम् ॥ १२ ॥
अथांतरीयकं सोत्तरीयं धृत्वा समाहितः । आचम्य प्रोक्ष्य दत्वार्घ्यं तर्पणं चापराजितं ॥ १३ ॥
अष्टोत्तरं शतं जप्त्वा धृत्वा श्रीचंदनादिकम् । इंद्रो गजेन्द्रमारुह्य सप्रतीन्द्रो जिनालयम् ॥ १४ ॥
गत्वा ततोवतीर्यारात्प्रविश्य जिनपुंगवम् । दर्शनस्तोत्रपाठेन त्रिः परीत्य त्रिधानतः ॥ १५ ॥
पूजामुखं विधायातः स्नपनक्रमतो जिनम् । अभ्यर्च्य धृत्वा गंधांबु पीठयंत्रं समर्च्य च ॥ १६ ॥
चैत्यादिभक्तिभिः स्तुत्वा देवं शेषं समुद्वहन् । धर्माचार्यं समभ्यर्च्य नत्वा विज्ञापयेदिदम् ॥ १७ ॥
ऐदंयुगीनाखिलशास्त्रदृष्टे त्वंपं चभेदाचरणैकतान ।आचार्यवर्यागमदेशितां नो निरूपयौपासककार्यपूजाम् ।

---

१२ तदनंतर तेलानें चोळून ती लाविलेली उटी काढून टाकावी. व सुखकर अशा पाण्यानें स्नान घालावें आणि अलंकार, वस्त्र, पुष्पमाला व चंदन अर्पण करावें.

१३-१७ तदनतर नेसण्याचें व पांघरण्याचें वस्त्र हीं धारण करून व मन एकाग्र करून आचमन करावें, प्रोक्षण करून अर्घ्य द्यावें व तर्पण करावें आणि १०८ वेळ अपराजितमंत्राचा जप करून चंदनाचा तिलक, पुष्पमाला वगैरे धारण करून प्रतीन्द्रासहित हत्तीवर बसून जिनालयाकडे जाण्यास इंद्रानें निघावें.

जिनालय जवळ आल्यावर इंद्रानें हत्तीवरून खालीं उतरावें आणि जिनमंदिरांत प्रवेश करावा. दर्शनस्तोत्र ह्मणत ह्मणत जिनमंदिराला तीन प्रदक्षिणा द्याव्यात. व श्रीजिनेशाला तीनदा नमस्कार करावा. तदनंतर पूजेच्या प्रारंभीचें कृत्य करून ह्मणजे आवाहन, स्थापन, सन्निधीकरण हें करून व अभिषेकाच्या क्रमास अनुसरून जिनेश्वराची अभिषेकक्रिया करावी. गंधोदक धारण करावें. पीठयंत्राची पूजा करावी. तदनंतर चैत्यभक्ति वगैरे भक्ति ह्मणून जिनेन्द्राची स्तुति करावी आणि शेषा धारण करावी तदनंतर धर्माचार्यांकडे जाऊन त्यांची पूजा करावी व नमस्कार करावा व पूर्वी लिहिल्याप्रमाणें प्रार्थना करावी.

१८ हे आचार्य ! कुंदकुंदादिक जे अर्वाचीन आचार्य झाले त्यांनीं लिहून ठेवलेलीं जीं शास्त्रें हींच

यष्टृयाजकयोर्लक्ष्म यज्ञदीक्षोचितं व्रतम् । भवतः श्रोतुमिच्छामि भगवन् भव्यबांधव ॥ १९ ॥
त्वत्प्रासादात्प्रबुध्यार्हत्पूजादेर्लक्षणं स्फुटम् । जिनप्रतिष्ठामिच्छामः कर्तुमेतेऽद्य बालिशाः॥ २० ॥
इति विज्ञापना श्रुत्वा कृपाचोदितमानसः । गंभीरमधुरोदारगिरा सूरिरिदं वदेत् ॥ २१ ॥
प्राक्कार्या धार्मिकैरिज्या सा चतुर्धा सदार्चनम् । चतुर्मुखमहः कल्पद्रुमश्चाष्टाह्निकोऽपि च ॥ २२ ॥
तत्र नित्यमहो नाम शश्वज्जिनगृहं प्रति । स्वगृहान्नीयमानार्चा गंधपुष्पाक्षतादिका ॥ २३ ॥
चैत्यचैत्यालयादीनां भक्त्या निर्मापण च यत् । शासनीकृत्य दानं च ग्रामादीनां सदार्चनम् ॥२४॥
या च पूजा नरेंद्राणां नित्यदानानुषंगिणी । स च नित्यमहो ज्ञेयो यथाशक्त्युपलक्षितः ॥ २५ ॥

---

आपणास नेत्रस्वरूप आहेत. आपण पांच तऱ्हेचा आचार पाळण्यांत निमग्न असता यास्तव श्रावकाचारामध्यें जिचें वर्णन केलें आहे अशा श्रावकानें करण्यायोग्य पूजेचें आम्हास स्वरूप सांगा

१९ - २० हे भगवन् आपण सर्व भव्य जीवाचे अकारण मित्र आहात यास्तव यजमान व प्रतिष्ठाचार्य या उभयतांचें लक्षण व हा प्रतिष्ठाविधि करण्याकरिता जी यज्ञदीक्षा या उभयतांना घ्यावी लागते ती यांनी घेतली असतां यांना कोणतीं व्रतें पाळावीं लागतात याचा खुलासा आपणापासून ऐकावा असें मला वाटतें आचार्य महाराज, आपल्या कृपेनें आम्ही नित्यपूजा, चतुर्मुख वगैरे पूजांचें स्वरूप नीट समजून घेऊन मदबुद्धीचे आम्ही जिनप्रतिष्ठा करण्याची इच्छा करीत आहोत.

२१ याप्रमाणें इंद्रानें प्रार्थना केल्यावर ती ऐकून ज्यांच्या मनात कृपा उत्पन्न झाली आहे अशा आचार्यांनी गंभीर कर्णमधुर व स्पष्ट अशा भाषणानें पुढील वर्णन करावें.

२२ कोणत्याही शुभकार्याच्या प्रारंभीं धार्मिक पुरुषांनीं जिनपूजन केलें पाहिजे. पूजनाचे चार भेद आहेत. सदार्चन [ नित्यपूजा ] चतुर्मुखमह, कल्पद्रुम व अष्टान्हिक

२३-२५ दररोज गंध, पुष्प, अक्षता वगैरे पूजनाची सामग्री आपल्या घरांतून घेऊन श्रीजिनम-

महामुकुटबद्धैस्तु क्रियमाणो-महामहः । चतुर्मुखः स विज्ञेयः सर्वतोभद्र इत्यपि ॥ २६ ॥
दत्वा किमिच्छकं दानं सम्राड्भिर्यः प्रवर्त्यते । कल्पद्रुममहः सोऽयं जगदाशाप्रपूरणः ॥ २७ ॥
अष्टान्हिको महः सार्वजनिको रूढ एव सः । महानैन्द्रध्वजोऽन्यस्तु सुरराजैः कृतो महः॥ २८ ॥
बलिस्नपनमित्यन्यत्रिसंध्यासेवया समम् । उक्तेष्वेव विकल्पेषु ज्ञेयमन्यच्च तादृशम् ॥ २९ ॥
एवंविधिविधानेन या महेज्या जिनेशिनाम् । विधिज्ञास्तामुशन्तीज्यां वृत्तिं प्राथमकल्पिकीम् ॥३०॥

---

दिशामध्यें जाणें व तेथें जिनेश्वराची पूजा करणें यास नित्यमह असें ह्मणतात. मोठ्या भक्तीनें जिनबिंब व जिनमंदिर वगैरे नवीन बांधविणें व त्या ठिकाणीं नेहमी जिनपूजा चालावी ह्मणून गांव शेत वगैरे देऊन नेहमी तो पूजा चालविणें यासही नित्यमह ह्मणतात. आपल्या शक्तीस अनुसरून मुनीश्वराची पूजा करून त्यांना आहारादि दान देणें हाही नित्यमहच होय.

२६ राजचिन्ह अशा मुकुटाला धारण करणाऱ्या राजाकडून जो महोत्सव केला जातो त्यास—चतुर्मुख असें नाव आहे यालाच सर्वतोभद्र असेंहि नाव आहे.

२७ याचक लोकांना 'तुह्मास काय पाहिजे' असें विचारून त्यांना इष्ट असलेल्या वस्तु देऊन चक्रवर्ती राजाकडून जो महोत्सव केला जातो तो साऱ्या जगाच्या इच्छा पूर्ण करणारा असल्यानें 'कल्पद्रुम मह' होय.

२८ अष्टान्हिक महोत्सव हा प्रसिद्ध आहे. व हा सर्व धार्मिक मिळून करीत असतात हाच उत्सव मोठ्या थाटानें देवेन्द्रही करीत असतात यास्तव याला इन्द्रध्वज असें नांव आहे.

२९ बलि अर्पण करणें, अभिषेक करणें, त्रिकाल जिनपूजन करणें यांचा वर सांगितलेल्या पूजाभेदामध्येंच अन्तर्भाव करावा. याहून दुसरे जे कांही उत्सव असतील त्यांचाही पूर्वोक्त उत्सवभेदांतच अन्तर्भाव होतो

३० या वर सांगितलेल्या प्रकाराप्रमाणें जिनेश्वरांची जी पूजा केली जाते, जिनपूजनविधि जाणणारे

अतो नित्यमहोद्युक्तैर्निर्माप्यं सुकृतार्थिभिः । जिनचैत्यगृहं जीर्णमुद्धार्यं च विशेषतः ॥ ३१ ।
जिनयज्ञं करिष्याम इत्यध्यवसिताः किल । जित्वा दिशो जिनानिष्ट्वा निर्वृता भरतादयः ॥३२ ॥

इति इज्यास्वरूपोपदेश ॥

देशजातिकुलाचारैः श्रेष्ठो दक्षः सुलक्षणः । त्यागी वाग्मी शुचिः शुद्धसम्यक्त्वः सद्व्रतो युवा ।३३॥
श्रावकाध्ययनज्योतिर्वास्तुशास्त्रपुराणवित् । निश्चयव्यवहारज्ञः प्रतिष्ठाविधिवित्प्रभुः ॥ ३४ ॥
विनीतः सुभगो मंदकषायो विजितेन्द्रियः । जिनेज्यादिक्रियानिष्ठो भूरिसत्वार्थबांधवः ॥ ३५ ॥
दृष्टसृष्टक्रियो वार्तः संपूर्णांगः परार्थकृत् । वर्णी गृही वा सद्वृत्तिरशूद्रो याजको ध्रुराट् ॥ ३६॥

---

लोक, तिला 'इज्या' असें म्हणतात पूजन करणें हें षट्कर्मापैकीं मुख्य कर्म आहे.

३१ यास्तव नित्यमह करण्यास उद्युक्त झालेल्या व पुण्य प्राप्त करून घेण्याची इच्छा करणाऱ्या धार्मिक लोकांनीं जिनमंदिर निर्माण करावें व विशेष रीतीनें जीर्ण जिनमंदिराचा उद्धार करावा.

३२ जिनेश्वरांची पूजा आम्ही अवश्य करू असा ज्यांनीं निश्चय केला होता असे भरत, सगर वगैरे महात्मे सर्व पृथ्वी जिंकून व जिनेश्वरांची पूजा करून मोक्षास गेले.

हा पूजेच्या स्वरूपाचा उपदेश संपला.

३३-३६ प्रतिष्ठाचार्यांच्या अंगीं पुढें लिहिल्याप्रमाणें गुण असावेत तो देश, जाति, कुल व आचार यांनीं श्रेष्ठ, इंगितज्ञ व सामुद्रिक शास्त्रांत सांगितलेल्या शुभलक्षणांनीं युक्त असावा. तो दानी, वक्ता, पवित्र, निर्मळ सम्यक्त्वाचा, व्रतें निर्दोष पाळणारा, व तरुण असा असावा. श्रावकाचार, ज्योतिष, शिल्पशास्त्र व प्रथमानुयोगांचीं शास्त्रें अर्थात् त्रिषष्टि महापुरुषांचीं चरित्रें यांना जाणणारा, निश्चय व्यवहार व या दोन नयांचें स्वरूप जाणणारा, प्रतिष्ठेचा सगळा विधी ज्याला अवगत आहे असा व तेजस्वी असा असावा. तो

गुणिनोप्यगुणे व्यर्था गुणवत्यगुणा अपि । याजकेन्द्रे कृतार्थाः स्युस्तन्मृग्योऽसौ स्फुरद्गुणः ॥ ३७॥
आयुष्मंस्त्वयि वर्तंते प्रोक्ता याजकसद्गुणाः । जिनाग्रयाजकतया सौधर्मेन्द्रोऽसि सोऽधुना ॥ ३८ ॥
इत्युच्चैर्वदता दत्तान्समंत्रान्गुरुणाक्षतान् । स्वीकृत्याञ्जलिनोपांशु मंत्रमुच्चार्य नामितं ॥ ३९ ॥
स्वमूर्ध्नि विन्यसेत्सोहं सौधर्मेन्द्र इति ब्रुवन् । ॐ ह्रीं अर्हं अ सि आ उ सा णमो अरहंताणं अनाहतपराक्रमस्ते भवतु भवतु ह्रीं नमः स्वाहा । एष मंत्रो गुरुणा प्रयोज्यः । उत्तरेण पुनरनेन ते स्थाने मे इति प्रयोज्यम् ॥ ४० ॥

इति इन्द्रस्थापनम् ॥

नम्र, सुंदर, अर्थात् सर्वप्रिय, मंदकषायी, जितेंद्रिय, निस्पृह, दान पूजा वगैरे क्रिया करण्यामध्यें तत्पर, धीर धनवान, कुटुंबवत्सल असा असावा. ज्यानें पुष्कळ प्रतिष्ठा पाहिलेल्या आहेत व केल्या आहेत असा, गुरु उपदेशानुसार क्रिया करणारा, सर्व अवयव परिपूर्ण, परोपकारी, असा असावा. तो ब्रह्मचारी अथवा गृहस्थ, सदाचारी, तीन वर्णांपैकीं कोणत्याही वर्णाचा असा असावा परंतु तो शूद्र नसावा. या गुणांचा प्रतिष्ठाचार्य असावा. यालाच इंद्र म्हणतात.

३७ वर सांगितलेल्या गुणांनीं प्रतिष्ठाचार्य जर युक्त नसेल तर यजमान व इन्द्र वगैरे मंडळी गुणवान असली तरी व्यर्थ आहे. व प्रतिष्ठाचार्य गुणहीन असला; मग इतर मंडळी गुणरहित असली तरी गुणी प्रतिष्ठाचार्याच्या योगानें ते सर्व योग्य मानले जातात. यास्तव प्रतिष्ठाचार्य उज्ज्वल गुणांचा असावा व प्रतिष्ठा करण्याकरितां अशा प्रतिष्ठाचार्याचा शोध करावा.

३८ ३९ हे आयुष्मन तुझ्या ठिकाणीं प्रतिष्ठाचार्योक्त पूर्वोक्त गुण आहेत, तूं जिनेश्वराचा पूजकाग्रणी आहेस यास्तव सध्या तूं सौधर्मेन्द्र आहेस असें मोठ्यानें बोलून आचार्यांनीं मंत्र उच्चारण करून दिलेल्या अक्षतांचा आपल्या ओंजळीनें स्वीकार करून व जो मंत्र आचार्यांनीं दिला होता तो मनामध्यें म्हणून आपलें मस्तक नम्र करावें. आणि मी सौधर्मेन्द्र आहे असें बोलून त्या अक्षता आपल्या मस्तकावर धारण कराव्यात.

४० ' ॐ ह्रीं अर्हं अ सि आ उ सा णमो अरिहंताणं अनाहतपराक्रमस्ते भवतु भवतु ह्रीं नमः स्वाहा ' हा

पाक्षिकाचारसंपन्नो धीसंपद्बन्धुबन्धुरः । राजमान्यो वदान्यश्च यजमानो मतः प्रभुः ॥ ४१ ॥
आयुष्मंस्त्वयि वर्तंते यजमानगुणा अमी । यज्ञेऽस्मिन्यजमानत्वं साधु मन्यामहे त्वयि ॥ ४२ ॥
इत्युच्चैर्वदता दत्तान्समंत्रान्गुरुणाक्षतान् । स्वीकृत्यांजलिनोपांशु मंत्रमुच्चार्य नामिते ॥ ४३ ॥
स्वमूर्ध्नि विन्यसेद्यज्ञे दीक्षितोऽहमिति ब्रुवन् । ॐ ह्रीं अर्हं अ सि आ उ सा णमो अरिहंताणं अनाहतपराक्रमस्ते भवतु भवतु ह्रीं नमः स्वाहा । एष मंत्रो गुरुणा प्रयोज्यः । यष्ट्रा पुनरत्रैव ते-स्थाने मे इति प्रयोज्यम् ।

इति यजमानस्थापनम् ॥

---

मंत्र आचार्यांनीं ह्मणावा व इंद्राला अक्षता द्याव्यात. व इंद्रानेंहि हा मंत्र मनांत ह्मणावा परतु मंत्रांतील 'ते' या शब्दाच्या ऐवजीं 'मे' हा शब्द त्यानें ह्मणावा.

या प्रमाणें हा इंद्रस्थापनविधि झाला.

यजमानाचें स्वरूप.

४१ यजमान हा श्रावकाचा धर्म जो एकदेश हिंसेचा त्याग करणें याचें पालन करितो अर्थात् अहिंसादि पांच अणुव्रतें पाळण्याचा अभ्यास करतो व प्रतिष्ठा करणें, तीर्थयात्रा करणें इत्यादिक पाक्षिकाचे आचार पाळीत असतो. तो बुद्धिमान्, संपत्तिमान् व बंधुजनांनीं युक्त असा असावा. राजाकडून ज्याचा मान होतो असा, दानी व प्रभु असा असावा

४२-४३ हे आयुष्मन् तुझ्या ठिकाणीं यजमानाचे पूर्वोक्त गुण आहेत. या प्रतिष्ठेमध्यें तुझा यजमानपणा आह्माला मान्य आहे. असें मोठ्यानें बोलून आचार्यांनीं मंत्र उच्चारण करून दिलेल्या अक्षतांचा आपल्या ओंजळीनें स्वीकार करून व जो मंत्र आचार्यांनीं दिला होता तो मनामध्यें ह्मणून आपलें म-

अथ याजकयजमानयोर्यज्ञदीक्षोचितव्रतादिविधेरुपदेशः ।
प्रतिपद्येत चातीर्थात्सैकभक्तं सुनिर्मलं ॥४४ ॥
ब्रह्मचर्यं विविक्ते च स्वप्यात्सद्भावनारतः । शलाकापुरुषाख्यानध्यानस्वाध्यायभाग्भवेत् ॥ ४५ ॥
परमेष्ठिश्रुतगुरूनेव वंदेत वर्जयेत् । साधर्मिकसजातीयैरपि पंक्ति च भोजने ॥ ४६ ॥
तदा प्रभृति यष्टापि ब्रह्मयाजकवच्चरेत् । आयज्ञांतं विशेषेण तदाज्ञां न च लंघयेत् ॥ ४७ ॥
प्रतिष्ठासूचकैर्लेखैः संघं देशांतरादपि । आकारयेद् व्रजेद् द्रष्टुं तां संघोऽपि यथाबलम् ॥ ४८ ॥
वेदीनिवेशादारभ्य यावद्यज्ञान्तमात्मवान् । धर्मकारी गुणौचित्यकृपादानपरो भवेत् ॥ ४९॥

---

स्तक नम्र करावें व मी या प्रतिष्ठेमध्यें दीक्षित झालों आहे अर्थात् यजमानाची दीक्षा घेतली आहे असें बोलून आचार्यांनीं दिलेल्या अक्षता आपल्या मस्तकावर धारण कराव्यात.

* हा मंत्र म्हणून आचार्यांनीं यजमानाला अक्षता द्याव्यात. यजमानानें हा मंत्र मनांत म्हणावा परंतु त्यानें मंत्रातील 'ते' या शब्दाच्या ऐवजीं 'मे' हा शब्द म्हणावा

४४-४६ प्रतिष्ठा समाप्तीपर्यंत इंद्रानें एकदां भोजन करावें. व निर्मल ब्रह्मचर्य धारण करावें व शुभ भावनामध्यें निमग्न राहून एकांतीं निजावें. त्यानें त्रेसष्टशलाका पुण्य पुरुषांच्या चरितांचें वर्णन, त्याचें ध्यान, स्वाध्याय यामध्यें तत्पर रहावें; पंचपरमेष्टि, शास्त्र व गुरु यांनाच त्यानें वंदन करावें, साधर्मिक असे जे सजातीय लोक असतील त्यांच्याशीं त्यानें पंक्तिभोजन करूं नये.

४७-४९ यजमानानें देखिल प्रतिष्ठाचार्याप्रमाणें ब्रह्मचर्य धारण करावें, व प्रतिष्ठासमाप्तिपर्यंत त्यानें इंद्राची आज्ञा मोडूं नये. प्रतिष्ठासूचक लेखांच्याद्वारें इतर ठिकाणच्या चतुर्विध संघाला आमंत्रण करावें व संघानेंहि यथाशक्ति प्रतिष्ठा विधि पाहण्यास यावें. वेदी प्रतिष्ठेपासून बिंबप्रतिष्ठा समाप्तिपर्यंत त्यानें आत्मस्थ राहून धर्मकार्य करावें गुणीजनांना यथायोग्य दान द्यावें त्यांचा आदर करावा. दीन अनाथ लोकांना त्यानें दान द्यावें.

गर्भरूपो विनेयोऽस्मीत्याक्षिप्तो गुरुभिर्वदेत् । आकृष्टो याचकैः स्वेष्टदाने वोऽस्मि कियानिति ॥५०॥
याजका यष्टृवत्सर्वे श्रावकैरपरैरपि । संभाव्या भक्तितः संघोऽप्याराध्यो धर्मकाम्यया ॥ ५१ ॥
दातृसंघनृपादीनां शांत्यै स्नात्वा समाहिताः । शांतिमंत्रैर्जपं होमं कुर्युरिद्रा दिने दिने ॥ ५२ ॥
देशकालानुसारेण व्यासतो वा समासतः । कुर्वन्कृत्स्नां क्रियां शक्रो दातुश्चित्तं न दूषयेत् ॥ ५३ ॥
यथोक्तनिगदद्रव्यैः प्रयुक्तैर्व्यासतः क्रिया । मंत्रमात्रयथाप्राप्तद्रव्यैश्चेष्टा समासतः ॥५४ ॥

इति कर्तव्योपदेशः ॥

---

५० वडिलमाणसांनीं एखाद्या कामाविषयीं आक्षेप घेतला असतां यजमानानें त्यांना असें म्हणावें कीं, मी आपला अज्ञान शिष्य आहे. जी कांहीं चूक होईल तिची मला माफी करावी. याचकांनीं त्याच्यामागें फार पिरपिर लाविली तर त्यानें याचकांना मी आपल्यास यथेष्ट दान देण्यास समर्थ नाहीं असें म्हणावें.

५१ इतर श्रावकांनीं यजमानाप्रमाणें प्रतिष्ठाचार्य व प्रतींद्र वगैरेचा आदरसत्कार करावा. आणि चतुर्विध संघाची धर्मेच्छेनें आराधना करावी.

५२ प्रतिष्ठाचार्य व प्रतींद्र यांनीं हें दररोज स्नान करून व मन एकाग्र करून यजमान, संघ व राजा इत्यादिकांना शांति प्राप्त व्हावी म्हणून शांतिमंत्रांनीं जप व होम करावा.

५३ देश व काल यांस अनुसरून इंद्रानें विस्तारानें अथवा संक्षेपानें सर्व प्रतिष्ठेच्या क्रिया कराव्यात आणि त्यानें यजमानाचें चित्त दुःखित करूं नये.

५४ प्रतिष्ठा शास्त्रांत सांगितलेल्या सर्व द्रव्यांनीं प्रतिष्ठा करणें ही प्रतिष्ठेची व्यास क्रिया होय व फक्त मंत्रांचा प्रयोग करून व जेवढ्या वस्तु मिळतील तेवढ्या वस्तूंनीं प्रतिष्ठा करणें ही प्रतिष्ठेची संक्षिप्त क्रिया होय.

याप्रमाणें हा कर्तव्योपदेश संपला.

दृग्बोधदेशव्रतरूपरत्नत्रयं भवेन्मे कलितैकभक्तम् ।
आकर्मिका ब्रह्मनिवृत्तियुक्तं स्याद्यज्ञदीक्षाविधिना विशिष्टम् ॥ ५५ ॥

अर्हद्देवयज्ञदीक्षांगीकारः ।

रत्नत्रयांगमुपवीतमुरस्यथांगं देशव्रतस्य च सुकंकणमत्र हस्ते ।
ब्रह्मव्रतांगमधुना स्वकटौ च मौंजीं धृत्वारभे जिनमखं मखदीक्षितोहम् ॥ ५६ ॥

दीक्षाचिह्नोद्वहनम् ।

ॐ वज्राधिपतये ऑ हॉ अः ऐं ऱ्हॉ ऱ्हः श्रूं हूं क्षः इंद्राय संवौषट् ।
अनेन एकविंशतिवारानात्मानमधिवासयेत् ॥

इति यज्ञदीक्षाविधानम् ॥

---

५५ सम्यग्दर्शन, ज्ञान व श्रावकाचीं व्रतें, एकदां भोजन करणें, प्रतिष्ठा समाप्तीपर्यंत ब्रह्मचर्य-धारण करणें हीं माझी सर्व कृत्यें यज्ञदीक्षाविधिनें विशिष्ट होवोत.

अर्हताच्या पूजेचें दीक्षाविधान संपलें

५६ मी ( इन्द्र ) रत्नत्रयाचें चिन्ह असें हें यज्ञोपवीत वक्षस्थलावर धारण करितो. देशव्रताचें चिन्ह असें हें कंकण हातांत धारण करितो. आणि ब्रह्मव्रताचें चिन्ह अशी ही मौंजी मी आपल्या कंबरेसभोंतीं धारण करितो. अशा रीतीनें यज्ञदीक्षा धारण केलेला मी जिनेश्वराचें पूजन करण्यास प्रारंभ करितो 'रत्नत्रयाग' हा श्लोक म्हणून दीक्षेचीं सर्व चिन्हें धारण करावींत.

'ॐ वज्राधिपतये इत्यादि' हा मंत्र पूर्ण म्हणून या मंत्रानें एकवीस वेळा इंद्रानें आपल्या आत्म्याला संस्कृत करावें.

या प्रमाणें हा यज्ञदीक्षेचा विधि संपला.

नत्वा गुरुं ततः कुर्याद्यंत्रदेवविसर्जनम् । द्वारपालबलिं ब्रह्मबलिं दिक्पालसद्बलिम् ॥ ५७ ॥
बलिं चापददेवानां विधिना श्रीबलिं ततः । मूलवेराग्रतः स्थित्वा स्वेष्टार्थप्रार्थनामतः ॥ ५८ ॥
शुभानुध्यानवचनमर्हद्देवविसर्जनम् । क्षमापणं च पचांगनतिमापृच्छनं गतेः ॥ ५९ ॥
कृत्वैवं क्रमतः शक्रः स्वं विधेयं समापयेत् । यजमानस्ततो नत्वा जिनाधीशं श्रुतं गुरुम् ॥ ६० ॥
इंद्रादीन्स्वगृहे नीत्वा भोजयित्वा यथोचितम् । सत्कृत्य वस्त्रभूषाद्यैः प्रतिवंदेत सादरम् ॥ ६१ ॥
रात्रौ दीपोत्करेणार्हद्धामचत्वरशोधनम् । कारयेदिति निर्दिष्टमिदं स्थापनलक्षणम् ॥ ६२ ॥
इदमेव विदुः केचिन्नांदीमंगलसंज्ञितम् । इमं नित्यमहं प्राहुर्यज्ञदीक्षाविवर्जितम् ॥ ६३ ॥

॥ इति नांदीमंगलविधिः ॥

---

५७—५९ तदनन्तर गुरूला म्हणजे आचार्याला नमस्कार करून यत्रदेवतांचें विसर्जन करावें. आणि द्वारपाल बलि, ब्रह्मबलि दिक्पालबलि,। अपददेवताचा बलि व श्रीबलि हे करावेत. मूलवेदीपुढें उभा राहून इष्टप्रार्थना करावी. आइया मनात शुभभावना उत्पन्न होतोत असें म्हणावें अर्हद्देवाचें विसर्जन, क्षमा मागणें, पचांग नमस्कार व शेवटीं स्वतः जाण्याविषयीं श्री जिनेश्वराची परवानगी घ्यावी. या प्रमाणें क्रमानें हीं सर्व कर्मे करून इंद्रानें आपलें कर्तव्य समाप्त करावें

६०—६१ तदनन्तर यजमानानें जिनेश्वर, शास्त्र व गुरु याना नमस्कार करून इंद्रादिकाना त्यानें आपल्या घरी न्यावें व सर्वांना भोजन घालून यथोचित सर्वांचा वस्त्र भूषणादिकानीं सत्कार करावा व त्याना आदरानें नमस्कार करावा

६२—६३ रात्रीं दिवे लावून जिनमंदिराचें आंगण सुशोभित करावें. या पूर्वोक्त सर्व विधिला कित्येक नांदीमगल असेंहि नाव देतात. यज्ञदीक्षारहित असा हा विधि केला तर याम नित्यमह असें नाव आहे.

३

अथास्य नित्यमहस्य प्रयोगः ।

अथेन्द्रः स्थापनानन्तरम्—

झं ठं स्वरावृतं तोयमंडलद्वयसंवृतम् । तोये न्यस्याग्रतर्जन्या तेनानुस्नानमाचरेत् ॥
इति जलयंत्रोपस्कृत्यजलैरमृतमंत्रेणानुस्नानं कृत्वा सांतरीयोत्तरीयं धारयेत् ॥ ६४ ॥

१ ॐ श्वेतवर्णे सर्वोपद्रवहारिणी सर्वजनमनोरंजिनी परिधानोत्तरीये धारिणी हं २ झं २ वं २ सं २ तं २ परिधानीयोत्तरीये धारयामि स्वाहा । सांतरीयोत्तरीयवस्त्रधारणम् ।

२ ॐ क्ष्वीं भूः शुध्यतु स्वाहा । भूमिशोधनमंत्रः ॥

३ ॐ ऱ्हीं अर्हं क्ष्मं ठं आसनं निक्षिपामि स्वाहा । आसनस्थापनं ।

---

आतां या नित्यमहाचा विधि सांगतात

प्रथमतः इंद्रानें स्नान केल्यावर त्यानें कोणता विधि करावा हें दाखवितात.

६४ एका पात्रांत पाणी घ्यावें व त्यांत जलयंत्र ठेवावें जलयंत्राचें स्वरूप याप्रमाणें समजावें—मध्यभागीं 'झं ठं' हीं अक्षरें लिहावींत या अक्षरांच्या सभोवतीं सोळा स्वर लिहावेत. या स्वरांच्या सभोवती दोन वर्तुळें काढावींत आणि त्यांत चार बाजूंना 'वे प' अशीं अक्षरें लिहावीं मग या पाण्यानें मंत्रस्नान करावें. प्रथमतः अमृत मंत्र ह्मणावा व जलयंत्रानें युक्त अशा जलानें मंत्र स्नान करून तदनंतर नेसावयाचें व पांघरावयाचें वस्त्र धारण करावें. हीं वस्त्रें धारण करतेवेळीं—

(१) ओं श्वेतवर्णे हा मंत्र ह्मणून वस्त्रें धारण करावीं.

(२) ओं क्ष्वीं भूः शुद्ध्यतु स्वाहा हा मंत्र ह्मणून भूमिशुद्धि करावी.

(३) ओं ऱ्हीं अर्हं हा मंत्र ह्मणून बसण्याकरितां दर्भाचें आसन घालावें किंवा एक स्वच्छ

४ ॐ ऱ्हीं अर्हं ह्युं ह्यूं णिसिहि णिसिहि आसने उपविशामि स्वाहा । उपवेशनम् ॥

५ ॐ मम समस्तपापक्षयार्थं आयुरारोग्यैश्वर्याभिवृद्ध्यर्थं पौर्वाह्णिकसंध्याचरणं करिष्ये । इति सङ्कल्पः ।

जटान्तौ विन्दुसंयुक्तौ कलावपं सुवेष्टितौ । सोममन्ये लिखित्वाम्भोमध्ये स्नानादिक चरेत् ॥

यंत्रमिदं जले तर्जन्याग्रेण विलिखेत् ।

१ इ्वीं क्ष्वीं हं सः सुरभिमुद्राबीजानि ।

---

पाट घालून त्यावर दर्भाच्या एक दोन तरी काड्या टाकाव्या

( ४ ) ओं ऱ्हीं अर्हं ह्यु ह्यू हा मंत्र ह्मणून आसनावर बसावें व पुढें लिहिल्याप्रमाणें प्रात:कालची संध्याक्रिया करण्याचा संकल्प करावा. तो असा—

( ५ ) ओं मम इत्यादि संकल्प मंत्र ह्मणावा याचा अर्थ हा आहे—माझें सर्व पाप नाहींसें व्हावें-माझ्या आयुष्याची, आरोग्याची व ऐश्वर्याची वृद्धि व्हावी ह्मणून मी प्रातःकालची संध्या क्रिया करितो.

जटान्तौ हा श्लोक ह्मणत उथळ पातांत थोडेंसें पाणी घालून त्याच्या मध्यभागीं उजव्या हाताच्या मधल्या बोटानें अर्धचद्राची आकृति लिहून मध्यभागी ॐ हें अक्षर लिहावें. अर्धचन्द्राकृतीच्या दोन्हीं टोकाला झं ठ ही दोन अक्षरें लिहावीत व सभोवतीं मोठा स्वरें आणि व प ही अक्षरें लिहावीत. अशा तऱ्हेनें यंत्र तयार करून त्यांतील पाण्यानें अनुस्नान करावें हें यंत्र पाण्यात तर्जनीच्या अग्रभागानें लिहावें.

१ इ्वीं क्ष्वीं ह सः हा मंत्र ह्मणून मंत्र लिहिलेल्या पाण्यास सुरभिमुद्रा दाखवावी. ( ह्मणजे प्रथम दोन्ही हातांचीं बोटें एकमेकांत गुतवून तळव्यास तळवा जुळवावा आणि लागलीच उजव्या हाताची कर

२ ओं ऱ्हां ऱ्हीं ऱ्हूं ऱ्हौं ऱ्हः अ सि आ उ सा इदं समस्ततीर्थनदीजलं भवतु स्वाहा ॥

॥ जलशुद्धिः ॥

३ ओं ऱ्ही लां पं व्हः पः झ्वीं क्ष्वी स्वाहा इत्यपस्त्रिः पिबेत् ।

४ ओं ऱ्ही क्ष्वीं झ्वीं इत्यास्यं संवृत्य अंगुष्ठमूलेन त्रिः प्रमृज्यात् ।

५ क्ष्वीं इति तर्जन्यादित्रयेण आस्यमुपस्पृशेत् । एतच्चतुष्टयं सभूय आस्यस्पर्शनम् ।

---

गळी डाव्या हाताच्या करंगळी जवळच्या बोटावर ठेवावी. व डावी करगळी उजव्या हाताच्या करंगळी जवळच्या बोटावर ठेवावी. तसेंच उजव्या हाताचें मधलें बोट डाव्या हाताच्या अंगठ्याजवळच्या बोटावर टेकावी. तसेंच उजव्या हाताचे मधलें बोट डाव्या हाताच्या अंगठ्या जवळच्या बोटावर टेकावें व डावीकडचें बोट उजवी-कडच्या बोटावर टेकावें. तेणेंकरून जी एक आकृति होते तिला सुरभिमुद्रा ह्मणतात. ती त्या जलयत्नास दाखवावी. ) त्यानंतर—

२ ओं ऱ्ही इत्यादि मंत्र ह्मणावा. हें जल गंगा, सिंधु वगैरे सर्व नद्यांचे होवो असा या मंत्राचा अर्थ आहे.

३ ओं ऱ्हीं लां प व्हः इत्यादि मंत्र ह्मणून तीन वेळां आचमन करावें. आचमनाचे स्वरूप या प्रमाणें-प्रथम उजव्या हाताचा तळवा पांचीं बोटें लांब करून उताणा धरावा मग आंगठ्यास टेकण देऊन त्याच्याजवळचें दुसरें बोट मिटावें बाकीचीं तीन्ही बोटें तशीच लांब उघडलेलीं असूं द्यावीं. तेणें करून हाताचा तळवा खोल होतो त्यांत एक उडीद बुडेल इतक्या प्रमाणाचें पाणी घालून ओं इत्यादि मंत्र ह्मणून तें पाणी तोंडावरूनच सोडावें असें तीन वेळां करावें. याला आचमन ह्मणतात.

४ हा मंत्र म्हणून तोंड मिटावें व उजव्या हाताच्या अगुष्ठमूलानें थोडेसें पाणी लाऊन तीन वेळा तोंड पुसावें.

५ क्ष्वीं हा मंत्र म्हणून दुसरें बोट मिटून त्यावर आंगठा ठेवावा व बाकीच्या तीन बोटांनी

६ वं म इति बीजद्वयेन अगुष्ठानामिकाभ्या चक्षुर्द्वयस्पर्शनम् ।
७ ह रां इति बीजद्वयेन अंगुष्ठदेशिनीभ्यां नासापुटद्वयस्पर्शनम् ॥
८ तं सं इति बीजद्वयेन कनिष्ठांगुष्ठयुग्मेन कर्णद्वयस्पर्शनं ।
९ द्रां इति बीजेन अंगुष्ठेन नाभिस्पर्शनम् ।
१० द्रीं इति बीजेन तलेन हृदयस्पर्शनम् ।
११ ह सः इति बीजद्वयेन कराग्रेण भुजाग्रद्वयस्पर्शनम् ।
१२ स्वाहा इति बीजपदेन सर्वांगुलिभि· शिरःस्पर्शनम् ।

---

थोडेंसे पाणी लाऊन मुखास स्पर्श करावा.

अगुष्ठमूल व तर्जनी सहित बाकीचीं बोटें मिळून हा मुखस्पर्शन विधि होतो

६ अगुष्ठ व करंगळीच्या जवळचें बोट हीं दोन बोटें अग्रभागीं एकमेकास टेकून त्यानें थोडेंसें पाणी घऊन व प हा मंत्र ह्मणून क्रमानें उजव्या व डाव्या नेत्रास स्पर्श करावा

७ आंगठा व त्याच्या जवळचें बोट यानीं हं स हा मंत्र ह्मणून क्रमानें उजव्या व डाव्या नाकपुडीस स्पर्श करावा

८ तं पं हीं दोन बीजाक्षरें ह्मणून करंगळी व आंगठा यानीं दोन कानांस स्पर्श करावा.

९ द्रां हें बीजाक्षर उच्चारावें आणि अंगठ्यानें बेंबीला स्पर्श करावा.

१० द्रीं हा बीजाक्षराला उच्चारून उजव्या हाताच्या तळव्यानें हृदयाला स्पर्श करावा

११ ह स ह्या दोन अक्षरांचा उच्चार करून उजव्या हाताच्या सर्व बोटांनीं दोन भुजांच्या अग्रभागांस स्पर्श करावा

१२ स्वाहा हा शब्द उच्चारून सर्व अंगुलींनीं मस्तकास स्पर्श करावा. याप्रमाणें या बारा अंगा-

एतानि द्वादशांगस्पर्शनानि पृथक्पृथगंभःस्पर्शनपूर्वकाणि कर्तव्यानि । इति द्वादशाङ्गस्पर्शनविधिः॥ इत्याचमनविधानम् ॥ पूरकं विधाय अंगुष्ठानामिकाभ्यां नासाविवरद्वयं संवृत्य कुंभकं कुर्वन्नेव णमो अरहंताणं णमो सिद्धाणं इति गथाशद्वय जप्त्वान्ते रेचकं कुर्यात् । अनेनैव विधिना णमो आइरियाणं णमो उवज्झायाणं इति गाथाशद्वयं तथा णमो लोए, सव्वसाहूणं इत्येकांशं जपेत् ।

इति प्राणायामविधि ॥

ओं अमृते अमृतोद्भवे अमृतवार्षीणि अमृतं स्रावय २ सं २ क्लीं २ ब्लूं २ द्रां २ द्रीं

---

पैकीं प्रत्येक अगांस स्पर्श करतेवेळीं पाण्यानें स्पर्श करावा हें आचमन कृत्य संपल्यानतर प्राणायाम विधि करावा. प्राणायामाचा विधि याप्रमाणें-प्रथम पूरक[1] करून आंगठा व करंगळी जवळचें बोट यांनीं दोन नाकपुड्या मिटाव्या आणि कुंभकयोग[2] करीत असतांच णमो अरिहताण णमो सिद्धाण या गाथेच्या दोन अंशांचा जप करून रेचक[3] करावा याच विधीनें णमो आयरियाणं णमो उवज्झायाण हे गाथेंचे दोन अंश व णमो लोए सव्वसाहूणं हा गाथेचा एक अंश यांचा जप करावा. या प्रमाणें हा प्राणायाम विधि आहे.

या विधिनंतर अमृत स्नान करावें. त्याचा क्रम असा— ॐ अमृते अमृतोद्भवे इत्यादि मंत्र ह्मणावा. तो असतां दोन्हीं हाताचे तळवे एकमेकास लावून सगळीं बोटें एकमेकांत गुंतवून मिटवावींत आणि फक्त आंगठ्या-

१—वायूला मस्तकाचें ठिकाणीं पोचविणें यास पूरक ह्मणतात
२—वायूला नाभिप्रदेशीं आणून एके ठिकाणीं थांबविणें यास कुंभक ह्मणतात.
३—रेचक—कोंडलेला वायु हळू हळू बाहेर सोडणें.

२ द्रावय २ स्वाहा इति प्रोक्षणमंत्रः। ओं झं वं ह्वः पः हः स्वाहा दिगंजलिः। ओं ह्रीं अ सि आ उ सा नमः स्वाहा अनेन पंचगुरूणां त्रिवारजलार्घ्यप्रदानम् ॥

१ ओं ह्रीं अर्हद्भ्यः स्वाहा २ ओं ह्रीं सिद्धेभ्यः स्वाहा ३ ओं ह्रीं सूरिभ्यः स्वाहा ४ ओं ह्रीं पाठकेभ्यः स्वाहा ५ ओं ह्रीं सर्वसाधुभ्यः स्वाहा ६ ओं ह्रीं जिनधर्मेभ्यः स्वाहा ७ ओं ह्रीं जिनागमेभ्यः स्वाहा ८ ओं ह्रीं जिनचैत्येभ्यः स्वाहा ९ ओं ह्रीं जिनचैत्यालयेभ्यः स्वाहा. १० ओं ह्रीं सम्यग्दर्शनेभ्यः स्वाहा ११ ओं ह्रीं सम्यग्ज्ञानेभ्यः स्वाहा १२ ओं ह्रीं सम्यक्चारित्रेभ्यः स्वाहा १३ ओं ह्रीं सम्यक्तपोभ्यः स्वाहा १४ ओं ह्रीं अस्मद्गुरुभ्यः स्वाहा १५ ओं ह्रीं अस्मद्विद्यागुरुभ्यः स्वाहा । इति तर्पणमंत्रः ।

ओं णमो अरहंताणं णमो सिद्धाणं णमो आयरीयाणं णमो उवज्झायाणं णमो लोए सव्वसाहूणं । इत्यपराजितमंत्रमष्टशतवारान्जपेत् ॥ इति जपः ॥

---

जवळचीं दोन्हीं हाताचीं दोन्हीं बोटें मात्र लांब करून एकमेकास टेकवावीं. व त्यांच्या अग्रानें जलमंत्रांतील जळ घेऊन प्रथम उजव्या भुजावर नंतर डाव्या भुजावर नतर मस्तकावर याप्रमाणें सर्वांगावर शिंपावें. याला प्रोक्षण ह्मणतात.

ॐ झं व ह्वः पः हः स्वाहा हा मंत्र ह्मणून सर्व दिशेस एक ओंजळभर पाणी सोडावें.

ॐ ह्रीं असि आ उसा नमः स्वाहा हा मंत्र ह्मणून पंचपरमेष्ठीना तीन वेळां जलाचें अर्घ्य द्यावें. तदनंतर तर्पणें द्यावीं. त्यांचा क्रम असा— हे वरील पधरा मत्र ह्मणून १५ वेळां जलानें तर्पणें द्यावें ह्मणजे प्रत्येक मंत्र ह्मणून उजव्या हातानें थोडें थोडें उदक सोडावें.

तदनतर अपराजित मंत्राचा १०८ वेळां जप करावा.

प्राग्दिग्विदिगंतरतः केवलिजिनसिद्धसाधुगणदेवाः । ये सर्वर्द्धिसमृद्धा योगीशास्तानहं वंदे ॥ १
दक्षिणादिग्विदिगंतरतः केवलिजिनसिद्धसाधुगणदेवाः । ये सर्वर्द्धिसमृद्धा योगीशास्तानहं वंदे ॥ २
पश्चिमदिग्विदिगंतरतः केवलिजिनसिद्धसाधुगणदेवाः । ये सर्वर्द्धिसमृद्धा योगीशास्तानहं वंदे ॥
उत्तरादिग्विदिगंतरतः केवलिजिनसिद्धसाधुगणदेवाः । ये सर्वर्द्धिसमृद्धा योगीशास्तानहं वंदे ॥

इति चतुर्दिक्षु पृथक्पृथक्त्र्यावर्तैकशिरोनतिपूर्वकं प्रदक्षिणनमस्कार कुर्यात् ॥

झं ठं यत्स्वरवेष्टितं विधुवृतं पं वं च दिक्कोणयो--रूर्ध्वाधःश्रितपंचसप्तदलभृत्पद्मद्वयांभःपुरम् ॥
पत्राढ्ये च करे विलिख्य कुशया तद्यंत्रगंधादिकं हृत्वानामिकया ललाटहृदयांसद्वंद्वकंठे धरेत् । १ ।

---

तदनतर कमलाच्या कळीप्रमाणें हात जोडून ते मस्तकाजवळ टेकून तेथें—श्लोक ह्मणत ह्मणत पूर्व वगैरे ४ दिशांस नमस्कार करावा. या चार श्लोकांचा सक्षिप्त अर्थ असा आहे— आठही दिशेस जे केवलि जिनेश्वर सिद्ध, साधु, गणधर सर्वऋद्धि सपन्न असे जे योगीश्वर त्यांना मी नमस्कार करितो.

आपल्या डाव्या हातामध्यें गधानें पूर्णचद्र काढावा व त्या आकृतिमध्यें झं ठ हीं अक्षरें दर्भानें लिहावी. चद्राकृतीच्या सभोवती स्वरमाला लिहावी. व या आकृतीच्या सर्व दिशाच्या कोणामध्यें व प हीं अक्षरें लिहावी. या आकृतीच्या वर आणि खालीं अनुक्रमानें पाच व सात पाकळ्याचीं दोन कमलें लिहावीं. या आकृतीला गधयत्र असें ह्मणतात. या गधयत्रांतील गंध आपल्या उजव्या हाताच्या करगळीच्या जवळच्या बोटानें घेऊन व पच परमेष्ठींच्या मंत्रावें क्रमानें उच्चारण करून कपाळ, हृदय, उजवा भुज व डावा भुज आणि कठ या पाच प्रदेशावर त्याचें लेपन करावें

याप्रमाणे गधलपन विधि आहे
या गधलेपनाचें मत्र पुढें दिलें आहेत.

१ ॐ ऱ्हां ऱ्हीं ऱ्हूं ऱ्हौं ऱ्हः णमो अरहंताणं रक्ष २ स्वाहा । ललाटे ।
२ ॐ ऱ्हां ऱ्हीं ऱ्हूं ऱ्हौं ऱ्हः णमो सिद्धाणं स्वाहा । हृदये ।
३ ओं ऱ्हां ऱ्हीं ऱ्हूं ऱ्हौं ऱ्हः णमो आइरियाणं रक्ष रक्ष स्वाहा । दक्षिणभुजे ।
४ ओं ऱ्हां ऱ्हीं ऱ्हूं ऱ्हौं ऱ्हः णमो उवज्झायाणं रक्ष रक्ष स्वाहा । वामभुजे ।
५ ओं ऱ्हां ऱ्हीं ऱ्हूं ऱ्हौं ऱ्हः णमो लोए सव्वसाहूणं रक्ष रक्ष स्वाहा । कंठे ।

---

१ हा मंत्र ह्मणून कपाळाला गंध लावावें.
२ हा मंत्र ह्मणून हृदयस्थानी गंध लावावें.
३ हा मंत्र ह्मणून उजव्या बाहूवर गंध लावावे.
४ हा मंत्र ह्मणून डाव्या बाहूवर गंध लावावे.
५ हा मंत्र ह्मणून गळ्याला गंध लावावें.

याप्रमाणें गंध लावण्याचा विधि आहे.

# अथ पूजानुखविधिः ।

स्नानानुस्नानशुद्धो विधृतसितसुधौतान्तरीयोत्तरीयः ।
कृत्वोपस्पर्शनादीन्यथ जिनगृहमुद्घाटितश्रीकपाटम् ॥
प्राप्य प्रक्षालितांघ्रिर्विहितविविधसत्कारविभ्राजमानम् ॥
सानंदः सविशाधि त्रिजगदधिपतिश्रीजिनाराधनाय ॥ १ ॥
इति प्रक्षालितपादः सन् श्रीविमानं प्रविशेत् ॥
चतुर्दिक्षु पृथक्क्लृप्तत्र्यावर्तैकशिरोनतिः । त्रिः परीत्यानतो जैनगेहमन्तर्धिशाम्यहम् । २ ।
दृष्टं जिनेन्द्रभवनं भवतापहारि, भव्यात्मनां विभवसंभवभूरिहेतुः ॥
दुग्धाब्धिफेनधवलोज्ज्वलकूटकोटिनद्धध्वजप्रकरराजविराजमानम् । ३ ।

---

१ स्नान करून अनुस्नान करावे व धुतलेलें असें पांढरें वस्त्र ( नेसावयाचें व पांघरावयाचें ) धारण करावें तदनन्तर उपस्पर्शन वगैरे करून तेथें हात व पाय धुऊन मग जिनेश्वराच्या आराधनेसाठीं मंदिरामध्यें प्रवेश करावा

२ तदनन्तर मस्तकावर कमलकळीसारखे हात करून ते ठेवावे व ते तेथें तीनदा फिरवावे व एक नमस्कार करावा. या प्रमाणें चार दिशेला करावें व जिनमंदिरास तीन प्रदक्षिणा कराव्यात. प्रदक्षिणा करतेवेळीं जिनमंदिराची पुढें लिहिल्याप्रमाणें स्तुती करावी.

३ क्षीरसमुद्राच्या फेसाप्रमाणें शुभ्र अशीं ज्यानी शिखरें शोभतात व जें नानाप्रकारच्या ध्वजसमूहानीं शोभतें, जें भव्यजीवांच्या संसारतापाचा नाश करून त्यांच्या ऐश्वर्यप्राप्तीला मुख्य कारण होतें असें श्री जिनमंदिर मी पाहिलें.

दृष्टं धाम रसायनस्य महतां दृष्टं निधीनां पदं । दृष्टं सिद्धरसस्य सद्म सदनं दृष्टं च चिंतामणेः
किं दृष्टैरथवानुषंगिकफलैरेभिर्मयाद्य ध्रुवम् । दृष्टं मुक्तिविवाहमंगलगृहं दृष्टे जिनश्रीगृहे ॥ ४ ॥
जयति सुरनरेन्द्रश्रीसुधानिर्झरिण्याः कुलधरणिधरोऽयं जैनचैत्याभिरामः ॥
प्रविपुलफलधर्मानोकहाग्रप्रवाल—प्रवरशिखरशुंभत्केतनश्रीनिकेतः ॥ ५ ॥
श्रियः पदं जिगमिषता मनीषिणां तनूभृतामतनुनिमित्तमुत्तमम् ॥
जिनेश्वरप्रतिकृतिपुण्यकेतनप्रदीक्षणीकरणमिदं पुनातु नः ॥६॥
इति त्रिभुवनगुरुभवनं त्रिःपरीत्याभिमुखमुपगतो भगवंतमभिवंदेत ॥
ओं ऱ्हीं हुं हूं णिसिहि स्वाहा इत्यंतः प्रविशेत ॥

---

४ श्रीजिनेश्वराचें मंदिर हें मुक्तिशी विवाह करण्यासाठीं तयार केलेलें मंगलगृह आहे. याचें दर्शन झालें ह्मणजे सिद्धरसाचें स्थान पाहिल्याप्रमाणें होतें. अनेक निधि पाहिल्याप्रमाणें वाटतें. हे चिन्तामणि वगैरे पदार्थ फक्त आनुषंगिक फलें देणारे आहेत. व श्रीजिनमंदिर हें मुक्ति प्राप्त करून देतें. यास्तव उपर्युक्त पदार्थाहून हें सर्वोत्कृष्ट आहे.

५ हे श्रीजिनमंदिर कुलपर्वतासारखें आहे. या पर्वतापासून देवेन्द्र व चक्रवर्तीचें ऐश्वर्यरूपी अमृतनदीचा उगम निघाला आहे. हा जिनमंदिररूपी कुलप्रतिमेनें सुंदर दिसतो. या कुलपर्वतावर विपुलसुखरूपी फल देणारा धर्मरूपी वृक्षरूक्ष असल्यामुळे या कुलपर्वताचें शिखर शोभत या शिखरावर लक्ष्मीच्या घराप्रमाणें ध्वजा शोभते.

६ ज्ञानादिसंपत्तीचें स्थान अशा मोक्षाची प्राप्ति व्हावी अशी इच्छा करणाऱ्या प्राण्यांना जिनमंदिरांना प्रदक्षिणा घालणें हें उत्तम असें मोक्ष प्राप्तिचें कारण आहे. जिनमंदिरास घातल्या जाणाऱ्या प्रदक्षिणा आह्मास पवित्र करोत. याप्रमाणे स्तुति करित जिनमंदिराला तीन प्रदक्षिणा द्याव्यात व श्रीजिनेश्वरापुढें उभे राहून त्यांना नमस्कार करावा.

ॐ ऱ्हीं हा मंत्र ह्मणत जिनमंदिरामध्यें आंत प्रवेश करावा.

शोधये मंत्रपूतेन हस्तौ शस्तेन वारिणा ॥
अपहस्तितपंकार्हत्पादपद्मार्चनोद्यतः ॥ ७ ॥
ओं ह्रीं असुजर सुजर स्वाहा । हस्तप्रक्षालनमंत्रः ॥८॥
प्रतिक्रम्य पृथग्गाथां द्विद्व्येकांशांतरेचकां ॥
नवकृत्वः स्थितो जप्त्वा निषद्यालोचयाम्यहम् ॥९॥

पडिक्कमामि भंते । इरियावहियाये । विराहणाये । अणागुत्ते । अगमणे । णिग्गमणे । ठाणे गमणे । चक्कमणे । पाणुग्गमणे । बीजुग्गमणे हरिदुग्गमणे । उच्चारपस्सवणखेलसिंघाणवियडिपयिट्ठावणियाये ॥ जे जीवा एइंदिया वा । बेइंदिया वा । तेइंदिया वा । चउरिंदिया वा । पंचेंदिया वा । णोल्लिदा वा किल्छिदा वा । संघट्टिदा वा । संघादिदा वा ओदावि-

---

७ ज्याने कर्ममल धुऊन टाकिला आहे अशा अरहंताच्या पायाची पूजा करण्यास उद्युक्त झालेला मी आपले हात मंत्रपवित्र अशा प्रासुक पाण्यानें धुतो अशा अर्थाचा श्लोक ह्मणावा व त्यावेळी ओं ह्रीं असुजर सुजर हा मंत्र ह्मणावा.

८ तदनंतर प्रतिक्रमण विधि करावा. तो झाल्यावर ९ वेळां पंचणमोकार मंत्र ह्मणावा. या मंत्राच्या गाथेचे दोन अंश ह्मणून एकदां आंत घेतलेला श्वास हळुच बाहेर सोडावा. पुनः दोन अंश ह्मणतांना श्वास आत घेऊन तदनंतर तो पुनः सोडावा. व गाथेचा शेवटचा अंश ह्मणतानाही याप्रमाणेच करावें हा णमोकार मंत्र ९ वेळा उच्चारण करीत असतां श्वासोच्छ्वास संख्या २७ होते.

९ हे भगवन् मी ईर्यापथ करीत असता जी प्राण्यांना पीडा झाली असेल तदर्थ मी प्रतिक्रमण करितो. माझें पाप मिथ्या होवो. मन वचन व शरीर ही ताब्यांत न ठेवतां मी लौकर चाललों असेन

दा वा। परिदाविदा वा किरिच्छिदा वा लेस्सिदा वा। छिंदिदा वा भिंदिदा वा। ठाणदो ठाणचंकमणदो वा। तस्स उत्तरगुण। पायच्छित्तकरणं। तस्स विसोहिकरणं जावरहंताणं। भयवंताणं। णमोकारं करेमि। तावकायं पावकम्मं। दुच्चरियं वोसरामि। णमो अरहंताणमित्यादि जपः। इच्छामि भंते इरियावहियस्स आलोयणां। पुव्वुत्तरदक्खिणपच्छिमचउदिस विदिसासु विहरमाणेण जुगुत्तरदिट्ठिणा डवडवचरियाये पमाददोसेण पाणभूदजीवसत्ताणं। एदे-

---

कोठेही ज ण्याला प्रारंभ केला असेन, सहज इकडे तिकडे फिरलो असेन, लांब किंवा जवळ पावलें टाकून चाललो असेन, श्वासोच्छ्वास सोडला असेन, किंवा द्वींद्रिय, त्रींद्रिय, चतुरिंद्रिय प्राण्यावरून गेलो असेन, बीजावरून व हरितकायावरून-वनस्पतिवरून गेलो असेन, मलमूत्र टाकणे चळ भरणे, शेंबड टाकणें, व कफ टाकणे या क्रिया मजकडून झाल्या असतील, पुस्तक वगैरे उपकरणें ही मजकडून प्रमादानें ठेविली गेली असतील, एकेंद्रियापासून पंचेंद्रियापर्यंतचे जे जीव ते आपआपल्या ठिकाणी जाता येता मजकडून अडविले गेले असतील, ते एका ठिकाणाहून दुसऱ्या ठिकाणी टाकले गेले असतील, हे जीव परस्परांशी भिडऊन दुःखित केले असतील, यांना मी एकत्र गोळा केलें असेन, मारले असेन, संताप दिला असेन, चिरडले असतील, मूर्च्छित केले असतील, कातरिले व फाडले असेन हे जीव एके ठिकाणी बसले असतील अथवा जात असतील त्यावेळी मजकडून यांची विराधना झाली असेल. इत्यादि कृत्यें मजकडून झाल्यानें जे दोष लागले असतील ते सर्व मिथ्या व्हावेत म्हणून मी प्रतिक्रमण करितो. मी अर्हंतांना नमस्कार करून अशुभ कार्य व चेष्टा ज्यापासून होतात अशा शरीराचा त्याग करितो अर्थात् कायोत्सर्ग करितो. अर्हंतांना केलेला हा नमस्कार प्रतिक्रमणाचा उत्कृष्ट गुण आहे. यानें केलेल्या दोषांचें निराकरण होतें. हा नमस्कार सर्व दोषांचें प्रायश्चित्त आहे-या नमस्कारानें घडलेले दोष शुद्ध होतात अर्थात नाहींसे होतात. ईर्यापथ करीत असतां जे दोष झाले असतील त्यांचा यानें नाश होतो.

सिं उवघादो कदो वा कारिदो वा कीरंतो वा समणुमणिदो तस्स मिच्छा मे दुक्कडं ॥

दृष्टे मृष्टे शुचि न्यस्ते संनिविष्टः सुविष्टरे ॥
समीपस्थार्चनाद्रव्यो मौनमाकर्मिकं दधे ॥ १० ॥

ओं क्ष्वीं भूः शुध्यतु स्वाहा । ओं ऱ्हीं क्ष्वीं आसनं निक्षिपामि स्वाहा । ओ ऱ्हीं स्हुं स्हुं णिसिहि आसने उपविशामि स्वाहा ।

ओं ऱ्हीं मौनस्थिताय स्वाहा इति मौनव्रत गृहूणीयात् ॥

---

हे भगवन् ईर्यापथ करताना प्रमादाने दोष घडले असतील त्याची मी आलोचना करितो मी प्रमादानें नेसा अधपणानें खाली जमिनीकडे न पाहता स्वच्छंदानें चालून एकेन्द्रिय, विकलेन्द्रिय वगैरे जीवांना पीडा दिली असेल, देवविली असेल, देणाऱ्यास अनुमोदन दिले असेल तर हें माझे वाईट कृत्य निष्फल होवो. पापापासून ज्यांना भीति वाटते अशा भव्यांनी पूर्व पश्चिम, दक्षिण व उत्तर या दिशा व विदिशा यामध्ये जात असताना आपल्या पुढील जमीन चार हात पर्यंत निहाळून पहावी. असे चालल्याने जीवांचा वध होत नाही व स्वतः लाहि कोणता अपाय होत नाही.

१० प्रतिक्रमण व आलोचना झाल्यानंतर स्वच्छ अशा जमिनीवर पाट टाकून व पूजेची द्रव्य सामग्री जवळ ठेऊन पाटावर बसावे व पूजा संपेपर्यंत मौन धारण करावे अर्थात पूजेचा विधि करताना इतर विषयाविषयीं मौन धारण करावे

---

१ स्वतःची निंदा व गर्हा करणें यास आलोचना म्हणतात. मी ही फार वाईट गोष्ट केली असे म्हणून स्वतःची निंदा करणे, व देव, गुरु अथवा शास्त्र यास साक्ष ठेऊन स्वतःची निंदा करणे यास आलोचना म्हणतात.

२ द्वीन्द्रिय, त्रींद्रिय, चतुरिन्द्रिय, जीवांना प्राण असे म्हणतात वनस्पति कायिकांना भूत असे नांव आहे पचेन्द्रिय प्राण्यांना जीव संज्ञा आहे पृथ्वी पाणी अग्नि हवा याना सत्व असे म्हणतात.

शोधये सर्वपात्राणि पूजार्थानपि वारिभिः ॥
समाहितो यथाम्नायं करोमि सकलीक्रियाम् ॥११॥

ओं ह्रा ह्रीं ह्रूं ह्रौं ह्रः नमोऽर्हते श्रीमते पवित्रतरजलेन पात्रशुद्धिं करोमि स्वाहा
ओं ह्रीं अर्हं झौं व सं ह सं तं झ्वीं क्ष्वीं हं सः असिआउसा समस्ततीर्थपवित्रजलेन शुद्धपात्रनिक्षिप्तपूजाद्रव्याणि शोधयामि स्वाहा ॥

गुरुमुद्राग्रभूः झं व ह्वः पः होम्योऽमृतं स्वकैः ॥
स्रवद्भिः सिच्यमान स्व ध्याये मंत्रमिमं पठन् ॥१२॥

ओं अमृते अमृतोद्भवे अमृतवर्षिणि अमृत स्रावय २ स २ क्लीं २ ब्लूं २ द्रां २ द्रावय २ सं हं झं क्ष्वीं हं सः स्वाहा । अमृतोक्षणम् ॥

---

११ ॐ क्ष्वीं भूः इत्यादि मंत्राने भूमि शुद्ध करावी.
ॐ ह्रीं क्ष्वीं आसनं इत्यादि मंत्राने पाट मांडावा.
ॐ ह्रीं ह्रूं ह्रूं इत्यादि हा मंत्र म्हणून पाटावर बसावें.
ॐ ह्रीं मौनस्थिताय स्वाहा हा मंत्र म्हणून मौनव्रत धारण करावें,
ॐ ह्रां ह्रीं इत्यादि मंत्र म्हणून पूजेचीं पानें शुद्ध करावींत.
ॐ ह्रीं अर्हं झौं हा मंत्र म्हणून सर्व तीर्थांच्या पवित्र पाण्यानें शुद्ध पात्रांत ठेविलेलीं पूजाद्रव्यें शुद्ध करावींत
१२ हा सर्व विधि झाल्यानंतर पंचगुरुमुद्रा करावी. त्या मुद्रेनंतर झं वं ह्वः पः हः हीं अक्षरें लिहावींत व ही गुरुमुद्रा स्वमस्तकावर धारण करावी आणि झं वं ह्वः पः हः या अक्षरांपासून अमृतप्रवाह निघत आहे व तो माझीं सर्व अंगें सिंचीत आहे असें समजून ध्यान करावें व अमृते अमृतोद्भवे हा मंत्र म्हणावा. हा अमृत प्रोक्षण विधि होय. तदनंतर अग्निमंडलाचें चिंतन करावें.

व्योमव्यापिघनाम्भोभिः स्त्रमाप्लाव्यामृतस्रुतम्॥
खेहं ध्यायन्राजाम्यंगममृतैरन्यादिन्दुवत् ॥ १६ ॥
अमृतप्लावनममृतमयदेहकरणं च ।
हस्तद्वये कनीयस्याद्यगुलीना यथाक्रमम् ॥
मूले रेखात्रयस्योर्ध्वमग्रे च युगपत्सुधीः ॥ १७ ॥
न्यस्योन्ह्‌ामादिहोमाद्यान्नमस्कारान्करौ मिथः ॥
संयुज्यांगुष्ठयुग्मेन स्वांगेषु द्विर्न्यसमामे तान् ॥ १८ ॥

---

१६ तदनंतर आकाशाला व्यापून टाकणाऱ्या मेघाच्या वृष्टींनी आपण भिजून चिंब झालों आहे व अमृताचें आपल्यावर सिंचन होत आहे असें चिंतन करावें व अमृतांनीं चंद्राप्रमाणें सुंदर असा देह बनला आहे असें चिंतन करावें.

१७–१८ दोन्ही हाताच्या कनिष्ठिका वगैरे बोटावर अर्थात अंगठ्याला वगळून बाकीच्या चार बोटावर त्याच्या मूळभागीं, तीन रेखावर, व अग्रभागीं यथाक्रम ॐ ऱ्हां वगैरे अक्षरें ज्याच्या आदि आहेत असा पंचनमस्कार लिहून दोन्ही हात परस्परामध्यें जोडावे व हाताचे दोन आंगठे उभे करून त्यांच्या द्वारें आपल्या कपाळ, मस्तक, छाती वगैरे अवयवावर न्यास करावा. त्याचा क्रम असा:—

ॐ ऱ्हां णमो इत्यादि हा मंत्र ह्मणून हृदयावर आंगठ्यांनीं न्यास करावा.
ॐ ऱ्हीं णमो या मंत्रानें कपाळावर न्यास करावा.
ॐ ऱ्हूं णमो या मंत्रानें डोक्याच्या दक्षिणेकडे न्यास करावा.
ॐ ऱ्हौं णमो या मंत्रानें डोक्याचे पश्चिमेकडे न्यास करावा
ॐ ऱ्हः णमो या मंत्रानें डोक्याचे उत्तरेकडे न्यास करावा. या प्रमाणें न्यासाचा हा क्रम दोन वेळा करावा.

ओं ऱ्हां णमो अरहंताणं वायव्यां दिशि ॥
ओं ऱ्हीं णमो सिद्धाणं उत्तरस्यां दिशि ॥
ओं ऱ्हूं णमो आइरियाणं ऐशान्यां दिशि ॥
ओं ऱ्हौं णमो उवज्झायाणं अधरस्यां दिशि ॥
ओं ऱ्हः णमो लोए सव्वसाहूणं ऊर्ध्वायां दिशि

इति दिग्बंधनम् ॥

वर्मितोऽनेन सकलीकरणेन महामनाः ॥
कुर्वन्निष्टानि कर्माणि केनापि न विहन्यते ॥

ओं नमोर्हते सर्व रक्ष २ हूं फट् स्वाहा अनेन पुष्पाक्षतान् सप्तवारान् प्रजप्य परिचारकाणां शीर्षेपु प्रक्षिपेत् ॥ इति परिचारकरक्षा ॥ ओं हूं फट् किरिटिं घातय २ परविघ्नान् स्फोटय २

---

हें सकलीकरणरूपी चिलखत जो विद्वान् पुरुष घालून इष्ट कर्में करितो त्याला कोणीही विघ्न करू शकत नाही.

ॐ नमोर्हते सर्व रक्ष २ हूं फट् स्वाहा हा मंत्र सात वेळां जपून तदनंतर पूजा करतेवेळीं इंद्राला पूजेंत जे मदत करितात त्याच्या मस्तकावर पुष्पाक्षता टाकाव्यात. पूजेंत जे इंद्राला मदत करितात त्यांना परिचारक म्हणतात. हा परिचारक रक्षणाचा विधि आहे.

तिष्ठा

सहस्रखंडान् कुरु २ परविद्या छिंद २ परमंत्रान् भिंद २ क्षः फट् स्वाहा ॥ अनेन सिद्धार्थान भिमंत्र्य सर्वविघ्नोपशमनार्थं सर्वदिक्षु क्षिपेत् ॥

इति सकलीकरणविधानम् ॥

—:०:—

उद्घाट्य वदनवस्त्रं ध्रुवंच परमेष्ठिनं च मुखवस्त्रम् ॥
उत्तारयामि पुरतः सति सर्वार्थविकासने ॥
विविधवज्रप्रतिज्ञापनाय पुष्पाजलिः ॥ १ ॥
कनत्कनककंटिक निर्मलीनत्क्रोज्ज्वलम् ।
बहुप्रकटवर्णकैः कुशलशिल्पिभिर्निर्मितम् ॥

—

ॐ हूं फट् किरिटं घातय २ इत्यादि हा मंत्र पाठ्या सोळा मंत्रुन त्या सर्व विघ्नांचा उपशम व्हावा म्हणुन सर्व दिशामध्ये क्षेपण करावा.

इति सकलीकरणविधान ॥

—

१ हा श्लोक पूजा करण्याच्या प्रतिज्ञेचा आहे. हा श्लोक म्हणुन पुष्पांजलि क्षेपण करावी.
२–६ हा श्लोक श्री जिनेश्वराचे मस्तकावरील वस्त्र उघडण्याचा मंत्र आहे. हा मंत्र व पुढील स्तुति म्हणावी व

जिनेन्द्रचरणाम्बुजद्वयसमर्चनार्थं मया ।
समस्तदुरितापहृद्वदनवस्त्रमुद्घाट्यते ॥ २ ॥

वदनवस्त्रोद्घाटनमंत्रः ॥

अद्याभवत्सफलता नयनद्वयस्य । देव त्वदीयचरणांबुजवीक्षणेन ॥
अद्य त्रिलोकतिलक प्रतिभासते मे संसारवारिधिरयं चुलुकप्रमाणं ॥ ३ ॥
अद्य मे सफलं जन्म नेत्रे च विमले मम ॥ त्वामद्राक्षं यतो देव हेतुमक्षयसंपदः ॥
अद्य संसारगभीरपारावारः सुदुस्तर. ॥ सुतरोयं क्षणेनैव जिनेन्द्र तव दर्शनात् ॥४॥
समस्तवस्तुप्रतिभाससूर्तये ॥ जगत्त्रयानंदनिकेतकीर्तये ॥
जिनाय सर्वेप्सितकामधेनवे नमस्तमोध्वसविधानभानवे ॥ ५ ॥
देवाधिदेव परमेश्वर वीतराग सर्वज्ञ तीर्थंकर सिद्ध महानुभाव ॥

---

तदनंतर श्रीजिनेश्वरास सन्मुख पाहून त्यास वंदना करावी. स्तुतीचा सारांश याप्रमाणें—हे जिनेश आज आपले पाय माझ्या दृष्टीस पडल्यानें माझे डोळे सफल झाले. व त्रैलोक्याला तिलक अशा हे जिना हा संसार समुद्र एका चुळके प्रमाणें मला वाटत आहे. आपले दर्शन झाल्यानें हा भवसमुद्र एका क्षणांत तरून जाता येईल असे वाटू लागले आहे. हे जिनेश आपण सर्व वस्तु प्रकाशक आहात. आपली कीर्ती जगाला आनंदित करिते. आपण सर्व इष्ट वस्तु अर्पण करणाऱ्या कामधेनुसारखे आहात. व अज्ञानांधकार नाहींसा करण्यास सूर्यासारखे आहात.

हे देवाधिदेवा, आपण परमेश्वर वीतराग, सर्वज्ञ, तीर्थंकर, सिद्ध महानुभाव, त्रैलोक्यनाथ, जिनपुंगव, वर्द्धमान इत्यादि नावाचे धारक आहात. हे स्वामिन् मी आपल्या दोन पायांना शरण आहे. याप्रमाणें

ओं रजतमहारजतेन्द्रनीलमरकतमाणिक्यमयमहामानभासुरभित्तिस्तंभशालिशिखरमंडपमहामानस्तंभाद्यंगोपांगसगताकीर्णपचवर्णप्रभाजालप्रभावाहितविचित्रांबरविलासांबराणाम् । संततानादिसंसिद्धहटद्धाटकीयधूपघटपेटकास्यनिर्यद्विश्वतोविसर्पिधूमलेखाजालबहलपरिमलप्रसरसुरभीकृतसकलदिङ्मुखानाम् ॥ वंदारुसुरासुरवृंदारकजयजयारावसुरनर्तकीकरकंकणझंकारद्वि[illegible]णीकृतानादिघाटितघंटाजालझणझणध्वानबधिरीकृतनिखिलदिङ्मंडलानाम् ॥ तमःसमूलसमुत्पाटनपटुतावलेपलिप्सागतगभस्तिमालिमंडलायमानहटद्धाटकीयघटपेटकीयघटपेटकोपघाटिताचित्तचमत्काराणाम् । चकचकायमाननानाविधोपकरणनिचितनीलतरनिर्जितज्योतिर्गणांकितगगनांगणानाम् ॥ समुत्तुंगसुवर्णभित्तिभागावलंबमानमणिमालामुषितमेरुगिरिपार्श्वशोभातिशयानाम् ॥ विचित्रविनिर्मापणवदनाभिषेकनर्तनसंगीतावलोकनादिमंडपाभिमंडितचैत्यमहीमहितानाम् ॥ कुंज'रातिकुंजरादिदशाविधध्वजराजिसभाजिताद्यद्वितीयशालांतरध्वजधराविराजितानाम् ॥ चतुर्दिग्गताशोकसप्तच्छदचंपकाम्रचतुर्वनांचिततृतीयबहिःशालांतरावनीविनूतानाम् ॥ चतुर्वीथिपर्यंतगतमहामानस्तंभाहितप्रतितीर्थजनमानस्तंभानाम् ॥ सहजसकलपरिष्काराणामकृत्रिमाणामहार्यविविधालंकाराणामपि कृत्रिमाणां ।

---

' ओ रजतमहारजतेत्यादि ' हे गद्य ह्मणून गंधादि अष्टद्रव्यानीं जिनमंदिराची पूजा करावी. तदनंतर त्याच्या पुढें उभे राहून ' शिवमस्तु ' हा श्लोक ह्मणावा.

' ॐ रजेतत्याद ' या गद्याचा अभिप्रायः—अकृत्रिम जिनमंदिरांच्या भिती, खांब, तट, शिखर, मंडप, मानस्तभ वगैरे अवयव चांदी. सोनें, पाचरत्न, पद्मराग वगैरे मण्यानी युक्त असतात. या जिनचैत्यामध्यें धूपघट असतात ते अनादिकालचे आहेत. चैत्यालयामध्ये देव देवी हमेशा येतात, जय जय असा शब्द करितात व नृत्य

मंगललोकोत्तमशरणभूतानाम् ॥ भगवज्जिनचैत्यालयानामष्टतयीमिष्टिं करोमि स्वाहा ॥ स्वच्छैस्तीर्थै० । चैत्यालयान्संयजे ॥ ओं ऱ्हीं सर्वजिनचैत्यालया जलं गृह्णीध्वं २ नमः । एवं गंधादि ॥ इत्यर्चनां विधाय तदग्रे स्थित्वा ॥

शिवमस्तु सर्वजगतां परहितनिरता भवंतु भूतगणाः ॥
दोषाः प्रयातु नाशं तिष्ठतु जिनशासनं सुचिरम् ॥

इममाशीर्वादमुद्घोषयेत् ॥

स जयतु जिनधर्मो यावदाचंद्रतारं । यमनियमतपोभिर्वर्द्धतां साधुसघः ॥
अहरहरभिवृद्धिं यांतु चैत्यालयास्ते । तदधिकृतजनानां क्षेममारोग्यमस्तु ॥

अथ शांतिशुद्ध्यभिधानहोमविधेः प्रयोगः ॥

अथ चैत्यालयस्य चतुर्दिक्षु विधिविहितचतुरस्रचतुःकुंडविराजमानसमुचितालंकारोपेतहोमम-

---

करितात. सुवर्णाचे पुष्कळ कलश तेथें ठेविलेले असतात. अनेक तऱ्हेची पूजेची व अभिषेकाची सामग्री असते सुवर्ण भित्तीला रत्नाच्या माळा अडकाविलेल्या असतात. या चैत्यालयांत अभिषेकमंडप, नृत्यमंडप, वगैरे मंडप असतात. दहा प्रकारच्या ध्वजा असताव. अशा रीतीची अकृत्रिम चैत्यालयांची रचना असते. या प्रमाणे पूजा करून जिनमंदिरापुढें उभे रहावें.

'शिवमस्तु' असा आशीर्वादात्मक श्लोक ह्मणावा. याचा अभिप्राय - सर्व जगाचें कल्याण होवो. लोक जन तेंच हित करोत दोषांचा नाश होवो. व जिनशासन चिरकालपर्यंत भूमंडलावर राहो. हा जिनधर्म चंद्र व तारे जगांत राही पर्यंत राहो. यम, नियम, तप यांनी साधुसंघाची वाढ होवो. नेहमी चैत्यालयांची वृद्धि होवो. व त्याचे जे अधिकारी व संरक्षक लोक आहेत त्याचे कल्याण होवो. त्याचे नेहमी आरोग्य असो.

चैत्यालयाच्या चारी दिशेमध्ये शास्त्रकथित चार कुंडानीं युक्त असा होममंडप करावा. या मंडपामध्ये संकल्पपूर्वक

परमसुखसमृद्धान्युक्तिशास्त्राविरुद्धान् ॥
बहुविधगुणवृद्धान्सर्वलोकप्रसिद्धान् ॥
प्रमितसुनयसिद्धान्सस्तुवे सर्वसिद्धान् ॥ इत्यर्घ्यं दद्यात् ॥

तत आसनस्थापनादिचतुरस्त्रकुंडार्चनपर्यंतविधिं विधाय क्षिपामि कुंडे इत्यादिना परिधिपरस्तरणकल्पनं । आम्नायेत्यादिना गार्हपत्याग्नेः स्थापनं रक्षणं सन्निधीकरणैकसमिधाहुत्यर्चनानि परिसमाप्य गुणाब्धिभूतमानेत्यादिना दिक्पालपूजापर्यंतमावरणदेवतापूजाविधिं विदध्यात् ॥ नव्येन गव्येनेत्यादिनाष्टादशवारोच्चारितपद्यमंत्रैरष्टोत्तरशतमाज्याहुतिं, लवंगलाजेत्यादिना त्रिवारोच्चारितपीठिकामंत्रैर्लाजाहुतिं, तैर्मंत्रैस्तर्पणं समिधाहुतिं, पीठिकादिसप्तविधमंत्रैरन्नाहुतिं, जिनेश्वराणामित्यादिना पूर्ववत्पुनराज्येन पूर्णाहुतिं पुण्याहवाचनं, तीर्थेश्वरस्यांत्येत्यादिनाग्नेरर्चनं, सर्वाभ्युदयेत्यादिना तस्य स्तवनं, अर्हन्विभर्पीत्यादिना जिनेश्वरस्तवनं, जयजय जिन शश्वदित्यादिना इष्टप्रार्थना, स जयतु जिनधर्म इत्यादिना शुभानुध्यानं, प्रमादादित्यादिना क्षमापणं, प्रक्षीणेत्यादिना सिद्धपरमेष्ठिविस-

---

पूजेपर्यंत आवरणदेवतापूजन करावे. ' नव्येन गव्येन ' हा श्लोक म्हणून अठरा वेळा उच्चारलेल्या महा मंत्रांनी १०८ आज्याहुति द्याव्यात. ' लवंगलाजेत्यादि ' हा श्लोक म्हणून तीन वेळा उच्चारलेल्या पीठिका मंत्रांनी लाजाहुति द्याव्या. यांच मंत्रांनी तर्पण व समिधाहुतिही करती. पीठिका वगैरे सात प्रकारच्या मंत्रांनी अन्नाहुति द्यावी. ' जिनेश्वराणां ' हा श्लोक म्हणून तुपाने पूर्णाहुति, पुण्याहवाचन, ' तीर्थेश्वरस्य ' या श्लोकाने अग्निपूजा, ' सर्वाभ्युदय ' या श्लोकाने अग्निस्तवन, ' अर्हन्विभर्पीत्यादि ' याने जिनस्तुति, ' जय जय जय जिन ' याने इष्टप्रार्थना, ' स जयतु ' याने शुभानुध्यान, ' प्रमाद ' याने क्षमा मागणे, ' प्रक्षीण ' याने सिद्धपरमेष्ठींचे विसर्जन, ' इष्टास्ते-

जीनं, इष्टास्तेमीत्यादिना होमार्थमाहूतदेवतानां विसर्जनं. मोहध्वांतविदारणमित्यादिना गमनाप्रच्छनं विधिवद्विदध्यात् ॥ इति शांतिशुद्ध्यभिधानहोमविधिः ॥

अथातो दर्भशयनाविधानम् ॥

तावद्गर्भगृहे दर्भशय्योचितभूमौ पूर्ववद्भूमिशोधनादीर्थि दर्भन्यासं भूम्यर्चनं च विदध्यात् ॥

हेमादिना चंदनदारुणा वा पयोद्रुमैर्वा रचितं सुरम्यम् ॥
भद्रासन भद्रकरार्हदम्बां संकल्पतोऽस्मिन्विनिवेशयामि ॥
ओं ह्रीं जिनमातृभावस्थापनार्थं भद्रपीठमिह स्थापयामि स्वाहा ॥१॥
वल्मीकशैलाब्धिनदीह्रदानां मृद्भिः समनौंषधिचंदनाभिः ॥
जिनांबिकागर्भविशुद्धिबुध्या भद्रासनाग्रं परिलिंपयामि ॥
ओं ह्रीं पंचमृत्तिकाचंदनसर्वौषधीभिः भद्रपीठाग्रं परिलिंपयामि स्वाहा ॥२॥

---

मीत्यादिना ' या श्लोकानें होमासाठीं [illegible] देवतांचें विसर्जन [illegible] ' मोहध्वान्तविदारणं ' याने जाण्याविषयी सिद्धपरमेष्ठिनी परवानगी घेणे. याप्रमाणे शांति[illegible] विधि [illegible], [illegible]

दर्भशयन विधिः ;

१ प्रथमतः गर्भगृहामध्यें दर्भशय्येला योग्य [illegible]

२ ' हेमादिना ' हा श्लोक व त्याचा मंत्र म्हणून जिनमातेला [illegible] करावी. [illegible] भद्रपीठ सोन्याचा, चांदीचा, किंवा चंदन अथवा [illegible] करावा.

२ ' वल्मीकेति ' हा श्लोक व त्याचा मंत्र म्हणून जिनमातेच्या गर्भशुद्धिचा [illegible] वारूळ, पर्वत, समुद्र, नदी, व डोह या ठिकाणची माती आणि चंदन व सर्वौषधि यांचा भद्रपीठाला लेप करावा.

नदीसरःसागरकूपवापीस्व नीततीर्थोदकपंचकेन ॥
दिक्कन्यकाकल्पितगर्भशुद्धिं मत्वात्र पीठं परिलेपयामि ॥
ओं ऱ्हीं तीर्थोदकपंचकेन भ॰ पीठाग्र प्रक्षालयामि स्वाहा ॥ ३ ॥
विश्वेश्वरागर्भगृहे विशुद्धे यस्मिञ्जिनेंद्रोऽजनि दिव्यपद्मे ॥
संकल्पतस्तस्य दलाष्टकाब्जं पीठोपरिष्ठात्स्फुटमालिखामि ॥
ओं ऱ्हीं भद्रपीठाग्रे अष्टदलकमलं लिखामि स्वाहा । धवलाक्षतैरष्टदलकमलविरचनम् ॥४॥
संलग्ने वदनं प्रविश्य भगवान्मातुः सितेभाकृति—
गर्भे श्र्यादिविशोधिते शुभतरद्रव्यैस्तु नाकाहृतैः ॥
दिव्यांभोरुहविष्टरे हि परमो हंसोधिशेते स्म यः ।
तं मत्वात्र विशुद्धबुद्धकमले बिंबोयमास्थाप्यते ॥

४ 'नदीसरः' हा श्लोक व मंत्र ह्मणून नदी, सरोवर, समुद्र, आड व दीर्घ विहीर या पाच ठिकाणच्या पाण्यांनी दिक्कन्यकांनी गर्भशुद्धि केली आहे असा संकल्प करून भद्रपीठप्रक्षालन करावें.

५ 'विश्वेश्वरेति' हा श्लोक व मंत्र ह्मणून भद्रपीठावर पांढऱ्या अक्षतांनी आठ पाकळ्यांचें कमळ काढावें. तीर्थंकर मातेच्या गर्भांत येऊन तेथें अष्टदलकमलामध्यें विराजमान होतात ह्मणून हा कमलाचा संकल्प भद्रपीठावर करावा.

६ 'संलग्नेति' हा श्लोक व त्याचा मंत्र ह्मणून पाण्यामध्यें स्थापिलेल्या प्रतिमेस भद्रपीठावरील कमलांत स्थापन करावें. जिनेश्वरांनी उत्तम मुहूर्तावर पांढऱ्या हत्तीची आकृति धारण करून मातेच्या गर्भामध्यें—जो स्वर्गीय दिव्य पदार्थांनी श्री वगैरे देवतांनी शुद्ध केला होता, प्रवेश केला. तेथें दिव्यकमलावर ते विराजमान झाले होते

वृषनाथप्रतिष्ठायां तु सितेभाकृतिरित्यत्र सितोक्षाकृतिरिति पठनीयम् ॥

ओं ऱ्हीं गर्भाशयमलकलंकरहिताय कपिलगोक्षीरशुद्धरुधिराय दर्भशयनाय स्वाहा ।

शंखकाहलादिनिःस्वने भव्यजनकोलाहलोपबृंहिते नभःस्थलमाक्रामति जलाधिवासितप्रतिमामानीय भद्रासनकमलमध्ये निवेशयेत् ॥ ५ ॥

भूसंस्कारे प्रजाते प्रथितसुरसरिद्वारिरत्नप्रसूनैः
सानंदे सर्वलोके निजमहिमभरात्कंपयन्निंद्रपीठम् ॥
मातुर्गर्भं प्रविश्याखिलदृगिव रविः प्राग्दिश रंजयंस्तां
गर्भे संवर्धते स्म त्रिजगदधिपतिर्यः स एवैष बिंबः ॥

ओं नमोऽर्हते केवलिने परमयोगिने शुक्लध्यानाग्निनिर्दग्धकर्मेंधनाय सोमाय शाताय वरदाय अष्टादशदोषवर्जिताय स्वाहा । जात्यकुंकुमपिंजरितपुष्पाक्षतं तस्या अन्यासां च प्रतिष्ठेयप्रतिमाना-

---

त्या कल्पनेचा संकल्प करून ही जिनप्रतिमा पीठांतील कमलामध्यें स्थापन केली जाते. ही प्रतिमा तेथें स्थापन करते वेळीं शंख वगैरे वाद्ये वाजवावीत. भगवान आकाशमार्गातून येथें अवतरले आहेत असा संकल्प करावा. आदिनाथ तीर्थकर मातेच्या गर्भी पांढऱ्या बैलाचा आकार धारण करून व बाकीचे तीर्थकर हत्तीचा आकार धारण करून अवतरले आहेत.

६ 'भूसंस्कारे इति' हा श्लोक म्हणून व मंत्र म्हणून प्रतिष्ठेय प्रतिमा व इतर प्रतिमा यांच्यावर पुष्पाक्षता टाकाव्यात. जिनभगवान् मातेच्या गर्भामध्ये वाढत आहेत हें सुचविण्याकरितां पुष्पक्षताक्षेपण करावें. जिनेश्वर गर्भात आले असता पृथ्वी निर्मल होते. गंधोदकासहित रत्न व फुलांची वृष्टि होते. सर्व लोक आनं-

मुपरि क्षिपेत् ॥ ६ ॥

स्वोपादाननिमित्तकारणकलापाविर्भवच्छाक्तिके ।
पुण्ये तीर्थकसाव्हये सृजति यः स्वौदारिकांग परम् ॥
शेते स्फाटिकदर्पणप्रतिमगर्भे त्रिबोधोज्ज्वल—
स्तत्संकल्पनतः करोमि विधिनास्मिन्दर्भशय्याविधिम् ॥

ओं श्रीं ऱ्हीं र्हं णमो अरिहंताणं असि आउसा गर्भाशयमलकर्मकलकरहिताय कपिलापंचगव्यशुद्धीकृताय दर्भशयनाय नमः स्वाहा ॥ अनेन सागमर्गक्रमस्थापनार्थं तस्याः प्रतिष्ठेयप्रतिमाया उपरि दर्भान् क्षिपेत् ॥ अचाल्यसौधबिंबानां पीठे दर्भान् क्षिपेत् ॥ ७ ॥

स्यात्क्षीरगौरं रुधिरं यदंगे निःस्वेदताद्युद्धगुणाभिरामे ।
तद्बुद्धितोहं कपिलाविशुद्ध गोक्षीरसेक विदधेऽत्र बिंबे ॥

---

दित होतात. जिनाचे गर्भात येण्यानें इंद्रसिंहासन हालू लागते. या सर्व गोष्टी करणारा जिनेश ह्मणजे ही प्रतिमा होय असा संकल्प करावा.

७ 'स्वोपादानेति' हा श्लोक व त्याचा मंत्र ह्मणून भगवंतांच्या सर्व अवयवांची उत्पत्ति होत आहे असा संकल्पानें प्रतिमेवर दर्भक्षेपण करावें. भगवान् स्वतःच्या उपादान व निमित्त कारणांनीं तीर्थकर नामकर्म मिळवितात. व त्याच्या साह्यानें उत्कृष्ट औदारिक शरीर बनवितात स्फटिकाच्या दर्पणाप्रमाणें निर्मळ अशा गर्भामध्यें भगवान निजतात हा संकल्प करून आह्मी दर्भशय्येची रचना करितों.

८ 'स्यादिति' हा श्लोक व मंत्र ह्मणून भगवंताचा लघु अभिषेक करावा व पूजन करावें. भगवंताच्या ठिकाणीं दुधाप्रमाणे पांढरें रक्त असतें. त्यांचे घाम न येणें वगैरे उत्कृष्ट गुणांनीं युक्त असें शरीर असतें हा

ओं ऱ्हीं कपिलागोक्षीररुधिराय स्वाहा ॥ लब्धमिषेकः ॥

स्वच्छैस्तीर्थ० । देवं समभ्यर्चये ॥ इत्यर्चनम् ॥ ८ ॥

मासान्नवास्तेस्म विभुर्जनन्या गर्भालयेम्भोरुहविष्टरे यः ॥

मत्वा तमेनं नवसूक्ष्मधौतवस्त्रावृतं बिंबमिमं तनोमि ॥

अनेन पूर्वप्रच्छादितवस्त्रमपनीयापरवस्त्रेणाच्छादयेत् ॥ ९ ॥

श्रीमत्सर्वजनीनेत्यादिना पूर्ववद्दिक्पालपूजां विदध्यात् । दिक्पालस्थापनं ॥

अथ दर्भहोमः ।

गर्भेस्थितस्यापि सतोऽस्ति यस्य मत्यादिबोधात्रितयं तदस्य ॥

संकल्पतः शुद्धिकृते च दर्भैः पुरोऽस्य बिंबस्य करोमि होमम् ॥

ॐ ऋक्षवृषभशांत्यर्हद्रोहिणि अप्रतिचक्रे फट् विचक्राय स्वाहा ।

इति दर्भशयनस्थिताजिनेंद्रप्रतिकृतेः पुरतः तद्विशुद्ध्यर्थं चतुरस्रहस्तविस्तारांगुलोत्सेधवालु-

---

सकल्प करून प्रतिमेचा गायीच्या दुधानें अभिषेक करावा.

९ 'मासान्नवेत्यादि' हा श्लोक व त्याचा मंत्र म्हणुन प्रतिमेचें पूर्वीचें आच्छादिलेलें वस्त्र काढून तिच्यावर नवे वस्त्र आच्छादावें. जिनेश्वर मातेच्या गर्भगृहामध्ये ९ महिनेपर्यंत पद्मसिंहासनावर विराजमान झाले या संकल्पानें प्रतिमेला वस्त्रावृत करावें. तदनंतर 'श्रीमदित्यादि' श्लोकांनी पूर्वीप्रमाणे दिक्पालपूजा करावी. दिक्पालांचें स्थापन करावें. तदनंतर दर्भहोम करावा.

'गर्भेति' हा श्लोक व मंत्र म्हणुन दर्भशय्येवर स्थापिलेल्या जिनप्रतिमेच्या पुढें चार हात विस्ताराचा व १ अंगुल उंचीचा असा वाळूचा उचवटा करून त्याची पूजा करून तेथें २७ वेळा दर्भांनी दर्भहोम करावा. गर्भात

कास्थंडिले संशोधितेऽभ्यार्चिते सप्तविंशतिकृत्वः कुशैरग्निं जुहुयात ॥

नाहं सपक्षोऽस्मि भवद्विपक्षदृष्ट्यावृतेर्वेष्टि तथा जनो माम् ॥
इत्यर्हतोऽग्रे वसतीव वक्त प्रसारये पाडुरकांडवस्त्रम् ॥ ११ ॥
ओं ऱ्हीं कांडपटस्थापनां करोमि स्वाहा ॥
त्रैलोक्यदीपस्य जिनेश्वरस्य बिंबं निवेश्योचितदर्भतल्पे ॥
तस्याग्रतोऽहं प्रतिबोधयामि द्वौ जाज्वलज्ज्वालयुतौ प्रदीपौ ॥१२॥ दीपद्वयस्थानम् ॥

अथ जिनमातृपूजनम् ॥

भर्त्रा सहैकासनसान्निविष्टा संस्नाप्य यां तीर्थजलैः सुरेन्द्राः ॥
दिव्यैर्विभूषांबरमाल्यमुख्यैरानर्चुरेनां वयमर्चयामः ॥ १३ ॥
ओं ऱ्हीं जगदंबिके स्नानवस्त्राभरणाद्यर्चनं गृहाण २ स्वाहा ॥

---

असलेले जिनेश्वर ३ ज्ञाने धारण करीत होते. हे व्यक्त करण्याकरिता त्या प्रतिमेपुढें दर्भहोम करावा.

'नाहं सपक्षोस्मि' हा श्लोक ह्मणून प्रतिमेपुढें पडदा सोडावा. हे जिना तुमचा शत्रु जें दर्शनावरणीय कर्म त्याच्याशी माझी सजातीयता नाही तथापि लोक मला तसे ह्मणतात हा अन्याय आहे. ही गोष्ट सांगण्याकरितांच जणु काय हा पडदा जिनेश्वरापुढें उभा राहिला आहे.

'त्रैलोक्येति' हा श्लोक ह्मणून प्रतिमेपुढें दोन दीप स्थापन करावेत. भगवान त्रैलोक्यदीप आहेत ह्मणून त्याच्या प्रतिमेपुढे २ दीप लावावेत.

'भर्त्रेति' हा श्लोक ह्मणून जगदंबिका अर्थात् भगवंताच्या मातेला सुंदर वस्त्रें, माला वगैरेंनी देवांनी पूजिलें तसेंच आह्मीही पूजितो असे ह्मणून वस्त्रादि पदार्थ पुढें स्थापन करावेत. तदनंतर जिनमातेचें स्तवन करावें. तें याप्रमाणेः— हे माते तत्काल तीर्थंकरनाम कर्माच्या उदयानें ज्यानें त्रैलोक्याला क्षोभित केलें आहे अशा पुत्राला

अथ जिनमातृस्तवनम् ॥

मातस्त्वमेव धन्यासि सद्योजात दधासि यत् ।
सद्यः स्वतीर्थकृत्पाकसंक्षोभितजगत्त्रयम् ॥१॥
स्वपुण्योद्भूतरत्नौघवृष्टितर्पितभूतलम् ॥
हिरण्यगर्भं गर्भे त्वां दधानां को न वंदते ॥ २ ॥
स्वगर्भकमलासीनजिनहंसोढजीवना ॥
सरसीव विभासि त्वमपूर्वा पंकहारिणी ॥ ३ ॥
अग्निगर्भा शमीवत्त्वमर्कगर्भेव पूर्वदिक् ॥
रत्नगर्भा महीवांबा जिनगर्भा विभासि नः ॥ ४ ॥
जगद्गर्भो जिनाधीशो भवद्गर्भे वसत्यहो ॥
अहो त्वत्पुत्रतामेति देवो लोकपितामहः ॥ ५ ॥
समस्तसुखसंपादिजिनपुण्यफलोद्भवा ॥
अपूर्वा कल्पलतिका स्वामिनी त्वमसि स्फुटम् ॥ ६ ॥

---

तूं धारण केलें आहेस. आपल्या पुण्याने रत्नसमूहांनी ज्यानें त्रैलोक्याला आल्हादित केले आहे म्हणून ज्यास हिरण्यगर्भ हे नाव मिळाळें आहे. अशा पुत्राला हे माते तू आपल्या गर्भात धारण केलें आहेस.

हे माते तूं कमलाने युक्त, हंसपक्षांनी युक्त अशा पाण्याला धारण करणारे, न चिखल रहित अशा सरोवराप्रमाणे आहेस. हे माते तुझ्या गर्भरूपी कमलावर जिनेश्वररूपी हंस बसला आहे त्यामुळें तुझे जीवन धन्य झालें

जगन्मात्रे नमस्तुभ्यं जगद्द्रष्ट्र्यै नमोस्तु ते ॥
जगद्धत्र्यै नमस्तुभ्यं जगल्लक्ष्म्यै नमोस्तु ते ॥ ७ ॥
विश्वेश्वरि जगन्मातर्महादेवि महामति ॥
पूज्ये सुमंगले तुभ्यं भूयो भूयो नमो नमः ॥ ८ ॥
इत्थ स्तुत्वा यामशेषाः मुनीन्द्रा, वंदेनऽस्मानदृत' श्याम्यदेव्यः ॥
स्थानाख्याद्यैः साधु निर्दिश्यमानास्ता सर्वेऽमी श्रीजिनानां नमामः ॥ ९ ॥
सर्वोऽपि संघो जिनमातृसघेन तां पीठीं स्तुत्वा वंदेत ॥
स्तुत्वा नत्वाप्यतृप्तः स्वयममरपतिस्तांडवं मंत्रितेने ॥
लास्यं तद्दो'सहस्रोपरिचितिसुरस्त्रीजनश्चाववंध ॥
गीतं वाद्यं युयोज प्रणुतसुरगणो यत्पुरोर्हज्जनन्याः ॥

---

आहे व तूं लोकांचे पातक नाहीसे करणारी आहेस. शमीच्या आड़ांत अग्नि असतो त्याप्रमाणें जिनबालकाला तू आपल्या गर्भामध्यें धारण केलें आहेस. सूर्याला आपल्या गर्भांत धारण करणारी पूर्व दिशा जशी शोभते; अनेक रत्नें आपल्या पोटात धारण करणारी पृथ्वी जशी शोभते तशी तू जिनबालाला स्वगर्भी धारण करण्यामुळें शोभत आहेस. त्रैलोक्याला आपल्या गर्भांत धारण करणारा जिनेश्वर हे माते तुझ्या गर्भांत आहे हें आश्चर्य आहे. त्रैलोक्याचा पितामह ( आजोबा ) असा जिनेश्वर तुझा पुत्र होणार आहे हें आश्चर्य आहे. सर्व सुखाला देणारें असें जिनेश्वररूपी पुण्यफल तुझ्यापासून उत्पन्न होणार म्हणून हे स्वामिनी तूं खरोखर अपूर्व कल्पलता आहेस. हे जगन्माते तुला आम्ही नमन करितो. तू लोकांचे नेत्र आहेस. तूं जगाचा आधार आहेस व तू जगल्लक्ष्मी आहेस याम्तव आम्ही तुला वारंवार नमन करितो. हे माते तुला विश्वेश्वरी, जगन्माता, म-

संकल्पात्तस्य तौर्यत्रिकमिदमथाभिद्विबमालक्ष्य योक्ष्ये ॥१०॥
इंद्रपरिकल्पितानंदनाटकसंकल्पेन तदग्रे तौर्यत्रिकं प्रयुंजीत ॥
लोकत्रयस्यापि पितुः पिता त्वं धन्योसि मान्योसि महेश्वरेति ॥
स्तुत्वा समापृछ्य च सप्रमोदाः प्रपेदिरे स्वस्वपदं सुरेन्द्राः ॥११॥

जिनजनकस्य सुरैस्तवनपूर्वकं गमनाप्रच्छनम् ॥

आवेद्यासनतः क्रिया प्रणमनं पश्चाद्विधेया स्थिति—
स्त्र्यावर्तैकाशिरोनतिः प्रथमतः साम्यं तदंतेपि च ॥

---

हादेवी, महासती, पूज्या व सुमंगला अशीं नांवें आहेत अशा नांवांना धारण करणाऱ्या तुला आम्ही पुनः पुनः नमन करितो. याप्रमाणें सर्व देवेंद्र मातेची स्तुति करीत असतात. श्री वगैरे देवी मातेला इंद्रादिकांची ठिकाणें नांवें वगैरे सांगून माहिती देतात. या ठिकाणीं जिनमातेचा सकल्प केलेल्या भद्रसिंहासनाला सर्व संघांनीं स्तवन करून वंदना करावी. मातेच्या पुढें इंद्र त्यावेळीं नृत्य करितो. आपले हजार हात उत्पन्न करून त्यावर देवांगनांचें नृत्य करवितो. गाणें वजावणें वगैरे प्रकार सर्व देव करितात. इंद्रादि देव असा उत्सव करितात हा संकल्प करून नृत्य, गाणें वजावणें हा विधि करावा.

तदनंतर देव तीर्थंकराच्या पित्याची स्तुति करून स्वस्थानीं जाण्यास त्याची परवानगी मागतात. ते जी स्तुति करितात ती याप्रमाणें —

'लोकत्रयाचा पिता अशाही तीर्थंकराचे आपण वडिल आहात. आपण धन्य, मान्य व सर्वांचे अधिपति आहांत' अशा स्तुतिनंतर आनंदित होऊन ते स्वस्थानीं जातात. गर्भावतार कल्याण क्रिया मी करितो असें आसन घालून ह्मणावें. तदनंतर नमस्कार करावा. व मग उठून प्रथम तीन आवर्त व एक नमस्कार करून सामा-

यस्मिन्केवलबोधभानुरुदितः सोव्याज्जिनोऽयं जगत् ॥

ओं श्रीं ऱ्हीं हं श्रीं नमः परमशांताय सर्वलोकशांतिर्भवतु स्वाहा ॥ शांतिधारा ॥१६॥

अर्चामग्रे प्रनृत्यत्कलशयुतवधूमग्रभृंगारनिर्यद् ॥
वार्धारापूतधात्रीं बहुतरविभवामादरेणानुयांतः ॥
सर्वाशाः पूरयंतो बलिमनुमुखराः सर्वधान्यैश्च लाजैः ॥
सत्पुष्पैरक्षतौघैर्जिनानिलयामिमे त्रिःपरीयाम शान्त्यै ॥

ओं ऱ्हीं अर्हद्भ्यो नमः ॥ १७ ॥

इत्थं सौधर्मशक्रप्रभृतिसुरवरा यां जिनेंद्रस्य साक्षात् ॥
चक्रुः स्वर्गावतारोत्सवविषयमहाश्चर्यकल्याणपूजाम् ॥
तामारोप्यात्र बिंबे विधिवदिह कृता शक्तितो भूरिभक्त्या ॥
भक्त्यै मुक्त्यै च यष्टृप्रभृतितनुभृतामस्तु कल्यापूजा ॥ १८ ॥

---

त्रैलोक्याचें रक्षण करो. हा श्लोक ह्मणून शांतिधाराक्षेपण करावें.

१७ 'अर्चामग्रे' हा श्लोक ह्मणून हातांत जिनप्रतिमा घेऊन मोठ्या थाटानें जिनमंदिरास तीन प्रदक्षिणा घ्याव्यात. त्यावेळीं लाह्या, फुलें व इतर धान्येंही फेकावींत. हातामध्ये भृंगार घेऊन जलधारा सोडावी. जिच्या डोक्यावर कलश आहे अशा स्त्रीला पुढें करावें व प्रदक्षिणा कराव्यात.

१८ 'इत्थमित्यादि' याप्रमाणें सौधर्म वगैरे इंद्रांनी व देवांनीं जिनेश्वराचा गर्भ कल्याण विधि केला, आह्मी या जिनबिंबामध्यें गर्भकल्याणिक विधिचा उत्सव यथाशक्ति अत्यंत भक्तीनें केला काहे. ही गर्भकल्याणिक पूजा इंद्र (प्रतिष्ठाचार्य) वगैरेंना–प्रतिष्ठाकारक वगैरे मंडळींना भक्ति व मुक्ति प्राप्त करून देणारी होवो.

प्रमादाऽज्ञानदर्पाद्यैर्विहितं विहितं न यत् ॥
जिनेंद्रास्तु प्रसादात्ते सकलं सकलं च तत् ॥ क्षमापणम् ॥ १९ ॥
मोहध्वांतविदारणं विशदविश्वोद्भासिदीप्तिश्रियम् ॥
सन्मार्गप्रतिभासकं विबुधसंदोहामृतापादकम् ॥
श्रीपादं जिनचंद्रशांतिशरणं सद्भक्तिमानोमिते ॥
भूयस्तापहरस्य देव भवतो भूयात्पुनर्दर्शनम् ॥ २० ॥
इत्थं विधत्ते जिनपुंगवस्य गर्भावतारोत्सवसंविधिं यः ॥

---

१९ 'प्रमादादिति' प्रमादानें, अज्ञानानें व गर्वानें मजकडून हा विधि कदाचित् शास्त्रविहित झाला नसेल. यास्तव हे जिनेंद्रा आपल्या कृपेने तो सर्व विधि पूर्ण होवो असा श्लोक ह्मणुन क्षमा मागावी.

२० 'मोहध्वांतेति' हे शांतिजिनेशा ! आपले शोभिवंत चरण मोहांधकाराचा नाश करितात. निर्मल व जगताला प्रकटित करणाऱ्या केवलज्ञानाच्या उज्ज्वल शोभेला धारण करितात. सन्मार्ग दाखवितात. विद्वानाच्या समूहाला मोक्षाचा उपदेश करितात. यास्तव आपल्या चरणास मी नमस्कार करितो. संसार ताप दूर करणाऱ्या हे शांतिजिनेशा ! आपलें पुनः दर्शन होवो.

२१ 'इत्थमित्यादि' याप्रमाणें—या अध्यायांत सांगितल्याप्रमाणें जो जिनेश्वराचा गर्भावतारकल्याणविधि करितो. धर्मरथाची धाव असलेला तो लौकर गर्भावतारोत्सव विधीला प्राप्त होतो अर्थात् तो तीर्थकर नाम क

गर्भावतारोत्सवमाशु याम्यत्यमुव भूत्वा स हि धर्मनेमिः ॥ २१ ॥

इत्यर्हत्प्रतिष्ठासारसंग्रहे नेमिचंद्रदेवविरचिते प्रतिष्ठातिलकनाम्नि गर्भावतारकल्याणविधिर्नामाष्टमः परिच्छेदः ॥ ८ ॥

---

र्माचें उपार्जन करितो यामुळें पुढील जन्मीं देवाकडून त्याचा गर्भकल्याणिक विधि होईल.

याप्रमाणें नेमिचंद्रदेवांनीं रचिलेल्या, अनेक प्रतिष्ठांचा सार ज्यामध्यें संगृहीत केला आहे अशा प्रतिष्ठातिलक नांवाच्या ग्रंथांतील हा आठवा अधिकार समाप्त झाला ॥ ८ ॥

# अथ नवमः परिच्छेदः ।

अथ जन्माभिषेककल्याणम् ॥

अंकुरार्पणतः पश्चात्सप्तमे दिवसे दिवा ॥<br>
जन्माभिषेककल्याणपूजां कुर्याद्यथाक्रमम् ॥ १ ॥<br>
मूलवेद्यां समाराध्य पूर्ववद्यागमंडलम् ॥<br>
वेदीं गत्वोत्तरा तत्र वक्ष्यमाणविधानतः ॥ २ ॥<br>
पुष्पांजल्यादिकलशस्थापनांतविधिं चरेत् ॥<br>
ततः स्नपनवेद्यां तु पंचमंडलवर्तनम् ॥ ३ ॥<br>
तत्र स्नपनपीठस्य स्थापनं तद्विधानतः ॥<br>
दर्भशय्यास्थिते बिंबे ततः शक्रैर्विधीयते ॥ ४ ॥

---

अथ जन्माभिषेककल्याण ॥

१ 'अंकुरेति' अकुरार्पण विधि झाल्यानंतर सातवे दिवशीं दिवसा जन्माभिषेककल्याणपूजेचा विधि प्रतिष्ठाशास्त्रांत सांगितलेल्या क्रमाने करावा.

२–३ 'मूलवेद्यामिति' मूलवेदीवर पूर्वीप्रमाणे यागमंडलविधि करावा. तदनंतर उत्तरवेदीकडे जाऊन पुढें सांगितलेल्या प्रकाराने पुष्पांजलिक्षेपणापासून कलशस्थापनापर्यंत सर्व विधि करावा. तदनंतर स्नपनवेदीवर (अभिषेक करण्याचा वेदीवर) पंचमडल काढावें.

जिनजन्मोत्सवारोपो वस्त्रापनयनं ततः ॥

जिनजन्मस्थापनं तन्मात्रादिस्तुतिपूर्वकम् ॥ ५ ॥

निःस्वेदत्वाद्यतिशयारोपणं विजयादिभिः ॥

उपासना जिनांबाया जातकर्म च तत्कृतम् ॥ ६ ॥

प्रतिज्ञाकारसंशुद्धेरिंद्रादित्रिदशागमः ॥

शच्यार्हतोऽर्पणं पत्युः सुमेरौ प्रापणं सुरैः ॥ ७ ॥

पूर्वस्थापितपीठाग्रे प्रतिमाविनिवेशनम् ॥

अभिषेकोपकरणसज्जीकरणमन्वतः ॥ ८ ॥

प्रतिमांगपरामर्शः सकलीकरणं ततः ॥

---

१–५ 'तत्रात' तेथें अभिषेकपीठ शास्त्रोक्तविधीनें स्थापावें. हा विधि झाल्यानंतर दर्भशय्येवर असलेल्या जिनबिंबावर इंद्राकडून जिनजन्मोत्सवारोपण केलें जातें. हें आरोपण केल्यानंतर, जिनप्रतिमेचें गुंडाळलेलें वस्त्र काढावें. जिनेश्वराच्या जन्माची स्थापना करावी व मातेची स्तुति करावी.

६–७ 'निःस्वेदत्वादि' घाम न येणें, शरीर सुगंधित राहणें वगैरे जन्माच्या दहा अतिशयांची स्थापना करावी. विजयादि देवताकडून जिनमातेची आराधना व त्यांनी केलेला जातकर्मविधि करावा. आकार शुद्धि जिनाच्या देहाची अंतःशुद्धि व बहिःशुद्धि करावी. इंद्रादि देवतांचें आगमन हा विधि करावा. इंद्राणीनें जिनबालकाला इंद्राच्या स्वाधीन केलें हा विधि करावा. देवांनी जिनबालकाला मेरुपर्वतावर नेलें हा विधि नंतर करावा.

८ 'पूर्वस्थापितेति' पूर्वी स्थापना केलेल्या सिंहासनावर जिनप्रतिमेचें स्थापन करणें हा विधि व अभिषेकाचीं उपकरणें सज्ज करणें हा विधि करावा.

प्रधानपूजया पंचमंडलस्य समर्चनम् ॥ ९ ॥
जिनमंत्रेण बिंबस्य सप्तवाराभिमंत्रणम् ॥
कुंभे पुष्पादिनिक्षेपो बिंबाग्रे कुसुमांजलिः ॥ १० ॥
सुलग्ने प्रतिमानेत्रोल्लेखनं विश्वकर्मणः ॥
पटापसरणं सर्पिर्वत्सवद्गोप्रदर्शनम् ॥ ११ ॥
यष्ट्रा सम्माननं तस्य तेनेंद्रानुमतेन तु ॥
पीठाग्रन्यस्तसद्धूलिकुंभेनार्चाभिषेचनम् ॥ १२ ॥
जीवत्पितृश्वशुरपत्यात्मजस्त्रीकरेषुभिः ॥
संप्रोक्षणं चाष्टसम्मार्जनकुंभाभिषेचनम् ॥ १३ ॥
नीराजनं चाष्टभेदं भवेत् पुष्पजपस्ततः ॥
आव्हानाद्यवशिष्टैस्तु कलशैराभिषेचनम् ॥ १४ ॥

---

९ 'प्रतिमांगेति' प्रतिमेच्या अगाला स्पर्श करून सकलीकरण करावें तदनतर प्रत्येक पूजेनें पांच मंडलांचें पूजन करावे.

१०–११ जिनमंत्रानें जिनप्रतिमेवर सात वेळा अभिमंत्रण विधि करावा व कुंभामध्ये फुलें वगैरे टाकावीत. प्रतिमेपुढें कुसुमांजलि टाकावी. उत्तम लग्नावर शिल्पकाराकडून नेत्रोन्मीलन क्रिया करवावी. तदनंतर पुढें टाकिलेला पडदा बाजूला सारावा. तुपाचें पात्र व सवत्सगोप्रदर्शन करवावें. प्रतिष्ठाकारानें शिल्पकाराचा सम्मान करावा व प्रतिष्ठाचार्यांनी मान्य केलेल्या त्या शिल्पकाराकडून जिनप्रतिमेवर धूलिकुंभाभिषेक करावा.

१२–१५ तदनंतर ज्यांचे आईबाप, सासुसासरे, पति व मुलें जिवंत आहेत अशा सुवासिनी स्त्रियाकडून दर्भा-

चतुर्विधावतरणं चतुःकुंभाभिषेचनम् ॥
पुष्पवृष्टिर्मध्यकुंभेनाभिषेकोष्टधार्चनम् ॥ १५ ॥
वज्रेण कर्णवेधोथ स्त्रीभिश्चंदनचर्चनम् ॥
भूषासन्नामकरणमानंदस्तवनं क्रिया ॥ १६ ॥
आनंदनर्तनं पश्चात् नगर्यानयनं विभोः ॥
राजांगणे स्थापनं स्यादंबायै सन्निधापनम् ॥ १७ ॥
तस्याः स्तुतिः प्राभृतं च नृत्यं रक्षादिसंविधिः ॥
गुरुपूजोपलंभोऽथ तत्तत्तीर्थंकरोचितम् ॥ १८ ॥
राज्यभोगानुभवनसमं देवेंद्रसेवया ॥
शांत्यर्थबलिरिष्टार्थप्रार्थना चेत्ययं क्रमः ॥ १९ ॥

च्या द्वारें प्रोक्षणविधि करावा. तदनंतर आठ सम्मार्जन कुंभानी अभिषेक करवावा. आठ प्रकारचा नीराजनाविधि करवावा. तदनंतर पुष्पजप करावा. मग आव्हान वगैरे करून कलशांनी अभिषेक करावा. चार प्रकारचें अवतरण करावें. चार कुंभांनीं अभिषेक करावा. पुष्पवृष्टि करून मध्यकुंभानें अभिषेक करावा. अष्टद्रव्यांनीं पूजा करावी. वज्रानें कर्णवेध करावा. व सुवासिनी स्त्रियांनीं प्रतिमेच्या अंगाला चंदन लावावे, भूषणें नेसवावींत व इंद्रानें जिनाचें नाव ठेवावें व स्तुति करावी. आनंदनृत्य करून जिनेश्वरास परत शहरांत आणून राजांगणांमध्यें स्थापन करून मातेजवळ त्यास द्यावें. मातेची स्तुति करून तिला नजराणा अर्पण करावा. नृत्य करून जिनबालकाचें रक्षण करण्यासाठी देवदेवींची नेमणूक करावी. गुरुपूजेचा विधि करावा.

जन्माभिषेककल्याणविधानस्यावगम्यताम् ॥

तत्तत्कर्मविशेषस्तु प्रयोगे प्रतिपाद्यते ॥

अथ जन्माभिषेककल्याणविधेः प्रयोगमभिधास्यामः ॥

तत्रादौ तावन्मूलवेद्यां प्रतिष्ठायन्त्राराधनां पूर्ववन्निष्ठाप्योत्तरवेद्यां पुष्पांजल्यादिपीठस्थापनांतं विधिं विदध्यात् ॥ तद्यथा ॥

श्रीमत्पंचमवार्धिनिर्मलपयःपूरैः सुधासंनिभैः ॥
यज्जन्माभिषवं सुराद्रिशिखरे सर्वे सुराश्चक्रिरे ॥
त्रैलोक्यैकमहापतेर्जिनपतेस्तस्याभिषेकोत्सवं ।
कर्तुं भव्यमलोपलेपविलयं प्राज्ञैः स्तुतं प्रस्तुवे ॥

ओं ऱ्हीं श्रीं क्षीं भूः स्वाहा ॥ प्रस्तावनापुष्पांजलिः ॥ १ ॥

---

करावा तदनंतर त्या त्या तीर्थकरांना उचित असा राज्यभोगानुभवन विधि करावा. देवेंद्र येऊन सेवा करणें, हा विधि करावा.

तदनंतर शांतिबलि व इष्टप्रार्थना हा विधि करावा. याप्रमाणें जन्माभिषेक कल्याणविधि करावा. हा विधि आतां सप्रयोग आह्मी दाखवितो. आतां जन्माभिषेक कल्याणाचा प्रयोग आम्ही सांगतो. प्रथमतः मूलवेदीवर प्रतिष्ठायंत्राची आराधना करून उत्तरवेदीवर पुष्पांजलिक्षेपणापासून पीठस्थापनापर्यंतचा विधि करावा. तो याप्रमाणें:--

'श्रीमदित्यादि' हा श्लोक ह्मणुन व मंत्र ह्मणून प्रस्तावना पुष्पांजलि करावी.

घंटाटंकारवीणा० ॥ लतांतांजलिं प्रोत्क्षिपामः ॥ ओं परमब्रह्मणे नमोनमः स्वस्ति २ जीव २ नंद २ इत्यादि सोदकानि पुष्पाणि क्षिपेत् ॥

पूर्ववत्क्षेत्रपालवास्तुदेवबलिं वायुमेघाग्निदेवैः भूमिशोधनं नागतर्पणं दर्भन्यासं भूम्यर्चनं मंडपप्रतिष्ठां वेदिकाप्रतिष्ठां च क्रमेण विदध्यात् ॥

अथ कलशस्थापनविधानम् ॥

ओं विशोधितभूभागपरिकल्पितप्रतिष्ठितमंडपमंडनीयांतःप्रतिष्ठामहितमहावेदिकायां। पूर्वाग्रैः पोडशभिरुत्तराग्रैस्तावद्भिः सूत्रैः पंचविंशत्युत्तरशतद्वयपदानि कलशप्रमाणेन परिकल्प्य तत्र बहुमध्यभागे महाकुंभं विन्यस्य सर्वतस्तन्मध्यवीथीं परित्यज्य । मध्यकुंभाद्वीथेर्वीथीं परित्यज्य, प्रथमद्वितीयतृतीयचतुर्थावरणेषु क्रमेण चतुरो, विंशतिं, षट्त्रिंशतं, द्विपंचाशतं, घटान् यथाविधि व्रीह्यासने

---

'घटाटकार' हा श्लोक व त्याचा मंत्र ह्मणून उदकासहित पुष्पक्षेपण करावें. पूर्वीप्रमाणेच क्षेत्रपाल व वास्तुदेव याना बली अर्पण करावा. वायु, मेघ व अग्नि यांच्याद्वारे भूमिशोधन करावे. नागतर्पण, दर्भन्यास, भूमिपूजन, मंडपप्रतिष्ठा व वेदिकाप्रतिष्ठा हे विधि क्रमाने करावेत.

तदनंतर कलशस्थापनविधि करावा. तो याप्रमाणेः—शुद्ध अशा जमिनीवर उभा केलेल्या प्रतिष्ठामंडपाला शोभा आणणाऱ्या मोठ्या वेदिकेवर कलशाभिषेकयंत्र लिहावें. त्यामध्यें आडव्या सोळा व उभ्या सोळा अशा रेघा समांतराने कुंभ ठेवता येतील अशा बेतानें काढाव्यात. ह्मणजे त्यांत २२५ कलश मावतील अशी कोष्टके तयार होतात. बिलकुल मध्यभागी महाकुंभ स्थापावा. सर्वांत मध्य जो मार्ग आहे तो सोडून द्यावा. पहिले, दुसऱ्या, तीसऱ्या व चौथ्या आवरणामध्यें क्रमानें चार, वीस, छत्तीस, व बावन कुंभांची यथाविधि रचना करावी. प्रथमतः तांदुळ पसरून त्यावर कुंभ ठेवावेत. पुढे सांगितलेल्या मंत्रांतील वस्तु टाकाव्यात. कोणा-

विरचितयंत्रे विन्यस्य तेषु वक्ष्यमाणमंत्रोदिततत्तद्द्रव्याणि यथोचितमापूर्य कोणेषु द्रोणांभःसंभृतकुंभान्समवस्थाप्य तेषु रैरत्नसर्वगंधकुशकूर्चमंगलद्रव्यसुरभिपुष्पाणि विनिक्षिप्य छेदभेदाद्यष्टदोषवर्जितानमलसितसूत्रसमावृतानंभोजबीजपूरपिहिताननान् । चंदनपंकपरिलग्नवलक्षाक्षतपुंजोपलक्षितान् प्रसूनमालांबरफलपल्लवदूर्वादर्पणादिपरिष्कृतानिमान्सर्वान्कुंभान्संपूजयामहे । पुष्पांजलिः ॥

कल्याणावसरे विभोरर्हतः शक्रेण ये स्थापिताः
तेऽमी इत्यभिकल्पनां स्फुटयतः श्रीशातकुंभादिभिः ॥
निर्वृत्तानथवा मृदाभिघटितान्कालादिदोषोज्झितां-
स्तत्तद्द्रव्यसुपूरितानिह घटान्यंत्रोपरि स्थापयेत् ॥
ओं ऱ्हीं स्वस्तये कलशस्थापनं करोमि स्वाहा ॥ २ ॥
श्रीखंडकर्पूरवरादिगंधद्रव्यप्रसूनोत्तमरिक्थरत्नम् ॥
क्षिपामि मध्यस्थमहाघटेऽस्मिन्गलस्थवस्त्रादिविराजमाने ॥

तील कुंभामध्ये पाणीभरून त्यांत रत्न दर्भ वगैरे सुगंधित द्रव्यें टाकावींत. कुंभ फुटलेले, चिरलेले, वगैरे आठ दोषांनीं रहित असावेत. पांढऱ्या सुतानें गुडाळलेले, मुखावर कमल किंवा बीजपूर ( महाळुंग ) असलेले असे असावेत. त्यांना गंध अक्षता वगैरे लावाव्यात. फुलांच्या माळा, वस्त्र, पानें, दुर्वा इत्यादिकांनीं त्यांना शोभा आणावी. अशा रीतीनें कुंभांची रचना करून त्यांच्या पूजनासाठीं प्रथम पुष्पांजलि क्षेपण करावी.

२ ' कल्याणेति ' हा श्लोक ह्मणून जन्माभिषेकाचे वेळीं इंद्रानें ज्या कुंभाची रचना केली होती तेच हे आहेत असें समजून कलशांची स्थापना करावी.

३ ' श्रीखंडेत्यादि ' हा मंत्र ह्मणून कुंभामध्यें रत्न वगैरे टाकावेत.

ओं ह्रां ह्रीं ह्रौं ह्रः नमोऽर्हते भगवते श्रीमते पद्ममहापद्मतिगिंछकेसरिमहापुंडरीकपुंडरीकगंगासिंधुरोहिद्रोहितास्याहरिद्धरिकांतासीतासीतोदानारीनरकांतासुवर्णरूप्यकूलारक्तारक्तोदापयोधिपु शुद्धजलं स्वर्णघटप्रक्षालितपरिपूरितं नवरत्नगंधपुष्पाक्षताद्यर्चितामोदकं पवित्रं कुरु २ झ्रौं २ वं म हं सं तं पं ह्रीं असि आउसा नमः ॥

अनेन मध्यमहाकुंभे रैरत्नादिनिक्षेपणम् ॥ ३ ॥

सर्वेषु कुंभेपु च सर्वगंधं क्षिपामि वारा परिपूरितेपु ॥
शेषेपु योग्यार्थसुपूरितेपु न्यसामि सर्वेपु कुशस्य कूर्चम् ॥
जलकुंभेपु सर्वौषधिस्थापनं सर्वकुंभेपु कूर्चस्थापनं च ॥
यन्मंगलद्रव्यमिति प्रतीतं बिसं च बोधिद्रुमपल्लवं च ॥
क्षिपाम्यपामार्गदलं च पूतं तत्कोणकुंभेपु विभूषितेपु ॥

कोणकुंभेपु मगलद्रव्यानिक्षेपणम् ॥

स्वच्छैस्तीर्थै० कुंभान्समभ्यर्चये । ओं ह्रीं नेत्राय संवौपट् ॥ कलशार्चनम् ॥

इति कलशस्थापनविधिः ॥

'सर्वेपु कुंभेपु इति' हा श्लोक व मंत्र ह्मणून जलकुंभामध्यें सर्वौपधिक्षेपण करावें आणि सर्व कुंभामध्ये कूर्च स्थापन करावें.

'यन्मंगलद्रव्यमिति' हा श्लोक ह्मणून कोणांतील कुंभामध्ये मंगलद्रव्ये टाकावीत. 'स्वच्छैस्तीर्थै' हा श्लोक व मंत्र ह्मणून कलशार्चन करावें.

## अथ चूर्णपंचकस्थापनम् ॥

वेद्यां मंडलमालिखार्चितसितैश्चूर्णैः सिताकल्पभृ—
न्नागाधीशधनेश पीतवसनालंकारपीतैश्च तैः ॥
नीलैर्नीलभ नीलवेषसुरभो रक्ताभ रक्तैस्ततो
रक्ताकल्पककृष्णवेषविलसन्कृष्णैश्च कृष्णप्रभ ॥

ओ ऱ्हीं श्वेतपीतहरितारुणकृष्णमणिचूर्णं स्थापयामि स्वाहा ॥ चूर्णपंचकस्थापनम् ॥

तदेवं चूर्णानि संस्थाप्य वेदिकामध्ये पीतचूर्णेन कर्णिकां तद्बहिर्लोहितचूर्णैरष्टदलानि, तद्बहिः श्वेतपीतहरितारुणकृष्णचूर्णैः क्रमेण चतुःकोणयुतपंचमंडलानि विरच्य सुवर्णशलाकया अपामार्गलेखन्या वा दर्भेण वा कर्णिकायां॥ ओं ऱ्हीं अर्हद्भ्यः स्वाहा इत्यर्हन्मंत्रम्। पूर्वादिदिग्दलेषु ओं ऱ्हीं सिद्धेभ्यः स्वाहा। ओं ऱ्हीं सूरिभ्यः स्वाहा। ओं ऱ्हीं पाठकेभ्यः स्वाहा। ओं ऱ्हीं सर्वसाधुभ्यः स्वाहा॥ इति सिद्धादिमंत्रान्। आग्नेयादिविदिग्दलेषु॥ ओं ऱ्हीं जिनधर्मेभ्यः स्वाहा। ओं ऱ्हीं जिनागमेभ्यः स्वाहा॥

---

'वेद्यामिति' हा श्लोक ह्मणून पांढरा, पिंवळा, हिरवा, तांबडा, काळा या पांच रंगांचें स्थापन करावें. वेदिकेमध्ये कमल रचावें. त्याच्या कर्णिकेमध्यें पिवळा रंग भरावा. त्या कमळाच्या आठ पाकळ्यांत तांबडा रंग भरावा. या आठ पाकळ्याच्या बाहेर चौकोनी पांच मंडळें काढावी व त्यामध्यें क्रमानें पांढरा पिवळा, हिरवा, तांबडा व काळा हे रंग भरावेत. सोन्याची लेखणी, अघाडा किंवा दर्भाच्या लेखणीनें कर्णिकेमध्यें अर्हंताचा मंत्र लिहावा. व पूर्व, दक्षिण, पश्चिम आणि उत्तर या दिशातील कमलदलामध्यें बाकीच्या पर-

ओं ऱ्हीं जिनचैत्येभ्यः स्वाहा । ओं ऱ्हीं जिनचैत्यालयेभ्यः स्वाहा । इति धर्मादिमंत्रान् । पंचमंडलेपु क्रमेण ओंऱ्हींपूर्वकस्वाहांतचतुर्थ्यंतनामरूपान् तिथिग्रहयक्षयक्षीदिक्पालमत्रान् । पूर्वादिद्वारे ओं ऱ्हीं राक्षसदौवारिकाय स्वाहा इति मंत्रद्वयम् ॥ दक्षिणद्वारे ओं ऱ्हीं असुरदौवारिकाय स्वाहा इति मंत्रद्वयम् ॥ उत्तरद्वारे ओं ऱ्हीं गरुडदौवारिकाय स्वाहा । इति मंत्रद्वयम् ॥ पश्चिमद्वारे नागदौवारिकाय स्वाहा ॥ प्रादक्षिण्येन लिखेत् ॥ इति अष्टाशीतिपरिवारदेवताधिष्ठितपंचमंडलवर्तनम् ॥

अथ पंचममंडलयंत्रोपरि पीठस्थापनविधानम् ॥

पार्श्वप्रोतमणिप्रभाभिरभितः क्लृप्तेंद्रचापोत्करम् ॥
पार्श्वद्वंद्वनिवेशितोचितलसद्देवेंद्रपीठद्वयम् ॥
अर्धेन्दूपमपांडुकोपलतलानादिस्थपीठोपमम् ॥
पीठं भासुरभर्मनिर्मितमिदं यंत्रोपरि स्थापये ॥
ओं ऱ्हीं हं क्ष्मं ठ ठ स्वाहा पीठस्थापनम् ॥

---

मेरूंचा मंत्र लिहावा. आग्नेय, नैऋत्य, वायव्य, ईशान्य या दिशेतील पाकळ्यात जिनधर्म वगैरेंचा मंत्र लिहावा. चौकोनी पांच मंडलात क्रमानें तिथि, ग्रह, यक्ष, यक्षी व दिक्पाल यांचे मंत्र ओंऱ्हींपूर्वक व चतुर्थ्यंत विभक्तीनें युक्त आणि अन्तीं स्वाहा शब्दासहित लिहावेत. व पूर्व, दक्षिण, पश्चिम आणि उत्तर या चार दरवाज्यामध्ये क्रमानें दोनदा, राक्षस, असुर, नाग व गरुड या द्वारपालाचे दोन दोन मत्र लिहावेत. या मंडलावर पीठस्थापन करावें. हे सर्व मंत्र डावीकडून उजवीकडे लिहीत जावें.

'पार्श्वप्रोतेत्यादि' हा श्लोक व त्याचा मंत्र म्हणून पीठस्थापना करावी.

हाटकयिघटपूर्णपयोभिः पाटलातृटिपटीरविमिश्रैः ॥
क्षालयामि निजमानसपंकक्षालनाय जिनमज्जनपीठम् ॥
ओं ऱ्हां ऱ्हीं ऱ्हूं ऱ्हौं ऱ्हः नमोर्हते भगवते श्रीमते पवित्रजलेन श्रीपी–
ठप्रक्षालनं करोमि स्वाहा । पीठप्रक्षालनम् । ८ ॥

स्याद्वादविद्वज्जनशेमुषीव नितांतमेतन्निशिताग्रभागान् ॥
हिरण्मयेऽस्मिन्नभिषेकपीठे हरिन्मणिच्छायकुशान्न्यसामि ॥
ओं ऱ्हीं दर्पमथनाय स्वाहा । पीठदर्भः ॥ ९ ॥
स्वच्छैस्तीर्थै० । पीठं समभ्यर्चये ॥
ओं ऱ्हीं सम्यग्दर्शनज्ञानचारित्राय स्वाहा पीठार्चनम् ॥
श्रीपीठक्लृप्ते विशदाक्षतौघश्रीप्रस्तरे पूर्णशशांककल्पे ॥
श्रीवर्तते चंद्रमसीति वार्तां सत्यापयंतीं श्रियमालिखामि ॥

---

८ 'हाटकीयमिति' हा श्लोक व मत्र ह्मणून स्वतःचे मनातील कर्मरूपी चिखल धुऊन टाकण्याकरितां श्री जिनेश्वराचे सिंहासन चंदनमिश्रित जलानें स्वच्छ धुवावे.

९ 'स्याद्वादेत्यादि' हा श्लोक ह्मणून पीठावर दर्भस्थापन करून त्याची पूजा करावी. जशी विद्वानांची बुद्धि तीक्ष्ण असते तशी ज्यांची अग्रें तीक्ष्ण आहेत असे पांचरत्नासारखे दिसणारे दर्भ पीठावर स्थापावे.

१० 'श्रीपीठेति' हा श्लोक ह्मणून पीठावर 'श्री' हा शब्द लिहावा, या प्रमाणे पीठ पूजा आल्यानतर दर्भ-

ओं ऱ्हीं श्रीं र्हं श्रीलेखनं करोमि स्वाहा । श्रीलेखनम् । १० ॥

इति पीठस्थापनविधानम् ॥

अथ दर्भशय्यास्थितप्रतिमाया वस्त्रापनयनविधानम् ॥

दिशः प्रसेदुर्ववुराप्तशैत्याः सुगंधयो मंदतरा समीराः ॥
प्रदक्षिणार्चिर्हविरादर्देऽग्निर्यज्जन्मनि ख्यात जिनः स एषः ॥ १ ॥
व्योमप्रदेशः प्रससाद तद्वज्जलाशयोपि प्रससाद सर्वः ॥
मनो जनानां प्रससाद सद्यो यज्जन्मनि ॥ २ ॥
कल्पेषु घंटा भवनेषु शंखो ज्योतिर्विमानेषु च सिंहनादः ॥
दध्वान भेरीवनजालयेषु यज्जन्मनि ॥ ३ ॥
आलेन किं सर्वचराचरेषु लोकत्रये स्वस्वभवोरुचिन्हैः ॥

शय्येत असलेल्या प्रतिमेचें वस्त्र काढण्याचा विधि करावा. त्यावेळीं हा विधि करावा.

१-४ ‘ दिश इति ’ ज्या जिनाच्या जन्मकालीं दिशा प्रसन्न झाल्या, वारा थंड व सुगंध वाहू लागला व ज्याच्या ज्वाला उजवीकडे जातात असा अग्नि हविर्भाग घेऊ लागला तोच हा जिन आहे. असा संकल्प त्या जिनप्रतिमेमध्ये करावा. ज्याच्या जन्मकाली आकाश निर्मळ झालें; सर्व सरोवरें स्वच्छ झालीं व लोकांची मनें प्रसन्न झालीं तोच हा जिन आहे.

ज्याच्या जन्मसमयीं स्वर्गामध्ये घंटानाद, भवन-पातालामध्ये शंखनाद, ज्योतिर्विमानांत सिंहनाद, व व्यंतर देवांच्या निवासस्थानीं नगाऱ्याचा ध्वनि झाला तोच हा जिन आहे ज्यास्ती काय सांगावयाचें आहे.

क्षोभो बभूव प्रबलप्रमादाद् यज्जन्मनि ॥ ४ ॥

एतच्चतुष्टयं पठित्वा जिनजन्मोत्सवस्थापनाय सर्वतः पुष्पांजलिं विकिरेत् ॥

यस्मिन्नुत्पद्यमाने सकलमघवतामुत्तमांगानि नेमुः ।
चेलुश्चित्तानि पीठान्यपि चलदचला भूतधात्री चकंपे ॥
अंभोधिश्चोज्जजृंभे सुरकुजनिकरः संववर्ष प्रसूनम् ।
मत्वार्हन्तं तमेनां प्रतिकृतिमधुना वस्त्रमुत्सारयामि ॥

जिनजन्मसूचकत्रैलोक्यभवचिन्हसंकल्पेन पुष्पांजलिं विधाय प्रतिमाच्छादितवस्त्रमपनयेत् ॥

ओं नमोर्हते भगवते श्रीमते त्रिभुवनतिलकोत्तमांगाय दिगंबराय ज्योतिर्मंडलाय देवेंद्रवरमुकुटमणिगणकिरणसलिलधाराकृतपादाभिषेकाय । द्वादशगणसमन्वितसमग्रसमवसरणसंपत्सहिताय वृषभादिवर्द्धमानपर्यंततीर्थंकराय ऊर्ध्वमुखमोक्षनायकाय नमः ॥ वस्त्रापनयनमंत्रः ॥ ५ ॥

---

त्रैलोक्यांत ज्याच्या जन्माने मोठा क्षोभ झाला व सर्व जगत अत्यानदयुक्त झालें तोच हा जिन आहे. असा जिनप्रतिमेंत सकल्प करावा. या प्रमाणे चार श्लोक ह्मणून जिनजन्मोत्सवाची स्थापना करण्यास्तव पुष्पांजलिक्षेपण करावें.

५' यस्मिन्निति, हा श्लोक व त्याचा मंत्र म्हणून जिनजन्मानें त्रैलोक्यांत क्षोभ झाला आहे. असा संकल्प करून पुष्पांजलि क्षेपण करावी या वेळीं प्रतिमेवरील अच्छादनवस्त्र दूर करावें. जे उत्पन्न झाले असतां सकल इद्रांचीं मस्तकें नम्र झाली, सिंहासनें थरथरलीं, पृथ्वी कंपित झाली. समुद्राला भरती आली कल्पवृक्षानीं पुष्पवृष्टि केली. तेच हे अर्हत आहेत अशा संकल्पानें मी हें प्रतिमेवरचे वस्त्र काढितो.

मातेयं त्रिजगत्प्रभोर्जिनपतेस्तज्जन्मकालो ह्ययम् ॥
तज्जन्मास्पदमेतदित्यहमियद्वक्तुं प्रभुर्नाधिकम् ॥
इत्थं वर्णयति स्म यां यममराधीशो यदेवादरात् ॥
सेयं सोयमिदं तदित्यहमिह स्वारोप्य तानर्घ्ययें ॥ ६ ॥

जिनमातृजिनजन्मस्थानप्रशंसनाय तेभ्योर्घ्यं दद्यात् ॥ ६ ॥

देव त्वय्यद्य जाते त्रिभुवनमखिलं चाद्य जातं सनाथं ॥
जातो मूर्तोद्य धर्मः कुमतबहुतमो ध्वस्तमद्यैव जातम् ॥
स्वर्मोक्षद्वाः कवाटं स्फुटमिह निवृतं चाद्य पुण्याहमाशी–
र्जातं लोकाग्रचक्षुर्जय जय भगवज्जीव वर्धस्व नंद ॥ ७ ॥

जिनजन्मस्थापनार्थं तस्य अन्यासां च प्रतिष्ठेयप्रतिमानां उपरि पुष्पाक्षतं क्षिपेत् ॥ ७ ॥

---

६ 'मातेयमित्यादि' हा श्लोक ह्मणून जिनमाता, जिनजन्मसमय, व जिनजन्मस्थान यांच्या प्रशंसार्थ यांना अर्घ्य द्यावे. भद्रपीठावर मातेचा संकल्प, व प्रतिष्ठेच्या वेळी ज्या दिवशी आपण जन्मकल्याणिक ठरविलें असेल त्या दिवशी तीर्थकराच्या जन्माचा संकल्प करावा व ज्या ठिकाणी आपण जन्मोत्सव करितो तें ठिकाणच तीर्थकरांचे जन्मस्थान आहे असें समजावें.

७ 'देव त्वय्यद्येति' हा श्लोक ह्मणून व त्याचा मंत्र ह्मणून जिनजन्मस्थापन करण्यासाठी त्या व इतर प्रतिष्ठेय प्रतिमांच्या वर पुष्पाक्षता टाकाव्यात. त्यावेळी याप्रमाणें स्तुति करावी. हे जिनेश्वरा! आपला जन्म झाल्यामुळें आज हे त्रैलोक्य सनाथ झाले आहे. आज साक्षात् धर्मच जन्माला आला; असे आह्मी समजतो. आज कुमतांधकारांचा नाश झाला. आज स्वर्गाचें व मोक्षाचे द्वार उघडले गेलें. आजचा दिवस सुदिन झाला. हे जगाच्या नेत्रा जिना तुझा जयजयकार असो. तूं चिरंजीव हो! तुझा उत्कर्ष होवो. व तूं नेहमी आनंदी हो.

निःस्वेदामलदुग्धगौररुधिरस्वाद्याकृतित्वानि च ॥
स्वाद्यं संहननं स्फुरत्सुरभितासौरूप्यसल्लक्षमताः ।
वीर्यं चाप्रतिमं जगत्त्रयहिताभाषित्वमत्यूर्जितम् ।
प्राप्तं यद्दशसद्गुणं जिनवपुर्दिव्यं तदेतद् ध्रुवम् ॥
अष्टशतलक्षणैस्तैर्नवशतसद्व्यंजनैश्चकास्ति तराम् ॥
परमौदारिकमर्हद्दिव्यांगं यत्तदेवेदम् ॥ ९ ॥
ॐ ऱ्हीं श्रीं ह्रँ सर्वलक्षणसंपूर्णविग्रहाय स्वाहा ॥ सहजदशातिशय—
स्थापनार्थं प्रतिमोपरि दशपुष्पीमावसेत् ॥ ९ ॥

अथ विजयादिदेवतोपास्तिस्थापनम् ॥

समेत्य सद्यो रुचकालयेभ्यो जिनोदयेंबां समुपासमानाः ॥

---

८ 'निःस्वेदामलेति' हा श्लोक व 'अष्टशतति' हा श्लोक आणि मंत्र ह्मणून प्रतिमेच्या ठिकाणी जन्मकालच्या दहा अतिशयाचा संकल्प करण्याकरिता दहा पुष्पे प्रतिमेवर स्थापावींत. भगवंताच्या ठिकाणी दहा अतिशय याप्रमाणे आहेत. १ घाम न येणें २ मलमूत्र नसणें ३ रक्त दुधासारखें असणे, ४ समचतुरस्र संस्थान, ५ वज्र वृषभनाराच सहनन, ६ शरीर सुगंधित असणे, ७ शरीर अत्यंत सुंदर असणे, ८, १०८ लक्षणें व ९०० व्यंजनें असणें-९ अनंत शक्ति, १० प्रिय भाषण. हा विधि झाल्यानंतर विजयादि देवतांचे पूजन करावें.

१ 'समेत्य सद्यो' हा श्लोक व त्याचा मंत्र ह्मणून वस्त्राभरणांनीं भूषित अशा आठ कन्यांची जिनप्रतिमेच्या सर्व बाजूस स्थापना करावी. त्यांच्या हातामध्यें झारी द्यावी. व त्यांच्यावर या विजया वगैरे देवता आहेत आणि

वहंति भृंगारकमष्टदेव्यो यास्ता इमाः स्युर्विजयादयोऽत्र ॥

ओं रुचकवरगिरीन्द्रपूर्वशिखरवासिन्यो विजयादिदेव्यो भृंगारकं धृत्वार्हत्प्रभुमिहेदानीं परिचरन्त्विति स्वाहा ॥ पीठस्थप्रतिमां सर्वतः समलंकृताष्टकन्याः स्थापयित्वा तासां करेषु भृंगारकं दत्वा विजयादिदेवीसंकल्पनेन तासु कुंकुमरंजितपुष्पाक्षतं क्षिपेत् ॥ १ ॥

समेत्य सद्यो रुचकालयेभ्यो जिनोदयेऽत्रां समुपासमानाः ॥

वहंति देव्यो मुकुरंदमष्टौ याः सुस्थिताद्या इह ता इमाः स्युः ॥ २ ॥

ओं रुचकवरगिरीन्द्रदक्षिणशिखरवासिन्यः सुस्थितादिदेव्यो दर्पणं धृत्वार्हत्प्रभुमिहेदानीं परिचरंत्विति स्वाहा ॥ २ ॥

पूर्ववत्स्थापिताष्टकन्यानां करेषु दर्पण दत्वा सुस्थितादिसंकल्पेन तासु कुंकुमरंजितपुष्पाक्षत क्षिपेत् ॥ २ ॥

समेत्य सद्यो रुचकालयेभ्यो जिनोदयेऽत्रां समुपासमानाः ॥

वहंति छत्रत्रयमष्टदेव्यो यास्ता इलाद्या इह संतु चैताः ॥

ओं रुचकवरगिरींद्रपश्चिमशिखरवासिन्य इलादिदेव्यः छत्रत्रयं धृत्वार्हत्प्रभुमिदानी परिचरंत्विति स्वाहा ॥



---

या रुचक द्वीपांतील रुचकवर पर्वतावर राहतात. या मातेच्या सेवेसाठीं आलेल्या आहेत; असा संकल्प करून त्यांच्यावर कुंकुमयुक्त अक्षता क्षेपण कराव्यात. कांहीं मुलीच्या हातांत छत्र, काहींच्या हातांत दर्पण द्यावे. कांहींच्या हातांत चामर व काहींच्या हातांत आरत्या द्याव्यात. याप्रमाणें हा विधि करावा.

पूर्ववत्स्थापिताष्टकन्यानां करेषु छत्रत्रयं दत्वा इलादिदेवीसंकल्पेन तासु कुंकुमरंजितपुष्पाक्षतं क्षिपेत् ॥३॥

समेत्य सद्यो रुचकालयेभ्यः जिनोदयेम्बां समुपासमानाः ॥
वहंति याश्चामरमष्टदेव्यो लंवूपिकाद्या इह ता इमाः स्युः ॥

ओं रुचकवरगिरीन्द्रोत्तरशिखरवासिन्यो लंवूषिकादिदेव्यश्चामरं धृत्वार्हत्प्रभुमिहेदानीं परिचरन्त्विति स्वाहा ॥

पूर्ववत्स्थापिताष्टकन्यानां करेषु चामराणि दत्वा लंवूषादिदेवीसंकल्पेन तासु कुंकुमरंजितपुष्पाक्षतं क्षिपेत् ॥ ४ ॥

समेत्य सद्यो रुचकालयेभ्यो जिनोदयेम्बां समुपासमानाः ॥
उद्योतयंते च गृहं चतस्रश्चित्रादिदेव्यः खलु य इमास्ताः ॥ ५ ॥

ओं रुचकवरगिरींद्रशिखरवासिन्यश्चित्रादिदेव्यः सर्वाशोद्योतप्रासादं कृत्वार्हत्प्रभुं इहेदानीं परिचरंत्विति स्वाहा ॥ महादिक्षु पूर्वत्स्थापितचतुःकन्यानां करेषु प्रदीपपात्राणि दत्वा चित्रादिदेवीसंकल्पेन तासु कुंकुमरंजितपुष्पाक्षतं क्षिपेत् ॥ ५ ॥

अथ जातकर्मस्थापनम् ॥

चतस्रो दिक्कुमारीणां या महत्तरिकाः प्रभोः ॥

---

'चतस्रो' हा श्लोक ह्मणून व त्याचा मंत्र ह्मणून विदिशेमध्ये दिक्कुमारी महत्तरिकेच्या संकल्पाने चार

जातकर्म वितन्वंति ता एता रुचकादयः ॥

ओं रुचकगिरींद्रपूर्वाद्यभ्यंतरशिखरवासिन्यो रुचकादिदेव्यो जातकर्म कृत्वार्हत्प्रभुमिहेदानीं परिचरंत्विति स्वाहा । महादिक्षु पूर्ववत्स्थापितचतुःकन्यानां करेषु वेत्रदंडं दत्वा दिक्कुमारीमहत्तरिकासंकल्पेन तासु कुंकुमरंजितपुष्पाक्षतं क्षिपेत् ॥ ६ ॥

तासां विद्युत्कुमारीणां या महत्तरिकाः प्रभोः ॥
जातकर्म वितन्वंति ता एता विजयादयः ॥ ७ ॥

ओं रुचकवरगिरिशिखरवासिन्यः विजयादिदेव्यो जातकर्म कृत्वा अर्हत्प्रभुमिहेदानीं परिचरंत्विति स्वाहा । विदिक्षु पूर्ववत्स्थापितचतुःकन्यानां करेषु वेत्रदंडं दत्वा विद्युत्कुमारीमहत्तरिकासंकल्पेन तासु कुंकुमरंजितपुष्पाक्षतं क्षिपेत् ॥

द्वात्रिंशदेव रुचकाश्रयदिक्कुमार्यो विद्युत्कुमार्य इह तास्थितयश्चतस्रः ॥
तासां च विश्रुतमहत्तरिकास्तथाष्टौ यज्जन्मनि प्रतिभजंति स एष देवः ॥

ओं रुचकवरगिरीन्द्रशिखरवासिन्यो विजयादिदेव्यो यथास्वमर्हत्प्रभुमिहेदानीं परिचरंत्विति स्वाहा ॥ पीठस्थप्रतिमां सर्वतः कुंकुमरजितपुष्पाक्षतं क्षिपेत् ॥

इति विजयादिदेवतोपास्तिविधानम् ॥

---

] उभ्या कराव्यात. त्यांच्यावर कुंकुमरजित पुष्पाक्षता टाकाव्यात व त्यांच्या हातांत वेत्रदंड द्यावेत. या
] हा विजयादिदेवतापूजनाचा विधि आहे.

अथ आकारशुद्धिः ॥

देवीभिः श्र्यादिभिस्तैरमलतरगुणैर्भूषिताया जनन्या ॥
दिव्यद्रव्यौघसंशोधितमणिगृहसंकाशगर्भे प्रसूतः ॥
अस्पृष्टो गार्भदोषैर्जलजमिव जलैर्यस्त्रिबोधादिशुद्धः ॥
तस्यांतर्बाह्यशुद्धेर्विधिरिति विदधे शुद्धिमथाकरस्य ॥
नामापि यस्यातनुते विशुद्धिं ध्यायंति यं शुद्धिकृते मुनींद्राः ॥
किं तस्य शुद्धेर्विधिना तथापि तमेष आचार इतीह कुर्वे ॥
आकारशुद्धिविधानस्थापनार्थं तीर्थोदकाप्लुतपुष्पाणि प्रतिमोपरि निदध्यात् ॥ २ ॥
भवनवनजकल्पज्योतिरिंद्राः स्वशंखानकपटुरवघंटास्फारभेरीनिनादैः ॥

'देवीभिरिति' आणि 'नामापीत्यादि' हे दोन श्लोक व त्याचा मंत्र म्हणून आकारशुद्धि करण्यासाठीं संस्कारित पवित्र पाण्यानें युक्त अशीं पुष्पें प्रतिमेवर क्षेपण करावीत. श्र्यादि देवींनी जिनमातेचा गर्भ स्वर्गीय उत्तम पदार्थांनी शुद्ध केल्यामुळें तो रत्नगृहाप्रमाणें निर्मळ झाला. गर्भगत दोषांनी भगवान् अलिप्त राहिले होते व तीन ज्ञानानें धारक आणि अंतरंगी बहिरंगीही शुद्ध होते. ज्यांचें नांव घेतलें असतां आत्मा पवित्र होतो व आत्मा शुद्ध बनविण्यासाठीं मुनिराज ज्यांचें स्मरण करितात त्या स्वभावशुद्ध जिनाची आम्ही काय शुद्धि करणार; तथापि हा शुद्धीचा प्रकार करणें हा आचार आहे असें समजून आम्ही हा विधि करितों.

'भवनवनजेति' हा श्लोक म्हणून इंद्र यक्ष्मान, परिचारक वगैरेमध्यें इंद्रादिकांचा संकल्प करावा. याप-

१ गर्भसंबंधिदोषैरस्पृष्टः । तस्येदामेत्यर्थः ॥ २ आकारस्य । ३ शुद्ध्यर्थं । ४ संस्कारितपुण्योदकाक्तपुष्पाणि ।

इंद्रनार्यायां इंद्राणीभावस्थापनार्थं सौधर्मः पुष्पाक्षतं क्षिपेत् ॥ ४ ॥

मायानिद्रा जनन्याः सपदि विदधती स्थापयित्वा तदग्रे ॥
मायाबालं कराभ्यां जिनममलमुपादाय भक्त्या दधाना ॥
अग्रे यातीषु च श्र्यादिषु विधृतलसन्मंगला स्वागमय्य
प्रीतेन्द्राणीन्द्रहस्ते निधिमिव निदधौ यं स एवैष देवः ॥

इंद्राण्यां भद्रासनादुद्धृत्य समर्प्यमाणायां प्रतिमायां पुष्पाक्षतं क्षिपेत् ॥ ५ ॥

जिनजनिमवगम्यागम्य कल्याणपूजां व्यधुरिति विभवाद्ये याजकाः सतु तेऽमी ॥
इंद्रयजमानादिषु तत्तादिंद्रादिभावस्थापनाय सौधर्मः पुष्पाक्षतं क्षिपेत् ॥ ३ ॥
या गाढभक्तिरतिगूढतनुः प्रविश्य शिष्टामरिष्टवसतिं जिनमुज्ज्वलांगम् ॥
प्राचीतटे रविरिव स्थितमंबिकांके दृष्ट्वा प्रणम्य च तुतोष शची तु सेयम् ॥

---

स्वानि, नगाऱ्याचा ध्वनि वगैरे चिन्हांनीं जिनजन्म झाला असे जाणून हे इंद्रादि देव आले आहेत असे मानून इंद्र यजमानादिकामध्यें इंद्रादिकांचा संकल्प करावा. व पुष्पाक्षताक्षेपण करावें. 'या गाढभक्तिरिति' हा श्लोक म्हणून इंद्राच्या पत्नीच्या ठिकाणीं इंद्राणीचा संकल्प करावा. इंद्राणी गुप्त होऊन प्रसूतिगृहांत जाते व तेथें पूर्व दिशेला जसा सूर्य शोभितो तसा जिनमातेजवळ जिनबालकाला पाहून आनंदित होते. तदनंतर इंद्राणीनें जिनप्रतिमा भद्रासनावरून उचलून घेतल्यानंतर त्या प्रतिमेवर पुष्पाक्षता क्षेपण करावी.

१ जिनजन्म । जनुर्जननीजन्मानि जनिरुत्पत्तिरुद्भव इत्यमर । २ ज्ञात्वा ३ आगत्य ४ जन्माभिषेककल्याणपूजाम् ॥ ५ सूतिकाया गृहम् । अरिष्टं सूतिकागृहम् ॥ ६ पूर्वदिक्तटे ।

यस्तोरणप्रणिधिदेशमभत्यि शच्या
दत्तं ससंभ्रममवेक्ष्य दधौ कराभ्याम् ॥
स्तुत्वा ननाम च मुहुर्जिनबालकं स्वम् ॥
मेने कृतार्थममरप्रवरोऽस्मि सोऽहम् ॥

इंद्राण्या समर्प्यमाणां प्रतिमां जय जयेति वदन् प्रणतशिराः करकमलाभ्यां इंद्रो गृण्हीयात् ॥६॥

द्वात्रिंशन्मुखतच्चतुर्गुणमहादंतांतपद्माकर—
द्वात्रिंशत्कमलोल्लसद्दलशिखानृत्यत्सुरस्त्रीजनम् ॥
नृत्यंतं रजताचलाभमुचितालंकारमैरावणम् ॥
स्वारूढस्य शतक्रतोर्जिनविभुर्योके स्थितः सोऽस्त्वयम् ॥

ऐरावणभावस्थापनाय समलंकृतगजे पुस्तगजे वा पुष्पांजलिं प्रयुज्य सौधर्मस्तमारुह्य स्वांके

---

'यस्तोरणेति' हा श्लोक ह्मणुन इंद्राणीने दिलेली प्रतिमा आपल्या हातामध्ये घेतांना मस्तक नम्र करावे आणि 'जय जय' असा शब्द सुस्वराने ह्मणावा. राजवाड्याच्या दरवाजाजवळ येऊन इंद्राणीनें दिले असतां ज्यानें मोठ्या उत्साहाने घेतलें व स्तुति करून नमस्कार केला व ज्याने स्वतःला कृतार्थ मानिले तो मी इंद्र आहे असा संकल्प जिनप्रतिमा हातात घेणाऱ्या इंद्राने करावा.

'द्वात्रिंशदिति' हा श्लोक व त्याचा मंत्र ह्मणुन ऐरावत हत्तीचा संकल्प सजविलेल्या हत्तीवर अथवा बन विलेल्या हत्तीवर करावा. सौधर्मेंद्राने त्याच्यावर चढावे व प्रतिमा आपल्या मांडीवर दृढ स्थापावी. ऐरावत हत्तीला बत्तीस तोंडे असतात. प्रत्येकतोंडात आठ दांत असतात. प्रत्येक दांतावर एक सरोवर असते. प्रत्येक सरोवरांत

प्रतिमां सुदृढं निवेशयेत् ॥ ७ ॥

ईशानशक्रः शरदिंदुबिंबशोभाविशेषास्पदमातपत्रम् ॥
यस्योपरिष्टाद्बिभरांबभूव स एव देवो जिनबिंब एषः ॥ ८ ॥
ईशानशक्रस्थापनाय च्छत्रधारिणि प्रतींद्रे पुष्पाक्षतं क्षिपेत् ॥
पार्श्वस्थितौ यस्य सनत्कुमारमाहेंद्रशक्रौ चमरीरुहे द्वे ॥
संवीजयामासतुरिंदुशुभ्रे स एव देवो जिनबिंब एषः ॥ ९ ॥
सनत्कुमारमाहेंद्रशक्रस्थापनाय चमरधारिप्रतींद्रोपरि पुष्पाक्षतं क्षिपेत् ॥

---

बत्तीस कमळे असतात. व प्रत्येक कमलदलावर एक एक देवांगना नृत्य करीत असते. हा हत्ती विजयार्धपर्वता प्रमाणें पांढरा आहे.

'ईशानेति' हा श्लोक ह्मणून ईशानेंद्राची स्थापना करण्याकरितां छत्रधारक प्रतींद्रावर ईशानेंद्राचा संकल्प करावा. ज्याच्यावर ईशानेंद्रानें चंद्रनिर्मल छत्र धारण केलें होतें तोच हा जिनेश्वर आहे व ज्यानें छत्र धरलें होतें तोच ईशानेंद्र मी आहें.

'पार्श्वस्थिताविति' हा श्लोक ह्मणून चवऱ्या धारण करणाऱ्या प्रतींद्रावर सानत्कुमार व माहेन्द्र या दोन इंद्रांचा संकल्प करावा आणि त्यावर पुष्पाक्षताक्षेपण करावें. ज्याच्यावर सानत्कुमार व माहेंद्र या दोन इंद्रानी चामर वारले होते तोच हा जिनेश्वर आहे.

'शच्यादयेति' हा श्लोक ह्मणून इंद्र व यजमान यांच्या स्त्रियांच्या ठिकाणी शची व श्रीवगैरे देवींचा संकल्प करण्याकरितां **पुष्पाक्षता** क्षेपण कराव्यात. ज्या जिनेश्वरापुढें मंगलद्रव्यें धारण करून शची वगैरे देवी उत्तम वेष धारण करून **चालू लागल्या** होत्या. तोच हा जिनेश्वर आहे व त्याच ह्या स्त्रिया आहेत असा संकल्प करावा.

शच्यादय: श्रीप्रमुखाश्च देव्यो नानाविधं मंगलमुद्वहन्त्य: ॥
यस्याग्रतो जग्मुरुदारवेषा: ॥ स एव० ॥
शच्यादिश्र्यादिदेवीसंस्थापनाय इंद्रयजमानप्रभृतिमत्ताकाशिनीषु पुष्पा० ॥ १० ॥
अत्याहितं नृत्यमदृष्टपूर्वं विचित्रभावै: करणांगहारै: ॥
यस्याग्रतश्चाप्सरसो बबंधु: स एव० ॥
अप्सरोजनस्थापनाय नटद्वारवधूषु पुष्पाणि० ॥ ११ ॥
वर्द्धस्व नित्यं विजयस्व जीव नंदेति घोषोन्मुखशेषशक्रा: ॥
पुष्पोपहारं विदधुर्यदग्रे स एव० ॥
ब्रम्हेन्द्रादिशेषशक्रस्थापनाय स्तवनोन्मुखा विद्वाद्विशिष्टेषु पुष्पा० ॥ १२ ॥
जगुर्जगर्जुर्ननृतुर्ननन्दुरास्फोटयाचक्रुरलं ववल्गु: ॥
यस्याग्रत: सर्वसुरा: प्रमोदात् स एव० ॥

'अत्याहित' हा श्लोक म्हणून नृत्य करणाऱ्या वेश्याजनावर अप्सरांचा संकल्प करावा व त्यांच्यावर पुष्पाक्षता टाकाव्यात. 'ज्याच्या पुढे अप्सरांनी आश्चर्यकारक नृत्य केले तोच हा जिन आहे' असा या श्लोकाचा अभिप्राय आहे.

'वर्द्धस्वेति' हा श्लोक म्हणून स्तुति करणाऱ्या विद्वान भव्यलोकांवर ब्रह्मेंद्र वगैरे इंद्राचा संकल्प करून पुष्पाक्षता टाकाव्यात.

'जगुरित्यादि' हा श्लोक म्हणून गीतनृत्य वाजविणे वगैरे करणाऱ्या भव्य लोकांवर ही कृत्ये करणाऱ्या

आस्फोटितगीतनृत्यवादितहास्योत्प्लुतवल्गितमंगलाशीर्धवलस्तुतिविधायिसुरजनभावस्थापनाय आस्फोटितादिविधायिभव्यजनेषु पुष्पा० ॥ १३ ॥

जगुर्जगर्जुर्ननृतुर्ननंदुरास्फोटयांचकुरलं ववल्गुः ॥
विद्याधरा यस्य पुरः प्रमोदात् स एव० ॥

आस्फोटितगीतादिविधायिविद्याधरभावस्थापनाय तद्विधायिभव्यजनेषु पुष्पा० ॥ १४ ॥

अभ्यागतान्यंबरचारणानां युग्मानि दृष्ट्वा यसतीव तुष्ट्या ॥
सतुष्टवुः स्पष्टसुमृष्टवाक्यैः स एव० ॥

अंबरचारणभावस्थापनाय मुनिजनपादाग्रतः पुष्पा० ॥ १५ ॥

तदातनीं यस्य महाविभूतिं दृष्ट्वा सुराः केचन खेचराश्च ॥
इद्रप्रमाणाः सुदृशो बभूवुः ॥ स एव० ॥

सुरजनभावस्थापनाय निरीक्षकजनेषु पुष्पा० ॥ १६ ॥

---

देवाचा संकल्प करून त्याच्यावर पुष्पाक्षता टाकाव्यात. याच प्रमाणें या भव्यलोकांवर हीं कृत्यें करणाऱ्या विद्याधर लोकांचाही संकल्प करावा.

'अभ्यागता' हा श्लोक ह्मणून मुनीश्वरावर चारणमुनींचा संकल्प करावा.

'तदातनीं' हा श्लोक ह्मणून प्रेक्षकजनावर प्रेक्षक देवाचा संकल्प करावा. तीर्थकरांच्या जन्माच्या वेळीं त्याची विभूति पाहून देवांना व विद्याधरांना सम्यग्दर्शन होतें असा 'तदातनीं' या श्लोकाचा अभिप्राय आहे.

इत्थं नीत्वा सुमेरोरुपरितनवने पांडुके पाडुकाख्यां ॥

प्रादक्षिण्येन पूर्वोत्तराविदिशि शिलां स्थापितं मध्यपीठे ॥

क्षीरोदस्यांबुभिर्यं पृथुकलशशतैः स्नापयति स्म शक्राः ॥

त मत्वा देवमेनं त्रिदशशतघटः स्नापयामोत्र बिंबम् ॥

इति महोत्सवेन जिनप्रतिष्ठेयप्रतिमामुत्तरवेदीमंडपं नीत्वा तत्र पुष्पाक्षतं विकिरेत् ॥१७ ॥

श्रीभद्राशालकं सौमनसमुरुवनं नंदनं पाडुकाख्यं ॥

यस्योच्चैरंतरीयं परिवृतरशनामुत्तरीयं क्रमेण ॥

उष्णीपं चानुकुर्यान्नवनवतिसहस्रोन्नतिर्योजनानाम् ॥

ख्यातो मेरुः स साक्षान्मणिकनकमयोस्त्वेतदेवोच्चपीठम् ॥

महामेरुभावस्थापनाय तन्मंडपे सर्वतः पुष्पांजलिं क्षिपेत् ॥ १८ ॥

यो योजनानि शतमायतिमेतदर्धं—व्यासं बिभर्ति विशदाष्टतदुच्छ्रयं च ॥

---

'इत्थं नीत्वेति' हा श्लोक ह्मणून मोठ्या उत्सवानें प्रतिष्ठेची प्रतिमा उत्तरवेदी मंडपाकडे नेऊन तेथें पुष्पाक्षता क्षेपण कराव्यात.

या श्लोकाचा अभिप्रायः—अशा थाटानें मेरुपर्वतावरील पाडुक नांवाच्या वनांत पाडुक नांवाच्या शिलेवरील सिंहासनाच्या मध्यभागीं ज्या जिनेश्वराची स्थापना करून देवेन्द्रानीं मोठ्या कलशांनीं क्षीरसमुद्राच्या पाण्यानें स्नान घातलें तेच हे जिनेश्वर आहेत अशी कल्पना करून आह्मी या बिंबाचा अभिषेक करितो.

'श्रीभद्रेति' हा श्लोक ह्मणून मंडपामध्यें महामेरु पर्वताचा संकल्प करून पुष्पाक्षताक्षेपण करावें.

'यो योजनेति' हा श्लोक म्हणून मंडपातल्या वेदीमध्यें पांडुक शिलेचा संकल्प करावा. पाडुक शिला

अर्धेन्दुबिंबसदृशी सुरभिः सुरस्या सा पांडुकाव्हयशिलेयमिहास्तु वेदी ॥
नीत्वा भूरिविभूतितः सुरगिरिं श्रीपांडुकायासने ॥
पूर्वास्य विनिवेश्य ते सुरवराः संस्नापयन्ति स्म यम् ॥
तं देवं स्नपनार्थमंडपमिमं नीत्वा विभूत्या समं ॥
पीठेत्र श्रुतबीजभासुरतले पूर्वाननं स्थापये ॥

ओं ऱ्हीं र्ह श्री धर्मतीर्थाधिनाथ भगवन्निह पांडुकशिलापीठे तिष्ठ तिष्ठेति स्वाहा । श्रीवर्णे प्रतिमास्थापनम् ॥

अथाभिषेकोपकरणसज्जीकरणम् ॥

एषा मेरुतटे जिनालयपुरोभूः पांडुकाग्रास्थतं ॥
पीठ पीठामिदं त्रिय प्रतिकृतिः साक्षाच्च सोर्हत्प्रभुः ॥

---

१०० योजने लांब ५० योजने व्यास व ८ योजने उंच अशी आहे. ही अर्धचन्द्राकार. आहे नीत्वेति, हा श्लोक म्हणून व मंत्र म्हणून पांडुकशिलेच्या सिंहासनावर जिनबिंबाची स्थापना करावी. देव ऐश्वर्याने मेरू पर्वतावर पांडुकशिलेच्या सिंहासनी जिनेश्वरास पूर्वेकडे तोंड करून बसऊन अभिषेक करिते झाले. यास्तव आम्ही ही मोठ्या थाटाने अभिषेकमंडपामध्ये जिनबिंब आणून व पूर्वेकडे तोंड करून सिंहासनावर ' श्री ' हे अक्षर लिहून जिनबिंबाची स्थापना करितो. याप्रमाणे हा विधि झाल्यानंतर अभिषेकसामुग्री एकत्र करावी.

' एषा ' हा श्लोक म्हणून अभिषेकोपकरणे सज्ज करण्याकरितां सर्वत्राजूस पुष्पाक्षतक्षेपण करावेत. ही जिनालयाची भूमि पांडुकशिला होय. हें सिंहासन पांडुकशिलेवरील सिंहासन होय. व जिनप्रतिमा साक्षात् अर्ह-

सौधर्मामरनायकोऽहममराः सर्वे च भव्या अमी ॥
यज्ञांगानि च तान्यमूनि सकलं तात्सिद्धमिष्टं हि नः ॥
अभिषेकोपकरणसज्जीकरणाय समन्तात्पुष्पाक्षतान् विकिरेत् ॥ २१ ॥

अथ प्रतिमास्पर्शनम् ॥

अनन्यसाधारणसद्गुणानां तव स्मरन्नस्तमितस्मरार्तेः ॥
जिनेंद्र साक्षात्कृतसर्वतत्व त्वामात्मनः सन्निहितं करोमि ॥

ओं उसहाय दिव्वदेहाय सज्जोजादाय महप्पण्णाय अणंतचउक्कयाय परमसुहपइट्ठयाय णिम्मलाय सयंभुवे अज्जरामरपरमपदपत्ताय परमपदाय मम इत्थवि सण्णिहिदाय स्वाहा ॥

इदमुच्चारयन्प्रतिमां परामृशेत् ॥ २२ ॥ ततः सकलीं पूर्ववत्कुर्यात् । ततः पीठाधःस्थितपंचमंडलयंत्राराधनम् ॥

---

स्पष्ट आहे. मी ( पूजक ) सौधर्मेन्द्र आहे. हे सर्व भव्य देव आहेत ही सर्व पूजासामग्री आहे. असा या श्लोकाचा अभिप्राय आहे.

आतां प्रतिमांगस्पर्शन विधि ॥

' अनन्येति ' हा श्लोक व ओं उसहायेति ' हा मंत्र म्हणून प्रतिमेस स्पर्श करावा. हे जिना इतर ठिकाणी नसलेल्या असामान्य गुणांचे स्मरण करून सर्वतत्वांना प्रत्यक्ष पाहणाऱ्या तुला मी माझ्या जवळ करितो. हे जिना आपण धर्माने शोभता आपला दिव्यदेह आहे. आपण अनन्तचतुष्टयधारक, परमसुखी निर्मल, स्वयंभु शाश्वत पद प्राप्त आहात. मी आपल्याला माझ्या जवळ करितो.

भ्रमाविर्भूतकोपकृशानुकृतरक्ताक्षमिव रक्ताक्षतोपलक्षितरक्ताक्षवरमारूढम् ॥ ३ ॥

भृंगांगासितभूरिभंगुरजटाजूटं शिखाडंबरो-।
च्छिद्दडोड्डमरं प्रचंडफणिभृत्सान्मंडनैर्मंडितम् ॥
छायातुच्छमुखेंदुसुच्छविकृतानंदं सकालच्छविं ॥
कालं कालजकालधर्मरहिताधीशाध्वरे व्याव्हये ॥

ओं ऱ्हीं क्रों कृष्णवर्ण हे यमागच्छ २ ॥ श्रीशांतिरस्तु ॥ इति यमाव्हानम् ॥ १ ॥

दक्षिणपश्चिमायां दिशि ॥ गद्यम् ॥ जिनभवनसमालोकनकुतूहलभल्लाकारपरिणतसमागतांजनमहीधरशंकाकारिणं । जिनभानुविविधनयजिनवचोभानुशतनिराकृतजनमनोमहामोहतमः-संतानसंनिभम् ॥ उपाकृतपशुवेशमनविधायिजनपमाम्नकौतुकागतदयायागविलोकनकृताशपाश्वगतपापांजनखंजपुंजोपमानं । कुनयनिभनिजदर्शनावरकपुरोलंबमानतमालश्यामलाशिरोरुहसटाभारम् । रूक्षतोपलक्षितभल्लूकाकारपरिणतकायकृतभीतिनिर्भरं कर्बुरवरमारूढम् ॥ ४ ॥

---

काठी आहे. ती मस्तकापर्यंत ऊंच व मोठी आहे. त्याचा वर्ण काळा आहे. या यमाला मी कालधर्मानें ( मृत्युनें ) रहित अशा श्रीजिनाच्या पूजनप्रसंगीं आव्हान करितो

' दक्षिणपश्चिमेति ' हें गद्य म्हणून नैऋताला आव्हान करावें ह्या दिक्पालाचें अस्वल हें वाहन आहे. हें अस्वल जिनपूजन पाहण्यासाठीं अस्वलाचा आकार धारण करून आलेल्या अंजनपर्वताप्रमाणें दिसतें. या नैऋताचें राक्षस हें वाहन आहे. परंतु तो राक्षस अस्वल बनून या दिक्पालाची सेवा करीत असतो म्हणून अस्वल हें नैऋत दिक्पालाचें वाहन आहे असें म्हटलें आहे.

कटकमुकुटमुद्राहारकेयूरमुख्याभरणकिरणभारोद्भासिताशांतरालम् ॥
आसितलासितकांतिं मुद्गरास्त्रं च रात्रिंचरपरिवृतमेतं व्याव्हये नैऋतीशम् ॥

ओं ऱ्हीं क्रों श्यामवर्ण हे नैऋते आगच्छ २ इत्यादि । शांतिः सदास्तु इति नैऋत्याव्हानम् ॥ ४ ॥

पाश्चिमायां दिशि ॥ गद्यम् । समुद्रसलिलसंततक्रीडोपगूढगाढक्षीरोदडिंडीरपिंडपांडुराधिककपिलभावातिपेशलं। सर्वांगसंगतमकराकारकरावयवपरिकलितकरिवराकारम् ॥ मृणालच्छेदसोदरोदारदंतकांतिकलापापसारितानिजवदनविवरांधकारम् । यागभूभागपुष्पोपहाराय पुष्पापचयमातन्वानमिव पुष्करकरव्यापारितकरपुष्करम् ॥ अनेकांतमततत्त्वसमर्थनार्थमिव कथंचित्करिमकरोभयाकाराविराजितकरिमकरविमानमारूढम् ॥

मुक्ताफलात्युज्ज्वलविद्रुमानुस्यूतप्रभूताभरणाभिरामम् ॥
भमिाहिपाशं वरुणान्यधीशं यागेत्र यादःपतिमाव्हयामि ॥

ओं ऱ्हीं क्रों सुवर्णवर्ण हे वरुणागच्छ २ । शांतिः सदा ॥ इति वरुणाव्हानम् ॥

पाश्चिमोत्तरस्यां दिशि । लघुलालितमृदुकोमलातिविमलकलधौतकपिशतरकायकमनीयम् । वदनवदमांसलातिचटुलतरचरणरमणीयम् । मांसलसमानपरिणाहविशिष्टपृष्ठभागम् । मृगाधिपमध्यप्र-

---

'कटकेति' हा श्लोक म्हणून नैऋत दिक्पालाचें आव्हान, स्थापन वगैरे करावें. याचा वर्ण काळा आहे. कडे, मुकुट, आंगठ्या, हार वगैरे अलंकार हा धारण करीत असतो. याचें मुद्गर हें शस्त्र आहे.

'पश्चिमायामिति' हें गद्य व 'मुक्ताफलेति' हा श्लोक म्हणून वरुणाचें आव्हान वगैरे करावें यानें आपल्या

देशशोभाध्यासितमध्योद्देशम् । निशातकुटिलपर्वपटलदंतुरविषाणविराजितम् । वामलोचनालोचनोपमानचपलविशालविलोचनम् । समुत्क्षिप्तकर्णतालातिचकितमुहुर्मुहुराशांतरावलोकनम् । स्तोकतरभूभागगतिवेगातिशयपूर्वकायप्रविष्टापरकायम् । बहुतराकाशप्लुतगतिरयोभरपराजितमनोवेगमहिमानम् । गर्वारंभातिवल्गुवल्गनाविधानसमयशृंगारविघट्यमानधनपटलधनगलज्जलधारापसारितपथपरिश्रमम् ॥ निजनिशितखरखुरशिखरपरिकापितक्ष्माशिखरिनिकरशिरोभागम् ॥ समीहितोद्देशावलिंबितसुखप्रापणप्रमुखसकलसारगुंभितसंततसारंगवरमारूढम् ॥

चलद्विपुलभूरुहं कलितविस्फुरद्भूषणम् ।
लसन्मधुकरच्छविं चलितगात्रयंत्रोत्करम् ॥
जगत्त्रितयजीवनं विरचिताखिलार्थेतरम् ।
समीरणमिहाव्हये समदवायुवेगीयुतम् ॥

ओं र्‍हीं क्रौं कृष्णवर्ण हे पवनागच्छ २ । शांतिः सदास्तु । इति पवनाव्हानम् ॥

---

शरीरावर मोत्यें, प्रवाळ इत्यादिकांचें अलंकार धारण केलें आहेत. नागपाश हे याचें शस्त्र आहे वरुणानी ही याची पत्नी आहे. याचें करिमकर नावाचें वाहन आहे. या वाहनाचा आकार हत्ती व मगर या प्राण्यासारखा आहे. हें वाहन नित्यानित्यात्मक धर्म सिद्ध करणाऱ्या अनेकांताचें समर्थन करितें. अर्थात् स्वतःच ठिकाणी विरुद्ध असे दोन आकार धारण करून स्याद्वादाची सत्यता पटवितें

'चलदिति' हा श्लोक म्हणून वायु दिक्पालाचें आव्हान वगैरे करावें. या वायु दिक्पालाचा काळा वर्ण आहे. याच्या स्त्रीचें नांव वायुवेगा असें आहे. 'ॐ र्‍हीं' हा मंत्र म्हणून पवनाचें आव्हान करावें.

उत्तरस्यां दिशि ॥ ओं जिनमहामहमहिमावलोकनकुतूहलगगनागतनीलकुलाचलायमाननीलरत्नमयमहाधिष्ठानमहनीयम् । तत्कुलाचलकूटोपमानमणिमयमुकुटोपरिमपद्मरागकलशप्रभापटलपाटलीकृतमध्यंदिनातपम् । सीतानदीसितप्रवाहसोदरोदारधवलच्छविच्छदराजद्राजहंसनिकुरुंबनीयमानम् ॥ विचित्रात्रयवशोभाजितवैमानिकविमानाधःपातसमुत्क्षिप्तकरशतायमानध्वजराजिविराजितम् ॥ विविधमणिविनिर्मितभित्तिभागप्रभाप्रसरसुस्वापशतसहस्रनिष्पादकं पुष्पकविमानमारूढम् ॥

निधनरहितमुक्ताभूषणप्रौढवेषं । निधननिपुणशक्तिं विद्विषामुद्वहन्तम् ॥

धनमुखनिजदेवीसन्मुखांभोजभृंगं । धनदमिह धनर्द्ध्यै सेव्यमाव्हानयेहम् ॥

ओं ऱ्हीं क्रों सुवर्णवर्ण हे धनदागच्छ २ । शांतिः सदास्तु ॥ इति धनदाव्हानम् ॥७॥

पूर्वोत्तरस्यां दिशि ॥ महाहिमवन्महीधरसमानमहामानमाननीयधवलधौरेयतरगात्रम् । स्थूलसमुत्तुंगकाठिनककुत्कूटघटिततत्कुलकुत्कीलकूटोदारविलासम् । महीधरमहाकूटविदारणविनोदविलिसधातुधूलिविसरविभूषणविपाणविराजितम् । कनत्कनकखचितचकचकायमानचलदचलद्धलमालामनोहरमस्तकम् । मंजीरमंजुलारावगलालंबनघंटाध्वानिद्विगुणगंभीरनिजानिनादपरिपूरितादिगंतरालम् । सलक्षणपुरुषविशेषविशालाक्षोपमानमहाक्षमसातिदक्षं महोक्षवरमारूढम् ॥

---

'उत्तरस्यां दिशि' हा श्लोक व 'निधनेति' हा श्लोक म्हणून उत्तर दिशेस कुबेराचें आव्हान वगैरे करावें. या कुबेराचें पुष्पक विमान हें वाहन आहे. याचें शक्ति हे आयुध आहे याच्या राणीचें धनददेवी असें नांव आहे.

'पूर्वोत्तरस्या दिशि' हे गद्य म्हणून ईश्वरदिक्पालाचें आव्हान वगैरे करावें. या दिक्पालाचें वाहन बैल हें आहे. हा हिमवत्पर्वतासारखा माठा आहे. हा आपल्या शिंगांनीं पर्वताचें विदारण करितो.

कंकेलीद्रुमपल्लवच्छविजटाजूटार्धचंद्रप्रभा—
सांद्रीभूतभुजंगभूषणफणारत्नप्रभाभास्वरम् ॥
भालाभीलविलोचनानलशिखातीक्ष्णत्रिशूलायुधम् ॥
पार्वत्या धवमाव्हये गणवृतं दक्षाध्वरध्वंसिनम् ॥

ओं ऱ्हीं क्रौं धवलवर्ण हे ईशान आगच्छ २ ॥ शांतिः सदास्तु• ॥

इतीशाव्हानम् ॥ ८ ॥

अधरस्यां दिशि ॥ ओं नितांतनिस्तलशुंभज्जंबूद्वीपविपुलनिष्ठुरपृष्ठभागम् ॥ विशिष्टसारविनिर्जितवज्रसारम् । निजनिरतिशयगतिवेगभरपराजितपवनगमनवेगावलेपम् । धराधरधरासागरादिसकलजगद्भारधारणधुरीणगुणप्रभावप्रवादप्रतीतम् ॥ तिमितिमिंगिलादिसकलजलचरविशेषैकपुरोगमपदमासादितवंतम् । सकलसर्वथैकांततत्त्ववदत्यंतासंभाव्यमानरोमांकुरकूर्माकारपरिणतं कूर्मवरमारूढम् ॥

---

'कंकेलीति' हा श्लोक म्हणून ईशान दिक्पालाचें आव्हान वगैरे करावें. याच्या मस्तकावर जटा आहेत. सर्प हे याचे आभूषण आहे. याच्या कपाळावर डोळा आहे. त्रिशूल याचें शस्त्र आहे. पार्वती ही याची स्त्री आहे.

'अधरस्यामिति' व 'स्फटेति' हे श्लोक म्हणून धरणेंद्राचें आव्हान वगैरे करावें. याच्या फणावर तांबडे रत्न आहे. अंकुश याचें आयुध आहे. पद्मावती ही याची पत्नी आहे हा अनेक नागकुमारांनीं वेष्टित असतो. कांसव हें याचें वाहन आहे.

स्फटापरिगतारुणद्युमणिबिंबशुंभन्मणिप्रभापटलपाटलीकृतासितांगविभ्राजितम् ॥

धृतांकुशमनंकुशं सुगुणसद्मपद्मायुतं फणाधरगणावृतं फणिमहीन्द्रमाव्हानये ॥ ९ ॥

ओं ऱ्हीं क्रों धवलवर्णे हे धरणीन्द्र आगच्छ २ इत्यादि ॥ शांतिः सदास्तु ॥ ९ ॥

ऊर्ध्वायां दिशि ॥–ओं मदांधसुरसिंधुरसमालोकनसमुज्जृंभितकोपानलबहिश्चलदुज्ज्वलज्ज्वालाकलापशंकाकारिसरलारुणसटाटोपम् । सततसुधाकरकरामृतसुधासारसजातधवलिमानामिवातिधवलदेहमादधानम् । निजोभयपार्श्वावस्थितकरिमकरक्रूरसमशीलकण्यादसमालोकनसमुद्भूतक्रोधानुरागपुंजायमानातिलोहितविलोचनविभूषणम् । मत्तमातंगघटाकोटिकरटनटविपाटनसमासक्तमुक्ताफलप्रभाप्रखरनखरातिभीकरम् । कलाशेषकलाधराकारानुकारिकुटिलदंष्ट्राग्रभास्तभराविदारितवदनविवरांधकारम् । कल्पांतानल्पघनाघनध्वानशतसमवायसन्निभनितांतनिष्ठुरनिजनिर्घोषसंत्रासितसकलदिग्गजेंद्रम् । मृगेंद्रवरमारूढम् ॥

जिनगुणमणिमालां मौक्तिकानां च मालां । कुमुदकुसुममालां रोहिणीदृष्टमालाम् ॥

चिरमुरसि धरंतं कुंदभास सकुंतं । कविनुतगुणवृंदं चंद्रमाव्हानयेऽहम् ॥ १० ॥

ओं ऱ्हीं क्रों श्वेतवर्णे हे सोमागच्छ २ संवौषडित्यादि ॥ शांतिः सदास्तु ॥

---

‘ ऊर्ध्वायामिति ’ हे गद्य व ‘ जिनेति ’ हा श्लोक म्हणून सोमदिक्पालाचें आव्हान करावें. याच्या स्त्रीचें रोहिणी हें नांव आहे. सिंह हें याचें वाहन आहे. माला याचें आयुध आहे. याचा वर्ण पांढरा आहे. यानें आपल्या गळ्यांत मोत्यांच्या माळा घातलेल्या आहेत व हृदयामध्यें जिनगुणांची माळा हा धारण करितो. ६८९

दिक्पालकानीति समर्च्य यवान्विता ये
गोधूममुद्गचणकाढकशालिमुद्गाः ॥
तत्सप्तधान्यकृतमुष्टिभिरंबुकुंडे
सप्ताहुतीरिह दधे पृथगेन तेभ्यः ॥

ओं ऑ क्रों ऱ्हीं इंद्राय स्वाहा । अनेन जलपूरितकुंडे सप्तधान्यकरमुष्टिभिरिंद्राहुतिं विदधात । एवमग्न्यादिभ्योऽपि ॥ ११॥

दिक्पाला यूयमेतैर्बलिभिरतितरां प्राप्नुवंतः प्रमोदम् ॥
स्थाने स्थाने वसंतो निजनिजविभवैर्निःप्रतीपप्रभावाः ॥
घ्नंतो विघ्नौघामिज्याप्रासिततनुभृतामध्वरं पालयध्वम् ॥
स्वर्मोक्षापादनैकक्षमाजिनयजनं वर्द्धतामद्वितीयम् ॥ अर्घ्यार्पणार्घ्यः ॥ १२ ॥

अथाभिषेकः ॥

वादित्रव्रातघोषे स्फुटमटति पटौ दिक्तटाघाटदेशम् ॥

---

'दिक्पालेति' हा श्लोक म्हणून व मंत्र म्हणून जलपूर्ण अशा कुंडामध्यें सात धान्यांच्या सात सात मुष्टींनी इंद्र वगैरे दिक्पालांना आहुति द्याव्यात.

'दिक्पाला इति' हा श्लोक म्हणून दिक्पालांना अर्घ्य द्यावा. हे दिक्पालांनो आपण सर्वजण येऊन स्वर्गमोक्षप्रद अशा जिनपूजनांत उत्पन्न होणारी विघ्न दूर करा हें जिनपूजन पूर्णपणें वृद्धिंगत होवो

'वादित्रेति' हा श्लोक म्हणून वाद्यें वाजत असतां, आनंदस्तोत्र, आशीर्वाद वगैरे म्हणत असतां पाण्यांनीं

साटोपं सन्नटंतूद्भटरसघटनैः साधु गायंतु मंद्रम् ॥
आनंदस्तोत्रमाशीर्वचनमोतमुदा मंगलं पाठयंतु ॥
स्वीकुर्वन्त्वद्य भव्या भृशमुदितविधीनुद्धृतः पूर्णकुंभः ॥

ओं ह्रीं कलशोद्धरणं करोमि स्वाहा ॥ कलशोद्धरणम् ॥ १ ॥

ओं सरोवरसरित्तटाकवापीकूपप्रभृतिपवित्रतरप्रसिद्धतीर्थनिकरसमानीतैः । स्वयंभुरमणसमुद्रगंगादिनदीपद्मादिसरोवरसंभूतजलत्वेन संकल्पमानैः । समंत्रयंत्रार्चनविधिसमासादितात्यंतपवित्रभावैः । परमावगाढसम्यक्त्वैरिव निसर्गनिर्मलत्वनिवासैः । दयामयधर्मैरिव जगत्यत्यंततापापनोदप्रवीणैः । जिनवदनवनजविनिर्गतपरमागमैरिवात्यतशीतलैः । शब्दागमैरिव सकलजनजीवनैःकथंचित्पदांचितयुक्त्यागमैरिव युक्तिविशेषवर्धमानैः । चतुरतरकाव्यरसैरिव मनोहरतमैः । पीयूषरसैरिव नितांततृप्तिनिष्पादकैः । सौजन्यगुणैरिव सर्वलोकप्रियतमैः । जाड्यापनोदार्थं सुवृत्तसाकलयद्भिरिव रजतमहारजतेंद्रनीलकुंभसंभृतिसंभृतसुवृत्तैरंभोभिरमीभिः ॥



भरलेल्या कुंभास उचलावें व ' ओं सरोवरेति ' हें गद्य ह्मणावें. या पूर्ण कुंभामध्यें सरोवर, नदी, वापी, आड, गंगादि नद्या व स्वयंभूरमण समुद्र, यांचें निर्मळ पाणी भरलें आहे असा संकल्प करावा. हें पाणी जिनोपदेशाप्रमाणे अतिशीतल आहे. उत्तम काव्याप्रमाणे मनोहर आहे. अमृताप्रमाणे तृप्ति उत्पन्न करणारें आहे. दयेप्रमाणें लोकसंताप मिटविणारें आहे.

या पाण्यांनी भरलेल्या कुंभानी पुढें लिहिल्याप्रमाणें अभिषेक करावा.

मेरोर्मूर्धनि मूर्ध्नि यस्य पयसां धारां पयोवारिधेः ।
सौधर्मः प्रथमं जयेति परया भक्त्या समापातयत ॥
ईशानादिसुरेश्वरास्तदनु यं संस्नापयांचक्रिरे ।
तं देवं निजपंकपातनकृते संस्नापयामो जिनम् ॥ २ ॥ किंच ॥
यज्ज्ञानादिमहत्त्वानीर्जितमहत्त्वाकाशमेत्याभसा ।
व्याजात्तन्वभिषिंचतीह जिनमित्याविष्कृताशंककैः ॥
अच्छाच्छैरपि शीतलैः सुमधुरैस्तीर्थोपनीतैर्जलैः ॥
शात्यापादितवारिमूर्तिमनघं देवं जिनं स्नापये ॥

ओं ऱ्हीं श्रीं क्लीं ऐं अर्हं व म ह मं तं पं व २ हं २ सं २ त २ पं २ झ्वीं २ क्ष्वीं २ द्रां २ द्रीं २ द्रावय २ नमोर्हते भगवते श्रीमते पवित्रतरजलेन जिनमभिषेचयामि स्वाहा । जलस्नपनम्

आहार्यस्फुटसौरभामलजलैः सासिद्धिकामोदिभिः ।

---

'मेरोरिति' वगैरे दोन श्लोक व त्यांचा मंत्र म्हणून पवित्र अशा पाण्याने जिनेश्वराचा मी अभिषेक करितो. मेरुमस्तकावर क्षीरसागराच्या पाण्यानीं इंद्राने जय जय असें म्हणून जिनाचा अभिषेक केला होता. मीही माझ्या पातकांचा नाश व्हावा म्हणून जिनाचा अभिषेक करितो. जिनेश्वरानें आपल्या विस्तीर्ण ज्ञानानें अकाशाला जिंकिलें म्हणून तें पाण्याच्या मिषानें जिनाचा अभिषेक करीत आहे. अशी शंका उत्पन्न करणाऱ्या शीतल स्वच्छ जलांनीं मी जिनाचा अभिषेक करितो.

'आहार्येति' हा श्लोक म्हणून अष्टद्रव्यांनीं मी जिनाची पूजा करितो.

श्रीखंडाक्षतपुष्पहव्यहिमरुग्दीपैः सुधूपैः फलैः ॥
अर्घ्यैर्घातिविघातजातपरमानंदावबोधास्पदं ।
त्रैलोक्यार्चितमर्चयामि चरणद्वंद्वं जिनेंद्रप्रभोः ॥ ४ ॥ अर्चना ॥
यो नैर्मल्यगुणादिभूषिततनुर्दीप्त्या जलेनोर्जसा ।
युक्तश्चानपवर्त्यकायुरनिश सक्तश्च मुक्तिश्रियाम् ॥
नार्थस्तस्य जगत्प्रभोः स्नपनतः किंत्वाप्तुमेतान्गुणा— ।
निंद्राद्यैरभिषिक्त एष भगवान्पायादपायाज्जिनः ॥ ५ ॥
शांतिं च कांतिं विजयं विभूतिं तुष्टिं च पुष्टिं सकलस्य जन्तोः ॥
दीर्घायुरारोग्यमभीष्टसिद्धिं कुर्याज्जिनस्नानजलप्रवाहः ॥ आशीर्वादः ॥ ६ ॥

ओं जिनेश्वरशासनानामिव सर्वप्रियतमानाम् पशूनामिव अविदितहृदयानामिव हृदयविदामापादितहृदयाल्हादानाम् । सज्जनानामिव सरसहृदयानाम् । विद्याविशेषाणामिव विशिष्टजनदर्शनो-

---

'यो इति' हा श्लोक म्हणून व 'शांतिमिति' हा श्लोक म्हणून हा जिनाच्या स्नानजलाचा प्रवाह तुम्हाला शांति, कांति, विजय ऐश्वर्य, संतोष, पुष्टि, दीर्घायुष्य व इच्छितसिद्धि हे पदार्थ देवोत श्रीजिनेश्वर निर्मलता, शरीरकांति, विपुल बल, यांनी युक्त आहेत अल्पमृत्युरहित आहेत. नहमीं मुक्तिलक्ष्मीमध्ये अत्यंत आसक्त आहेत. याकीरता त्यांना स्नान घालण्यानें त्यांचा कांहीं फायदा नाहीं परतु त्यांचे उपयुक्त गुण प्राप्त व्हावेत म्हणुन इंद्रांनीं त्यांचा अभिषेक केला होता. यास्तव हे जिनेश्वर आमचें अपायापासून रक्षण करोत.

'ओं जिनेति' हें गद्य व 'दीपेति' हा श्लोक म्हणून नारळाच्या पाण्यांनीं जिनेंद्राचा अभिषेक करावा.

प्रस्थापितचारुचंपकमालाशंकावहै: । बहिरंतर्मलविलयविहितविशुद्धिसंपन्नतासमानगुणकृतानुरागेण समालिंग्य सर्वार्थप्रकाशनविशिष्टगुणविमर्शनेन भगवत: पादे पतद्भिरिव कमनीयकलधौतद्रवै: ॥ सुवर्णकुंभेषु सुवर्णभावेनाविवेचनीयमाकर्णपूर्णस्वसद्भावमात्मसौरभ्याविशेषं निवेदयमानै: ॥ स्पर्शनमात्रेण रजतकुंभान् शातकुंभकुंभतापादनेन स्पर्शोपलप्रभावमात्मसात्कुर्वाणै: । सुस्वरसुकुमार्यवयोविज्ञानप्रजासर्गविषगदापहारसहजवीर्यसंस्कारानुरोधिवीर्यादिगुणाविशेषविभूपितैरमीभि: ।

अनलबलविधानै: कांतितेज:प्रधानै: ।
तडिदुपमितपिंगै: सौरभाकृष्टभृंगै: ।
बहुभिरपि नवीनै: सारहय्यंगवीनै: ॥
स्नपनविधिपरेंद्रं स्नापयामो जिनेंद्रम् ॥ ११ ॥ किंच ॥
सौरभ्यं वरमार्द्रता यदि सुवर्णस्येह संपद्यते ।
तन्नेन ह्युपमीयते घृतमिदं नान्येन केनापि च ॥
धीरैरित्यभिवर्णितेन महता हय्यंगवीनेन वै ॥
संसिच्ये बलकांतिपुष्टिसुखदं श्रेयस्करं श्रीजिनम् ॥ १२ ॥ घृतस्नपनम् ॥

---

प्रदीप्त करितें, कांति व तेज उत्पन्न करितें, विजेप्रमाणें पिंवळसर व आपल्या सुवासानें भुंग्यांना आकर्षित करितें. अशा उत्कृष्ट तुपानें मी जिनाचा अभिषेक करितो. सुगंधपणा व ओलपणा जर सोन्यामध्यें असता तर त्याची तुपाला उपमा दिली गेली असती; अशा रीतीनें धीर अर्थात् विद्वान लोक ज्याचें वर्णन करितात अशा तुपानें बल, कांति, पुष्टि, सुख देणारे व मोक्षप्रद जिनाचा मी अभिषेक करितो

आहार्यस्फुट० इत्यर्चना । यो नैर्मल्य० इति, शांतिं च कांतिं इति च आशीर्वादः ॥

ॐ शरत्समयसमुदितनिशाकरकरनिकरनितांतनिर्मलेन । दूरविलंबायमानायतततरशरदभ्रशुभ्रविभ्रमाविभ्राजितेन । गंगातरंगसंघट्टसंजातडिंडीरपिंडपांडुरेण । सुरशुंडालशुंडादंडविपुलधवलधारापातेन । अनन्यसामान्यस्वादानुविद्धविशदगुणाविजितामृतेश्वराविशदवस्तुविस्ताराच्छुरितकेनावच्छिन्नेन । तीर्थंकरपरमपुण्यवदसाधारणशुभार्थसार्थसंपादनसमर्थेन । जिनवदनवनजविनिर्गतदिव्यवाणीविलासतच्चदभिमतानेकविधपरिणामप्रवीणेन । चतुरकविप्रबंधवत्प्रसादमाधुर्यादिगुणप्रतिपादितसर्वजनचित्तचमत्कारेण । जिनाभिषवणविधिव्यापृतभव्यजनसद्यःपरिणतागण्यपुण्यसंसिद्धिकामधेनुप्रथमप्रस्रवप्रवाहसंशयप्रतिपादकेन । संकल्पातीतदानवरोपालिप्साकुतूहलकल्पद्रुमकल्पमानसुधासारशंकावहेन । निजाचिंत्यदानगुणनिर्जितचिंतामणिप्रहितप्राभृतोदारहारलताकारेण । प्रेक्षकजनापेक्षणीयपराक्षयमोक्षलक्ष्मीकटाक्षवीक्षणसदक्षेण । जिनस्नानोपयोगिताजातजगत्त्रयोदरपारिपूरितहारनीहारकुंदेंदुकुमुदाकाशसंकाशविशदयशोलाभातिशयसंतुष्टक्षीरोदजनोपायविकृतक्षीरपूरनिभेन क्षीरपूरेण ।

---

' आहार्येति ' हा श्लोक म्हणून पूजा करावी. ' यो नैर्मल्य० ' व ' शांतिं च कांतिं चेति ' हा श्लोक म्हणून आशीर्वाद द्यावा.

' ॐ शरदिति ' हें गद्य ' व यज्जन्मेति ' आकृष्टेति ' हे दोन श्लोक म्हणून दुधानें श्रीजिनाभिषेक करावा. हें दूध शरत्काळीं उगवलेल्या चंद्राच्या किरणसमूहाप्रमाणें अतिनिर्मल आहे. गंगेच्या लाटांचें परस्पर संघर्षण झालें असतां जसा फेंस उत्पन्न होतो त्याप्रमाणें हें दूध भासतें. चतुर कवीची वाणी जशी प्रसन्न व

यज्जन्मस्नानदुग्धप्लवभरकलितो राजते स्मादिराजः ॥
क्षीरोदेनोपगूढो दृढमिव बहुशोऽदृष्टपूर्वोद्य दृष्टः ॥
सौधर्मैशानमध्यः स्वमपि धुरधुरायोगवद्यो बभासे ॥
तं देवं स्नातकाख्यं त्रिदशपरिवृढैः स्नातकं स्नापयामि ॥
किंच आकृष्टैवममर्त्यकैरसदृशं देवस्य सेवाकृते ।
मत्वेति स्वयमेत्य तं स्नपयति क्षीराबुराशिर्ध्रुवम् ॥
इत्युद्भावितशंकनैर्बहुशुभैः क्षीरैर्जिनं स्नापये ॥
क्षीराभासतनुं सुमेरुशिखरे क्षीराभिषेकाप्तये ॥ १४ ॥

क्षीरस्नपनम् ॥ आहार्यस्फुट० इत्यर्चना । यो नैर्मल्य इति । शांतिं च कांतिं इति च आशीर्वादः ॥

ॐ निजसमृद्धिनिरवकाशीकृतजिनांतरवकाशबहिश्चलदविरलशुक्ललेश्याविसराविलासेन ।

---

मधुर असते त्या प्रमाणे हे दूध निर्मल व मधुर आहे. मुक्तिलक्ष्मीच्या कटाक्षावलोकनाप्रमाणे सुंदर आहे. या दुधाच्या अभिषेकानें, मेरुपर्वत जणु काय जिनाच्या जन्मस्नानसमयीं क्षीरसमुद्रानें जणु काय आलिंगिला आहे असा इंद्राकडून पाहिला गेला होता यास्तव मीही केवलज्ञानसंपन्न असा श्रीजिनेश्वरास दुधानें अभिषेक घालतो. हें दूध नव्हे तर स्वतः क्षीरसमुद्रच प्रभूला स्नान घालीत आहे. यास्तव दुधाप्रमाणें श्वेत रक्त ज्याचें आहे अशा जिनाला मी अभिषेक घालतो यानंतर पूजन व आशीर्वाद हा विधि करावा.

'ॐ निजेति' हे गद्य व 'गुरुमपीति' लेश्येति' हे दोन श्लोक म्हणून श्रीजिनाचा दह्यानें अभिषेक

निरवधिप्रवर्द्धमानशुद्धशुक्लध्यानबंधुरेण जिनपतिप्रसादासादितसुरासुरमुख्यमूर्धचूडामणिभावोपलंभसंतुष्टतदंकमालिप्रधानपरतदीयविशदयशोराशिसंकाशेन । हस्तद्वयोद्धृतगलितामरनिजरूपनिराकृतानिर्जराहितसुमनोवर्षशोभातिशयेन । रागद्वेषमोहाक्रांतसर्वथैकांतवादिवाणीस्खलितशतविलोकाविर्भूतसर्वज्ञवीतरागस्याद्वादिजिनोपादिष्टशिष्टवाणीस्फुटाट्टहासलक्ष्मजुष्टेन । नितांतघनीभूतहिमखंडपांडुरेण । रजतमहीधरशिलातलकाठिनेन । स्फुटस्फटिकशिलाभ्यंतरैकांतनिर्मलेन । चंद्रकरचंद्रकांतोपलमेदुरेण । द्रप्स्यदधिविषयसोत्प्रासहासेनेव । वलक्षगुवलक्षरूपेणोपलक्षितेन । सकललौकिकमंगलमुख्यतावलेपनेनेव प्रभूतस्तब्धभावेन । स्वकीयबहुलसौरभप्रसरपराजितपरिपक्वदधित्थेन दध्ना ।

गुरुमपि गुरुणाग्र्यं मंगलं मंगलेन ।
शुचिमपि शुचिनोच्चैः शीतलं शीतलेन ॥
हितमखिलहितेनात्यंतरुच्येन रुच्यम् ।
जिनपमवृजिनेन स्नातकं स्नापयामि ॥ १५ ॥ किं च ॥

---

करावा. रागद्वेषाने व्याप्त अशा एकांतवाद्यांच्या वचनामध्यें शेकडो दोष आहेत हें पाहून उत्पन्न झालेली जी सर्वज्ञाची वाणी तिचा हा अट्टहास आहे कीं काय असें हें दही दिसतें हे दही चांदीच्या पर्वताच्या शिलेप्रमाणें दाट असें आहे. दही हें लोकामध्यें मंगलपदार्थ मानलें जातें. जिनेश्वर लोकगुरु आहेत व हें दही गुरु अर्थात शक्तिवर्धक आहे. जिनेश्वर मंगल-पापविनाशक आहेत व दही लोकाकडून मंगल वस्तु मानले आहे. जिन शुचि-कर्ममलरहित आहेत. दही स्वच्छ आहे जिनपति शीतल-क्रोधादिकषायरहित

लेश्या किं बहिरुद्गता जिनपतेः शुक्ला गमाजृंभणा—
दंतर्मातुमशक्तितः किमथवा ध्यानं नु शुक्लाह्वयम् ॥
किंवा केवलनामधीः किमथवा तीर्थंकरं पुण्यमि—
त्याशकेन शशांकदीधितिरुचा दध्ना जिनं स्नापये ॥ दधिस्नपनम् ॥

आहार्यस्फुटमित्यर्चना । यो नैर्मल्यमिति, शांतिं च कांतिं चेति चाशीर्वादः ।

कर्कोलैलामलयजहिमग्रथिपर्णागरुश्री—
जातीपत्रिप्रभृतिसुरभिद्रव्यसंसिद्धचूर्णैः ॥
स्वर्मोक्षश्रीविषयविलसद्द्रव्यचूर्णैरमीभि—

---

शांत आहेत. दही थंड आहे. जिनेश्वर हित-लोकहित करणारे आहेत व दही हित-आरोग्यप्रद आहे. याम्तव अशा दह्यानें निष्पाप अशा जिनाचा मी अभिषेक करितो. जिनेश्वराची शुक्ल लेश्या शरीरामध्यें मावण्यास असमर्थ झाल्यामुळें जणु बाहेर आली आहे काय ? अथवा जिनेश्वराचें हें शुक्लध्यान आहे काय ? किंवा हें जिनाचें केवलज्ञान अथवा तीर्थंकरनामकर्म आहे काय अशी शंका उत्पन्न करणाऱ्या चंद्राप्रमाणें निर्मल अशा दह्यानें मी जिनाचा अभिषेक करितो.

'आहार्यस्फुट' हा श्लोक म्हणुन पूजा करावी. 'यो नैर्मल्येति' व 'शांतिं च कांतिं चेति' हे श्लोक म्हणून आशीर्वाद द्यावा

'कर्कोलेति' हा श्लोक व 'ॐ कर्कोलैलेति' हा मंत्र म्हणून कंकोळ, वेलदोडा, चंदन, कापूर, गठाना, अगुरु, जायपत्री वगैरे सुगंधीचूर्णांनीं ज्यानें पापकर्माचें चूर्ण केलें आहे अशा जिनाचा दही, दूध, तूप यांनीं अभिषेक केला असतां जो चिकटपणा निघून जाता यावून त्याच्या अंगाला उटी लावावी.

दैवस्यामुष्य चूर्णीकृतदुरघगिरेरंगमुद्धूलयामः ॥ १७ ॥

ओं कर्कोलैलालवंगप्रियंग्वादिसुगंधिद्रव्यश्लक्ष्णपिष्टशुष्कचूर्णैर्जिनप्रतिमालग्नघृतक्षीरदधिप्रवहणलेपापनोदं विदधामि । मम भगवंतोऽर्हंतः संततानुबद्धदुरितोपलेपनं अपनुदंतु स्वाहा ॥

ओं ह्रीं सुगंधचूर्णेन जिनागमुद्वर्तयामि स्वाहा । सुगंधचूर्णोद्वर्तनम् ॥

कमलसदकपिष्टैः पुण्यरेणूत्कराभैः । मलयजरससांद्रैरिंदुधूलीविमिश्रैः ॥
जिनतनुमुपलिप्योद्वर्तयामः समंतादखिलमसितुकामा स्नानजस्नेहलेपम् ॥

ओं कर्पूरद्रव्यचंदनद्रव्यसंमिश्रजलार्द्रशालेय० ।

ओं ह्रीं पवित्रतरसुगंधशालिपिष्टेन जिनांगमुद्वर्तयामि स्वाहा । शालिपिष्टोद्वर्तनम् ॥१८॥

चूतन्यग्रोधबोधिद्रुमखदिरवरोदुंबरप्लक्षजंबू–
मुख्यानां सद्द्रुमाणां त्वगुपहितजलैः साधुसिद्धैः कषायैः ॥
सर्वैस्त्यक्तं कषायैर्निरवधिपरमस्वास्थ्यमाप्तं महात्मम् ।
संसारापारघोरज्वरशमनकृते स्नापयामो जिनेंद्रम् ॥ १९ ॥

---

'कमलेति' हा श्लोक व 'कर्पूरेति' हा मंत्र म्हणून कापूर, चंदन वगैरे सुगंधी पदार्थाचें चूर्ण ज्यांत मिसळलें आहे अशा तांदळाच्या पिठानें जिनाच्या अंगाला लेप करावा.

'चूतेति' हा श्लोक व ओं प्लक्षेति' हा मंत्र म्हणून आंबा, वड, पिंपळ, खैर, उंबर, पिंपरी, जांभूळ वगैरे झाडांच्या सालीच्या बारीक चूर्णांनीं जल भरलेल्या कलशांनीं कषायरहित, सुखपूर्ण, अशा जिनेश्वरास आम्ही आमचा संसारज्वर नाहींसा व्हावा म्हणून अभिषेक करितों.

नन्यसाधारणमहत्त्वमहोन्नतिमहालक्ष्मीसमालक्षितेन । शिष्टजनसमुदयसमीहितसंपादनसमुत्पन्नाशिष्ट-प्रतिपालनेन । दुःसहदुरितव्रातविध्वंसनरूपदुष्टानिग्रहानिर्गलेन । चतुर्भद्रोपायशक्तिरत्नत्रयसाधन-भावसमासादितसकलविबुधजनपूजनेन । माणिकनकादिसमस्तसारवस्तुविशेषानिवासेन । जिनमहामहसा-धनप्रधानभावकृतार्थीकृतनिजजीवनेन । समलंकृताखिलसुवृत्तकलशसभामध्यमध्यासीनेन । सक-लकलशराजश्रियातिशुंभतानेन मध्यकुंभेन ।

सकलभुवननाथं तं जिनेंद्रं सुरेंद्रैरभिषवविधिमाप्तं स्नातकं स्नापयामः ॥
यदभिषवणवारां बिंदुरेकोऽपि नृणां प्रभवति हि विधातुं भुक्तिसन्मुक्तिलक्ष्मीः ॥

ओं ह्रीं श्रीं क्लीं ऐं अर्हं वं मं हं सं तं पं वं २ मं २ हं २ स २ तं २ पं २ झं २ झ्वीं २ क्ष्वीं २ द्रां २ द्रीं २ द्रावय २ नमोऽर्हते भगवते श्रीमते । ओं ह्रीं क्रों मम पापं खंड २ दह २ हन २ पच २ पाचय २ हं झं झ्वीं क्ष्वीं ह सः झं वं ह्वः पः हः क्षां क्षीं क्षूं क्षें क्षैं क्षों क्षौं क्षं क्षः क्ष्मीं ह्रां ह्रीं ह्रूं ह्रें ह्रैं ह्रों ह्रौं ह्रं ह्रः ह्रीं द्रां द्रीं द्रावय २ नमोऽर्हते भगवते श्रीमते ठठ मम

---

आशिर्वाद द्यावा. 'ॐ निजागेति' हें गद्य म्हणून मध्य कुंभानें अभिषेक करावा या मध्य कुंभांत शुंगे ज्याच्या सभोंवती चोंवारत आहेत असे सुगंधी पदार्थ टाकलले असतात या कुंभाच्या सभोंवती माळा वगैरे मंगलपदार्थ अडकावलेले असतात म्हणून हा मनोहर दिसतो. हा मध्यभागीं असल्यामुळे याला कलशराज म्हणतात

'सकलेति' हा श्लोक व मंत्र म्हणून बृहच्छांतिमंत्राने जिनेशाचा गंधोदकाभिषेक करावा. जिनाभिषेकाच्या पाण्याचा एक थेंब देखिल मनुष्यांना नाना प्रकारचे भोग देण्यास व मुक्तिपद देण्यास समर्थ आहे.

श्रीरस्तु सिद्धिरस्तु पुष्टिरस्तु. शांतिरस्तु । कल्याणमस्तु । स्वाहा । बृहच्छांतिमंत्रेण गंधोदकाभिषेकं कुर्यात् ॥ २३ ॥ आहार्यस्फुट इत्यर्चना । यो नैर्मल्य इति शांतिं च कांतिमिति च आशीर्वादः ॥

घातिव्रातविघातजातविपुलश्रीकेवलज्योतिषो ।
देवस्यास्य पवित्रगात्रकलनात्पूतं हितं मंगलम् ॥
कुर्याद्भव्यभवार्तिदावशमनं स्वर्मोक्षलक्ष्मीफल—
प्रोद्यद्धर्मलताभिवर्धनमिदं सद्गंधगंधोदकम् ॥

आशीर्वादः ॥ २४ ॥

यस्योदारदयस्य जन्म हरतो जन्माभिषेकोत्सवम् ॥
चारौ मेरुमहीधरस्य शिखरे दुग्धैस्तु दुग्धोदधेः ।

---

'आहार्य' हा श्लोक ह्मणून पूजा करावी. 'यो नैर्मल्यमिति' 'शांतिं चेति' हे श्लोक ह्मणून आशिर्वाद द्यावा.

'घातीति' हा श्लोक ह्मणून हें गंधोदक केवलज्ञानसंपन्न अशा श्रीजिनाच्या अंगस्पर्शानें पवित्र, हितकर व मंगल असें झालें आहे. हे भव्यांचें संसारदुःख नाहींसें करो. हें गंधोदक धर्मरूपी लतेला वाढऊन स्वर्ग व मोक्ष हीं दोन फळें उत्पन्न करणारें आहे. असा आशिर्वाद द्यावा.

'यस्येति' हा श्लोक म्हणून ज्याचा मेरुपर्वतावर इंद्रांनीं अभिषेक केला त्या श्रीजिनाचें पादपद्म मी अकरा प्रकारानें पूजिता अशी प्रतिज्ञा करून पुष्पांजलि क्षेपण करावी.

चक्रे शक्रगणो महागुणनिधेः श्रीपादपद्मद्वयम् ॥
तस्यैकादशधा महेन महतामाराध्यमाराधये ॥ २५ ॥ पुष्पांजलिः ।

यत्रागाधविशाल• इत्येकादशधा महामहः ॥

अष्टाधिकाशीतिसुरावृतानां इष्टार्थदानां नवदेवतानाम् ॥
आराधनं चात्र महामहांगं श्रीपीठयंत्रे विधिना विधास्ये ॥ पुष्पांजलिः ॥
विहारकाले जगदीश्वराणामित्यादि वायुमेघाग्निनागानभ्यर्चयेत् ॥

कर्णिकाभ्यंतरे ॥

घातिप्रक्षयजाक्षयोर्जितमहाधीसौख्यदृक्शक्तयः ।
कल्याणानि महान्ति पंच परमश्रीप्रातिहार्याष्टकम् ॥
प्राप्ता ये भुवनस्तुतैरतिशयैर्युक्ताश्चतुस्त्रिंशता ।
तानर्हाम्यहमर्हतस्त्रिजगतीसाम्राज्यलक्ष्मीपतीन् ॥

ओं ऱ्हां नितांतशुद्धबुद्धस्वभावनिजात्मनिखिलप्रदेशानादिघटितनिराघाटघातिघोराटवीसाटोप-

---

'अष्टेति' हा श्लोक म्हणून अठ्यांयशी देवतांनी वेढलेल्या व इष्टप्राप्ति करून देणाऱ्या अशा नवदेवतांचें मी श्रीपीठयंत्रामध्यें विधीनें आराधन करितो अशी प्रतिज्ञा करावी व पुष्पांजलि क्षेपण करावी.

'विहारेति' हा श्लोक म्हणून वायुकुमार, मेघकुमार, अग्निकुमार, व नागकुमार यांची पूजा करावी.

'घातीति' हा श्लोक म्हणून व 'ॐ ऱ्हां नितांतेति' हा मंत्र म्हणून कर्णिकेच्या मध्यभागीं वर्तमान भूत व भविष्यत्कालीन जिनेश्वराची अष्टद्रव्यांनीं पूजा करावी.

शिखापटलदावानलायमानद्वितीयशुक्लध्याननिःपातितारिहननरजोरहस्यहननसंजातजगत्त्रयाविधेय-महार्हणानिवासोद्भूताचिंत्यार्हंत्यपदमधिष्ठितानाम् । सर्वतो विजृंभमाणसाकारानिराकारकेवलज्ञानदर्शनयुगपत्प्रवृत्तिव्यवस्थितप्रमाणप्रतिपन्नसर्वज्ञत्वानाम् । शक्तिव्यक्तिविभागावस्थितसमस्तवस्तुविविधाकारकिर्मीरितसकलसंसारिमुक्तात्मस्वरूपसंकरव्यतिकरव्यपेतसाक्षात्करणशक्तिरूपपरमाश्चर्याणाम् । व्याबाधव्यपेताचिंत्यसारमानोपमानातीतानित्यनिजात्मजातानंदमंदिराणाम् ॥ त्रिभुवनैकाधिपतित्वव्यंजकविशिष्टाष्टमहाप्रातिहार्यादिबहिरंगमहालक्ष्मीसमालक्षितानाम् । सकललोकैकमंगललोकोत्तमशरणभूतानाम् । सप्ततिसमेतशतकर्मभूमिभूतभवद्भव्यानां भगवदर्हत्परमेष्ठिनामष्टतयीमिष्टिं करोमि स्वाहा । स्वच्छैस्तीर्थै॰ श्रीमज्जिनेंद्रान्यजे ॥ १ ॥

पूर्वदलाभ्यंतरे ।

ओं बाह्याभ्यंतरहेतुजातसुदृशः पूर्वश्रुतैरादिमा—

च्छुक्लध्यानयुगाद्विजित्य दुरितं लब्ध्वा सयोगिश्रियम् ॥

प्राप्यायोगिपदं परेण सकलं निर्जित्य कर्मोत्करम् ॥

---

'स्वच्छैस्तीर्थैति' हा श्लोक म्हणून श्रीजिनेश्वरांस अर्घ्य द्यावा. ज्यांना घातिकर्माचा नाश झाल्यामुळें केवलज्ञान, दर्शन अनंतसुख व वीर्य हे चार गुण प्राप्त झाले आहेत, पांच कल्याणिकें व आठ प्रातिहार्यांनीं जे युक्त आहेत ज्यांना चौतीस अतिशय प्राप्त झाले आहेत त्या त्रैलोक्याच्या साम्राज्यलक्ष्मीचे पती असलेल्या श्रीजिनेश्वरास मी भक्तीनें पूजितो.

पूर्व दलाच्या मध्यें 'ॐ बाह्येति' हा श्लोक म्हणून सिद्ध परमेष्टींचें पूजन करावें बाह्य व अभ्यंतर कारणांनी ज्यांना सम्यग्दर्शन प्राप्त झालें, ज्यानी १४ पूर्वांच्या ज्ञानानें पहिल्या दोन शुक्ल ध्यानाची प्राप्ति

शुक्लध्यानयुगेन सिद्धगुणान्सिद्धान्समाराधये ॥

ओं ऱ्हीं निरवशेषावरणविश्लेषाविष्कृतचरमानंतानंतनिर्भासजाज्वलत्त्रिकालविषयलोकालोकवर्तिसर्वद्रव्यपर्यायक्रमकरणव्यवधानातिक्रमसाक्षात्करणदक्षाक्षूणकेवलाख्यपरंज्योतिःप्रमुखस्वाभाविकानंतगुणविशेषविभूषितानाम् । अशेषभोग्यद्रव्यद्रव्यकर्मनिरपेक्षस्वात्मोपादानमात्रसंजातातिशयसकलात्मप्रदेशनित्यव्यापकस्य सर्वदा सर्वबाधावृद्धिक्षयप्रतीक्षदुःखोदयमानोपमानपरित्यक्तस्य । सकलचाक्रिकुरुभवार्यफणींद्रसुरेंद्राहमिंद्रात्रिकालसंभवसुखानंतगुणितक्षणपर्यायस्य । सम्यक्सकलशास्त्रविदृष्टांतसाधितसंसारनाटकावलोकनसंभावितसर्वकालशाश्वतपरमोत्कृष्टसुखस्यैकानिवासानाम् । नैगमनयातिरूढतपोनयसंयमचारित्रज्ञानदर्शनाभिद्धप्रसिद्धव्यवहाराणाम् । सकललोकैकमंगलोत्तमशरणभूतानाम् । सप्ततिसमेतशतकर्मभूमिभूतभवद्भव्यानाम् । भगवत्सिद्धपरमेष्ठिनामष्टतयीमिष्टिं करोमि स्वाहा । स्वच्छैस्तीर्थैः श्रीसिद्धनाथान् यजे ॥ २ ॥

करून घातिकर्मांचा नाश केला त्यामुळें ज्यांना १३ वें गुणस्थान प्राप्त आलें. बाकीच्या दोन शुक्लध्यानानें बाकीच्या कर्मांचा नाश करून आठ सिद्धगुणांची प्राप्ति करून घेतली त्या सिद्ध परमेष्ठींची आराधना मी करितो.

'ओं ऱ्हीं निरवशपति' हें गद्य म्हणून सिद्धपरमेष्ठीची अष्टविध द्रव्यांनीं पूजा करावी. संपूर्ण ज्ञानावरणीय व दर्शनावरणीय कर्मांचा नाश झाल्यामुळे अनंतज्ञान व दर्शन प्राप्त होतें. त्यामुळें सिद्धपरमेष्ठि सर्व त्रैलोक्यांतील द्रव्यें व त्यांचे पर्याय यांना एकदम इंद्रियांचें साहाय्य न घेतां जाणतात व पाहतात तसेंच त्यांना अनंतगुणांची प्राप्ति होतें. त्यांचे आत्मप्रदेश पूर्ण रीतीनें कर्मरहित झालेले असतात. त्यांना कोणतीही बाधा नसते. त्यांना वृद्धि, क्षय, व दुःख वगैरे विकार नसतात. चक्रवर्ति, देवकुरुभोगभूमींतील आर्य, धरणेंद्र, इंद्र, अहमिंद्र यांना जें सुख होतें त्याच्या अनंतपटीनें अधिक असें सुख सिद्धांना प्रतिक्षणीं होत असतें. या प्रमाणें संक्षेपानें

दक्षिणदलाभ्यंतरे ॥

कुमततिमिरसूर्यान्सारगांभीर्यधैर्यान् ॥
परहितनिजकार्यान्पचभेदोढचर्यान् ॥
विनयनाविधिवीर्यान् पूजयामो धृतार्यान् ॥
मुनिजनपरिवार्यान् श्रीमदाचार्यवर्यान् ॥

ओं ऱ्हूं निजनिरतिशयतपश्चरणप्रभावोपलब्धबुद्धिऋद्धिप्रकृष्टश्रुतज्ञानावरणवीर्यांतरायक्ष—योपशमद्वाराविर्भूतसकलश्रुतज्ञानस्वपरपक्षदक्षमलक्षणगुणांतरादानोपस्कारदूरापास्तसमस्तविनेयसंशय - विपर्ययावसानव्यवसानदुस्तरतमःस्तोमानाम् ॥ संयतजनमनश्चमत्कारकरणप्रवीणाचारवत्वाद्यष्टकाचेलक्यादिदशकतपोद्विषट्कावश्यकषट्कलक्षणानन्यसाधारणषट्त्रिंशद्गुणरत्नरत्नाकराणाम् ॥ शुद्धचिदात्मस्वरूपनिजात्मनिर्विकल्पसमाधिजानितसारसुखास्वादनलंपटानामपि परहितापादनैकतानमानसानाम् । निःश्रेयसामोघनिबंधनज्ञानदर्शनचारित्रतपोवीर्याचारानंतचतुष्टयलाभाय स्वयमाचरता-

---

सिद्धांचें स्वरूप समजावें. दक्षिणदलामध्यें आचार्य परमेष्ठिची पूजा करावी.

‘ कुमतेति ’ हा श्लोक म्हणून आचार्यपरमेष्ठिची अष्टद्रव्यांनीं पूजा करावी. हे आचार्यपरमेष्ठी कुमतिरूपी अंधारास सूर्यासारखे आहेत. दुसऱ्यावर उपकार करणें हें यांचें कर्तव्यकर्म आहे दर्शन, ज्ञान, तप, वीर्य व चारित्र या पांच आचारामध्यें हे तत्पर असतात. हे शिष्यांना शिक्षण देतात अशा या आचार्यवर्यांची ‘ ओं ऱ्हूं निजेति ’ हें गद्य म्हणून अष्टद्रव्यांनीं पूजा करावी.

‘ ओं ऱ्हूं निजेति ’ हें गद्य म्हणून आठद्रव्यांनीं श्रीआचार्य परमेष्टिंची पूजा करावी हे आचार्य परमेष्टि

मपि परानाचारयताम् । सकललोकैकमंगललोकोत्तमशरणभूतानाम् । सप्ततिसमेतशतकर्मभूमिभूतभवद्भव्यानां भगवदाचार्यपरमेष्ठिनामष्टतयीमिष्टिं करोमि स्वाहा ।

स्वच्छैस्तीर्थ० पूजये धर्मसूरीन् ॥ ३ ॥

पश्चिमदलाभ्यंतरे ।

दुःखावर्तसहस्रदुस्तरमहासंसारघोरांबुधि–
क्षिप्रप्रोत्तरणार्थिसार्थजिनवाक्यामोघपोतप्रदान् ॥
नित्यानंदनिवासनिश्चलचिदात्मात्मानिशाभ्यासतः ॥
सोभ्यासीभवदक्षयामृतपदान् श्रीपाठकार्यान्यजे ॥ ४ ॥

ओं ह्रीं अनादिविद्याविलासदुस्तरतमःपटलपटावगुंठितजगदूर्जितज्योतीरूपजगदेकसाराचाराद्यंगसामायिकाद्युपागसंगनासंतानप्रवृत्तप्रमाणभूतभूतदयैकतानादि प्रपंचप्रवचनपारावारपारंगतानाम् । अक्षयात्यक्षमोक्षसुखैकसाधकतमांतरंगतपःसनाथीकृतपराकाष्ठाधिष्ठितानेकविधबहिरंगतपस्तप्यमानानाम् । दृष्टेष्टाविरोधादिदोषास्पृष्टप्रसादमाधुर्यादिगुणाश्लिष्टाविशिष्टातितुष्टिप्रदसूक्तिसुनयप्रमाणात्मकयु-

---

स्वतः पाच प्रकारच्या आचारांचें पालन करून शिष्याकडूनही यांचें पालन करवितात. हे मंगल, लोकोत्तम व शरण आहेत. १७० कर्मभूमीमध्यें झालेले, असलेले व होणारे सर्व आचार्यपरमेष्ठि मजकडून अष्टद्रव्यांनी पूजिले जातात.

पश्चिमदलामध्यें 'दुःखावर्तेति' हा श्लोक व ओं ह्रीं अनादीनि' हें गद्य म्हणून उपाध्याय परमेष्ठींचें पूजन अष्टद्रव्यांनीं करावें. हा संसारसमुद्र हजारो दुःखरूपी भोवऱ्यांनी भरलेला आहे. यामध्यें जिनोपदेश

क्तियुक्ताक्षेपणीप्रभृतिचतुर्विधधर्मोपदेशामृतवृष्टिसंतर्पितभव्यसस्यानाम् । शुद्धोपयोगानुविद्धध्यानाधीनशुद्धबुद्धस्वभावानुभूतिसमुद्भूतशुद्धसुखाब्धिविवक्षूणामपि मुमुक्षुजनमोक्षमार्गोपदेशकरणबद्धकक्षाणाम् । सकललोकैकमंगललोकोत्तमशरणभूतानाम् । सप्ततिसमेतशतकर्मभूमिभूतभवद्भव्यानां भगवदुपाध्यायपरमेष्ठिनामष्टतयीमिष्टिं करोमि स्वाहा ॥

स्वच्छैस्तीर्थ० श्रीपाठकेन्द्रान्यजे ।

उत्तरदिग्दले च ।

त्यक्त्वा संगमशेषमक्षयपदोत्कंठास्तपो दुष्करम् ।
कुर्वन्तः प्रतिसंहृतेन्द्रियमरुत्स्वान्ताः स्फुरच्चेतनाः ॥
ध्यानं धर्म्यमथापि शुक्लमपि ये कुर्वन्ति सर्वर्द्धयः ॥
सर्वाच्यानिह सर्वसंयमगुणांस्तान्सर्वसाधून्यजे ॥

ओं ऱ्हः सर्वज्ञवीतरागप्रकाशितानादिप्रवचनहृदयान्तस्तत्त्वैकलोलीभावनिर्वर्तितनिर्विकल्पशुद्धस्वात्मसंवेदनरूपसमिद्धध्यानैकतानमानसानाम् । इतरयातिदुरासदातिविस्मयकराचिंत्यप्रभावसप्तर्द्धि-

रूपी नावेला वल्हविणारे उपाध्याय परमेष्टि नावाडी आहेत ते भव्यजनांना या संसारसमुद्रांतून पार करितात. नेहमी आनंदाचा साठा असा जो आत्मा त्याचें हे परमेष्टी निश्चल ध्यान करितात व या ध्यानाभ्यासामुळे त्यांना अक्षयपदाची ( मोक्षाची ) प्राप्ति होते. यास्तव अशा उपाध्यायपरमेष्टिची मी अष्टद्रव्यांनीं पूजा करितो. हाच अभिप्राय गद्यामध्येंही सांगितला आहे.

उत्तर दिशेच्या दलामध्यें साधु परमेष्टींची पूजा करावी. संपूर्ण परिग्रहांचा त्याग करून मोक्षासाठीं जे दुष्कर तपश्चरण करितात. जे आपली इंद्रियें व मन यांना वश करून धर्मध्यान अथवा शुक्लध्यान करितात.

समुत्पादनपवित्रतरचारित्राणाम् । परमोत्तमधर्मध्यानप्रथमशुक्लध्यानान्यतरशुद्धध्यानसामर्थ्यसंपद्यमानागण्यपुण्यास्रवसहचरसकलपापकर्मसंवरनिर्जराप्रबंधानाम् ॥ निजांत:प्रतिफलितसमस्तवस्तुविस्तारविपुलकेवलज्ञानोदयोपघातघातिसंघातघातनसमर्थसहजचैतन्यशक्तिव्यंजकात्मदेहादिभेदज्ञानसंतातिप्रवृत्तिप्रवृद्धध्यानोद्दीपितनिजानंदरसास्वादक्षणावधीरितमोक्षाभिलाषाणाम् । सकललोकैकमंगललोकोत्तमशरणभूतानाम् । सप्ततिसमेतशतकर्मभूमिभुतभवद्भव्यानां भगवत्साधुपरमेष्ठिनामष्टतयीमिष्टिं करोमि स्वाहा ॥

स्वच्छैस्तीर्थै० ॥ श्रीसर्वसाधून्यजे ॥ ५ ॥

आग्नेयदलाभ्यंतरे च ।

संसारेग्रमहाटवीस्फुटमरुत्संवृद्धदावानलं ।
संपूर्णमरवृत्तधीरुचिमयं लोकत्रयीदुर्लभम् ॥
लभ्यं नूनमयोगिकेवलगुणस्थानातिमैकक्षणे ॥
साक्षान्मोक्षनिबंधनं निरुपमं धर्मं समभ्यर्चये ॥

ओं दर्शनमोहज्ञानावरणवीर्यांतरायचारित्रमोहप्रभुत्प्रतिबंधोपशमादिसंजातोपशमादिस्वरूपप्रादेशसम्यग्दर्शनज्ञानचारित्रभेदरूपस्य। तद्भेदभावनाविशेषप्रबंधप्रादुर्भावितप्रादेशिकाभेदरूपसामिद्धधर्म्यशुक्ल

---

अनेक ऋद्धि ज्यांना प्राप्त होतात अशा पूज्य साधूंची मी आठद्रव्यानीं पूजा करितो.

अग्नेय दलामध्यें जैन धर्माची पूजा करवीं. त्यावेळीं ‘ संसारेति ’श्लोक मंत्र व ओं दर्शनेति’ हे श्लोक म्हणावें. हा धर्म संसाररूपी जंगलाला अग्निसारखा आहे. हा धर्म क्षायिक सम्यग्दर्शन, ज्ञान, चारित्र यांनीं पूर्ण आहे.

ध्यानबलेन तदभेदरूपमात्मप्रदेशव्यापकं विधाय कृतकृत्यतया निवृत्तव्यापारस्य । निरवशेषकर्मसंघातनिर्मूलक्षपणादुष्करकर्मकर्मठस्य । समस्तपुरुषार्थपराकाष्ठाधिष्ठितनिःश्रेयसाभ्युदयपरंपरानिबंधनस्य । मंगललोकोत्तमशरणभूतस्य केवलिप्रज्ञप्तधर्मस्याष्टतयीमिष्टिं करोमि स्वाहा ।

स्वच्छैस्तीर्थै० ॥ श्रीजैनधर्मं यजे ॥ ६ ॥

नैऋत्यादिग्दलाभ्यंतरे च ।

अपौरुषेयानखिलानदोषानशेषविद्भिर्विहितप्रकाशान् ॥
प्रकाशितार्थान्प्रयजे प्रमाणं प्रवेदयद्द्वादशदिव्यवेदान् ॥

ओं निखिलजगदेकसारनिरतिशयपरमगंभीराणाम् अमोघस्यात्कारलांछितत्वेन पराप्रधृष्याणामपि परप्रधर्षकाणाम् । स्थानत्रयाविसंवादित्वेन प्रमाणभूतानामखिलबाधाजाललंघनजंघालानाम् । अनादिपरंपरायातत्वेन अपौरुषेयाणाम् । मंगलपूर्ववस्तुप्रभृतिभेदभेदोपलक्षितानाम् । प्रमाणनयनिक्षेपनिर्देशादिमदसदादिजीवस्थानगुणस्थानमार्गणास्थानाधिगमोपायप्रज्ञापितषड्द्रव्यपंचास्तिकायसप्ततत्वनवपदार्थानाम् । सकलवर्णाश्रमाचारव्यवहारप्रायश्चित्तादिविधिप्रतिपादकानामप—

---

त्रैलोक्यामध्यें दुर्लभ आहे. या धर्माची पूर्णता अयोगिकेवलि नांवाच्या चौदाव्या गुणस्थानामध्यें होते. हा धर्म मोक्षकारण आहे, अनुपम आहे. याची मी अष्टद्रव्यानें पूजा करितो.

नैऋत्यादिशेंतील दलामध्यें ' अपौरुषेयेति ' हा श्लोक म्हणून श्रीजिनशास्त्राची पूजा करावी. जैनशास्त्र हें निर्दोष आहे, सर्वज्ञ भगवंताकडून तें प्रगट केलें आहे व अनादि कालापासून तें असल्यामुळें अपौरुषेय व जेव्हां जेव्हां त्याचा लोप होतो तेव्हां त्याची जिनेश्वर पुनरुत्पत्ति करितात म्हणून तें पौरुषेय आहे. जिनेश्वरा-

रस्परव्याहतवाक्यार्थानाम् । नित्यमहादिविविधयज्ञकर्मनिवेदकानाम् । अखिलभूतदयैकतानानामभ्युदयफलावसानानाम् । ब्रह्मलोकाविच्छिन्नसंप्रदायानाम् । इहपरापरपरमेष्ठिसंतानप्रकाशितानाम् । अतिविततमिथ्यांधकारावृतलोकैकज्योतीरूपाणाम् । राजर्षिदेवर्षिपरमर्षिब्रह्मर्षिभिर्वाचनाप्रच्छनादीभिरुपासितानाम् । भूतं भवंतं भविष्यंतं सूक्ष्मं व्यवहितं विप्रकृष्टमेवंजातीयकमर्थमशेषमावेदयतामन्वर्थवेदव्यपदेशानाम् । आचारसूत्रकृतस्थानसमवायव्याख्याप्रज्ञप्तिज्ञातृकथोपासकाध्ययनांतकृद्दशौपपादिकदशप्रश्नव्याकरणविपाकसूत्रदृष्टिवादाख्यद्वादशानाम् । मंगललोकोत्तमशरणभूतानामष्टतयीमिष्टिं करोमि स्वाहा ॥

स्वच्छैस्तीर्थै• ॥ श्रीजैनवाक्यं यजे ॥ ७ ॥

वायव्यादिग्दले ।

कोट्योर्हत्प्रतिमाशतानि नवती पंचोत्तरा विंशतिः ॥
पंचाशक्त्रियुता जगत्सु गुणिता लक्षा सहस्राणि तु ॥
सप्ताग्रापि च विंशतिर्नवशतीच्यूनं शतार्धं मता—

---

नीं सांगितलेल्या आचारांग, सूत्रकृतांग, स्थानाग वगैरे द्वादशांगांचें वर्णन यामध्यें आहे वायव्य दिशेंतील दलामध्यें '–कोट्योर्हदिति ' हा श्लोक म्हणून अकृत्रिम जिनप्रतिमांची पूजा करावी. या अकृत्रिम प्रतिमामध्यें अर्हतांची स्थापना केली आहे बत्तीस यक्षांची जोडी आपल्या हातांत चामर धारण करून वारीत आहेत अशा प्रतिमांनीं या प्रतिमा युक्त आहेत. या जिनप्रतिमांचे केश निळे, दांत हिऱ्याचे, ओठ पोवळ्यासारखे लाल, हात व पायांचे तळवे लाल आहेत श्रुतदेवी, सर्वाण्हयक्ष, सनत्कुमार यांच्या प्रतिमांनीं ह्या प्रतिमा युक्त

स्ता नित्या पुरुतुंगपूर्वमुखसत्पर्यंकबंधान्यजे ॥

ओं सर्वज्ञवीतरागपरमाप्तपदप्रतिष्ठाधिष्ठितभगवदर्हद्भट्टारकस्थापनान्यासानिवासतापुण्यगुण-प्रायप्रचोदितत्रिजगज्जनविधीयमानपूजातिशयास्पदानाम्। नागयक्षामरद्वात्रिंशन्मिथुनकरकलितचतुःषष्टिचामराद्यष्टप्रातिहार्यविशिष्टानाम् । विनीलकुंतलकुलिशदशनप्रवालाधरपल्लवोपमानकर—चरणतलसमुल्लसितानाम् । श्रीमच्छ्रुतदेवीसर्वाण्हसनत्कुमारयक्षप्रतिमोपलक्षितपीठोपकंठानाम् । प्रत्येकाष्टशतभृंगारादिमंगलद्रव्याष्टकगर्भगर्भावासमध्यमध्यासीनानाम् । वदंतीनामिव पश्यंतीनामिव हसंतीनामिव निजासेचनरूपातिशयेन सकलजनमनश्चमत्कारमातन्वतीनाम् । आसन्नभव्यताद्यंतरंगसाधनसंपन्नभव्यजनसम्यक्त्वोत्पत्तिबहिरंगनिमित्तमाहिमानमापादयंतीनाम् । अलब्धशुद्धोपयोगिनामर्चानिर्मापणस्थापनार्चनापराणाम् । पुण्यापुण्यास्रवसंवरतत्साधकवृद्धिक्षयसाक्षात्फलचतुष्टयमापादयंतीनाम् । मंगललोकोत्तमशरणभूतानामर्हद्भट्टारकप्रतिमानामष्टतयीमिष्टिं करोमि स्वाहा ।

स्वच्छैस्तीर्थ• श्रीजैनबिंबान्यजे ॥ ८ ॥

ऐशान्यांतरदिग्दलेच

भवनजवनजानां ज्योतिषां कल्पजानां
मणिमयनिलयस्था येहमिंद्रालयस्थाः ॥

---

आहेत. या जिनप्रतिमा अतिशय सुंदर आहेत. जणु काय बोलतात, हसतात असें वाटतें. आसन्नभव्य जीवांना सम्यक्त्व उत्पन्न होण्याला कारण आहेत यांच्या दर्शनानें पुण्यास्रव होतो. पापाचा संवर होतो.

बहुविभवयुता ये ये च मध्ये त्रिलोके ॥
जिनपतिनिलयास्ताँस्ताँश्च सर्वान्महामि ॥

ओं रजतमहारजतेंद्रनीलमरकतमाणिक्यमयमहामानभासुरभित्तिस्तंभशालिशिखरमंडपमहामानस्तंभाद्यंगोपांगसगताकीर्णपंचवर्णप्रभाजालप्रभाविहितविचित्रांबरविलासांबराणाम् । संततानादिमंसिद्धहटद्धाटकीयधूपघटपेटकास्यनिर्यद्विश्वतोविसर्पिधूमलेखाजालबहलपरिमलप्रकरसुरभीकृतसकलदिङ्मुखानाम् । वंदारुसुरासुरवृंदारकजयजयारावसुरनर्तकिकरकंकणझंकाराद्विगुणीकृतानाद्विघटितघटाजालझणझणध्वानबाधिरीकृतनिखिलदिङ्मडलानाम् । तमःसमूलसमुत्पाटनपटुतरावलोपालिप्सागतगभस्तिमालिमंडलायमानहटद्धाटकीयघटितपेटकोपघटितचित्तचमत्काराणाम् । चकचकायमाननानाविधोपकरणनिचितनीलतलनिर्जितज्योतिर्गणांकितगगनांगणानाम् । समुत्तुंगसुवर्णभित्तिभागालंबमानमाणिमालामुषितमेरुगिरिपार्श्वशोभातिशयानाम् । विचित्रनिर्माणवदनाभिषेकनर्तनसगीतावलोकनादिमंडपाभिसंडितचैत्यमहीमडितानाम् । कुंजरारातिकुंजरादिदशविधध्वजराजीसभाजिताद्वितयिशालांतरध्वजधराविराजितानाम् । चतुर्दिग्गताशोकसप्तच्छदचंपकाम्रचतुर्वर्णांचिततृतीयबहिःशालांतरगतवनावनिविनूतानाम् । चतुर्वीथीपर्यंतगतमहामानस्तंभाहितप्रतितीर्थजनमानस्तंभानाम् । स-

ईशान्य दिशेंतील दलामध्यें जिनालयाचें अष्टविध द्रव्यानीं पूजन करावें 'भवनेति' भवनवासी, व्यंतर, ज्योतिष व कल्पवासी यांच्या येथें रत्नखचित जिनमंदिरें आहेत. व अहमिंद्रांच्या रहाण्याच्या ठिकाणी अर्थात् नवग्रैवेयक अनुदिश, अनुत्तर येथेंहि रत्नमय जिनमंदिरें आहेत मध्यलोकांतहा हिमवान् वगैरे पर्वतावर अकृत्रिम जिनमंदिरें आहेत. या सर्वांना मी अष्टद्रव्यानीं पूजितो.

हजसकलपरिष्कराणमकृत्रिमाणामहार्यविविधालंकाराणामपि कृत्रिमाणां । मंगललोकोत्तमशरणभूतानां । भगवज्जिनचैत्यालयानामष्टतयीमिष्टिं करोमि स्वाहा ॥

स्वच्छैस्तीर्थ• ॥ श्चैत्यालयान्संयजे ॥ ९ ॥

अथ प्रथममंडलाभ्यंतरे ।

ये सांसिद्धिकदिव्यभुषणलसद्दिव्यांगदीप्त्युज्ज्वला ॥
ये शिष्टाष्टगुणाश्च येऽवधिमिता बोधं भवप्रत्ययम् ॥
ये नंदादितिथिप्रवर्तनविधौ दक्षाश्च यक्षादय:
तानेताञ्जिनयज्ञविघ्नविहतौ न्यक्षेण यक्ष्ये क्षमान् ॥

ओं धर्माधर्मानुभोगपरिच्छिन्नपर्यंतासंख्यातप्रदेशलोकाकाशप्रतिप्रदेशैकैकव्यवस्थितरत्नराशिसंकाशवर्तनालक्षणकालाणुमुख्यकालबलोपबृंहितक्रियारूपक्रियाविशेषपरिच्छिद्यमानसमयादिस्वरूप — व्यवहारकालप्रभेदपंचदशतिथिस्वाम्यतान्निबंधनजयापजयलाभालाभादिसकललोकयात्राप्रवर्तनदक्षपक्षादितिथिदेवतानाम् । सकलसंपत्संपादकदयामयमहायागप्रत्यूहव्यूहातिक्रमार्थमावाहनादिपुरःसरसपर्याक्रमं यथाक्रममुपक्रमामहे ॥ ओं ह्रीं वैश्वानर• सर्वेऽप्यायात २ यानायुधयुवातिजनैः सार्धं ॥ ओं भूर्भुवः स्वः स्वाहा । इमं सार्घं चरुममृतामिव स्वस्तिकं यज्ञभागं गृण्हीत २

---

यानंतर प्रथममंडलामध्यें पंधरा तिथि देवताची पूजा करावी. ह्या देवता स्वाभाविक भूषणांनी युक्त आहेत. नंदा भद्रा वगैरे तिथींचें परिवर्तन या करीत असतात जिनपूजनांतील विघ्नें या दूर करण्यास समर्थ असतात. याचें आव्हान वगैरे करून अर्घ्य, चरु, यज्ञभाग वगैरे अर्पण करावा. तदनंतर द्वितीय मंडलामध्यें 'रत्नकीर्ति' हा

अथ द्वितीयमंडलाभ्यंतरे ।

रक्तार्कं धवलेंदुमारमरुणं पीतं ससौम्यं गुरुम् ॥
शुक्रं शुक्लमलिप्रभं शनिमहिं केतुं सुवर्णार्चनैः ॥
पुंजेपूचितमंडलोपरिकृतेष्वास्थाप्य मूलान्वितम् ॥
दर्भं संस्कृतमत्र साधु धिनुयां तत्तत्सवर्णार्चनैः ॥

ओं महीतलोपरिष्टादष्टशताशीत्युत्तराष्टशतत्रिद्वादशषण्णवत्यूननवशतनवशतिप्रमाणयोजनातिक्रान्ताकाशप्रदेशसंचाराणां ॥ एकषष्टिभागीकृतप्रमाणयोजनाष्टचत्वारिंशद्भागषट्पंचाशद्भागकोशार्धार्धकोशकिंचिन्न्यूनकोशक्रोशतदर्धोपारावेस्ताराणां ॥ प्रत्येकं चतुःसहस्रसंख्यतत्संख्यद्विद्विसहस्रप्रमाणपूर्वादिदिग्गतासिंहासिंधुरमहोक्षजाटिलाश्वाकाराभियोग्यामरनीयमानानिलप्रतिष्ठितविमानानाधितिष्ठताम् ॥ संवत्सरसहस्रतच्छतसहस्राधिकपल्यपल्यार्धार्धपल्यपल्यशतवत्सराधिकपल्यपल्यार्धार्धमानोत्कृष्टायुषाम् । तापसकापालिकबौद्धऋषिब्रह्मचारिपारिव्राट्पाशुपतश्रमणमुनिपूजाप्रसादवरदानाम् । आदित्यसोमांगारबुधबृहस्पतिशुक्रशनैश्चराणाम् । अरिष्टच्छायाविष्टकिंचिन्न्यूनयोजनाविस्तारविमानाधिष्ठिततदूर्ध्वजाग्रत्यक्तचतुरंगुलचंद्रार्कविमानषट्पणमासांताच्छादकराहुकेतुसहितानाम् । नागभूतयक्षर्तुकृतदेहार्तिधनहानिस्थानच्युतिरसादिवैषम्योपशांतिकरपूजाविशेषसानुग्रहनवग्रहाणाम् । सकल-

श्लोक व गद्य ह्मणून सूर्यादि ग्रहांची पूजा करावी. सूर्य तांबडा आहे चंद्र पांढरा, मंगल लाल, बुध पिवळा, गुरू पिवळा, शुक्र पांढरा, शनि काळा, राहु व केतु काळे असे यांचे वर्ण न आहे. त्या वर्णांना अनुसरून त्या त्या वर्णांच्या पूजा द्रव्यानें त्यांची पूजा करावी. अक्षतपुंजावर मुळासहित दर्भ स्थापना करावी.

संपत्संपादक० ॥

ओं ऱ्हीं आदित्यसोमांगार० गृण्हीत ॥ २ ॥

इत्थं सारसपर्ययाद्य महिता यूयं प्रसन्नाः स्त नः ॥
सांगा स्ताद्रिकलापि मोहमुखतो युष्मत्प्रसादादियम् ॥
सर्वज्ञाध्वरविघ्नमाघ्नत द्रुतं सूर्यादिसर्वे ग्रहाः ॥
पूर्णांगान्विधिपूर्तिपूर्णफलदां पूर्णाहुतिं वोर्पये ॥

पूर्णार्घः ॥ २ ॥

तृतीयमंडलाभ्यन्तरे ॥

यक्षान्यजामो जिनमार्गरक्षादक्षान्सदा भव्यजनैकपक्षान् ॥
निर्दग्धनिःशेषविपक्षकक्षान्प्रत्यक्षमत्यक्षसुखे विलक्षान् ॥

ओं कनककलधौतांजनालिघनाभश्यामश्वेतावदातधवलपांडुरपालाशलोहितप्रवालाभकालानिलासितचित्रसितारुणकृष्णश्याममुद्गप्रभाणाम् । वृषभकरिशिखावलदंतावलवैनतेयमृगमृगेंद्रकम-

---

या ग्रहांचीं विमानें अभियोग्य जातीचे देव सिंह, हत्ती, घोडा, बैल यांचीं रूपें धारण करून वाहून नेत असतात. सूर्याचें आयुष्य १ पल्य व हजार वर्षे, चंद्राचें आयुष्य १ पल्य व एक लाख वर्षे व बाकीच्या ग्रहांचें पल्य, अर्धापल्य वगैरे आहे.

'इत्थमिति' हा श्लोक म्हणून पूर्णार्घ द्यावे हे सूर्यादि ग्रहांनो तुम्ही सर्व मिळून सर्वज्ञ जिनेश्वराच्या पूजेमध्यें आलेलीं विघ्नें दूर करा असा या श्लोकाचा भावार्थ आहे. तदनंतर तृतीयमंडलामध्यें 'यक्षेति'

ठकंजाक्षसितपक्षमयूरमकरमत्स्यपोत्रिपतत्रिशंखकुंजरवृषवृषभपुष्पककच्छपानेकपभमारूढानाम् । भगवदादिब्रह्मादितीर्थंकरापसव्यपार्श्वविहितविन्यासानाम् । अव्युत्पन्नतावच्छिन्नसम्यक्त्वसनाथजिनभक्तजनैः शश्वदैहिकफलोपलिप्सया समुपास्यमानानाम् । स्वर्गापवर्गनिसर्गमार्गजिनमार्गप्रातिकूलानुकूलजननिग्रहानुग्रहसमग्रविधानदक्षप्रतीक्ष्यगोमुखादिचतुर्विंशतियक्षाणाम् । सकलसंपत्संपादक० ओं ऱ्हीं गोमुखमहायक्षत्रिमुख० गृण्हीत ॥ २ ॥

इत्थं सारसपर्यया० सर्वेऽपि यक्षेश्वराः ॥ १ ॥

चतुर्थमंडलाभ्यंतरे ।

यक्षीः सपक्षीकृतभव्यलोका लोकाधिकैश्वर्यनिवासभूताः ॥
भूतानुकंपादिगुणानुमोदा मोदांचिताः पूजनया धिनोमि ॥

ओं जातरूपजांवूनदरजतमहारजतकनककार्तस्वरकुंदेंदुकांतिकालपालाशगांगेयगारुत्मताश्मग-

---

हा श्लोक व ॐ कनकेति हें गद्य म्हणून २४ गोमुखादि यक्षांची पूजा करावी हे यक्ष जैनधर्माची रक्षा करण्यांत दक्ष असतात व भव्यजनांची बाजू घेतात. शत्रूरूपी अरण्यास हे जाळून टाकितात. या गोमुखादि २४ यक्षांचें वाहन बैल, हत्ती मोर वगैरे प्रत्येकाचें वेगळें वेगळें आहे. या यक्षांचा वर्ण पिवळा पांढरा, काळा वगैरे आहे. हे गोमुखादि यक्ष आदिनाथ वगैरे तीर्थकरांच्या उजव्या बाजूला उभे राहून त्यांची सेवा करितात. अव्युत्पन्नसम्यक्त्वी भव्यलोक ऐहिक फलाच्या इच्छेनें यांची पूजा करितात.

'इत्थमिति' हा श्लोक म्हणून यांना पूर्णार्घ्य द्यावें.

चतुर्थमंडलामध्यें 'यक्षीरिति' हा श्लोक व 'जातेति' हें गद्य म्हणून २४ शासनदेवतांची पूजा करावी. या देवता भव्यलोकावर अनुग्रह करितात. दया वगैरे गुणावर यांची प्रीति असते यजमान, याजक, राजा

भंभर्मप्रशालहेमाहिरण्यहाटकहरिन्मणितपनीयछायहरितहरित्पद्मरागेंद्रनीलप्रभाणाम् ॥ महोत्पललोहासनशकुंतसितपक्षकरितुरगसौरभेयसैरिभकूर्मकोलकुरंगकेसरिकुक्कुटाहिमानमावासवाहनानाम् वृषभादिभगवदर्हद्भट्टारकसव्यभागाविहितानिवेशनानाम् । तत्तदर्हत्पूजापूर्वकस्वस्वपूजाविधिविधायिनामखिलसमीहितसंपादनोत्तालानाम् । यजमानयाजकजनपदजनेश्वरविघ्नपरिहारद्वारेण सर्वज्ञयज्ञसहकारितामाचरंतिनाम् । परमगंभीरामोघस्यात्कारलांछनजिनशासनविद्वेषिविशसनव्याजृंभमाणप्रभावचक्रचक्रेश्वरीप्रभृतिशासनदेवतानाम् । सकलसंपत्संपादक० ओं ह्रीं चक्रेश्वरीप्रभृति० गृण्हीत २ ॥

इत्थं सारसपर्यया० ॥ देव्यश्च यक्ष्योऽखिलाः ॥ ४ ॥

पंचममंडलाभ्यंतरे ।

श्रीमत्सर्वजनीनजैनसवनप्रत्यूहविध्वंसन—।
प्रोद्भूताप्रतिमप्रभावविहितप्रख्यातिपूजांचितान् ॥
स्वस्वातुच्छपरिच्छदान्दशदिशामन्याप्रधृष्यामितान् ॥
दिक्पालाञ्जगदेकपालकजिनाधीशाध्वरे व्याव्हये ॥

ओं त्रिमलकलधौतखचितमणिमयेचिताभरणभूषितैरावतच्छागरक्ताक्षकरिमकरतुरंगपुष्प-

---

इत्यादिकांचीं विघ्नें दूर करून जिनपूजेमध्यें या मदत करतात. पंचम मंडलात 'श्रीमदिति' हा श्लोक व 'विमलेति' हें गद्य म्हणून सर्व दिक्पालांची पूजा करावी. हे दिक्पाल सर्व लोकांचें कल्याण करणाऱ्या जिनाच्या पूजेंतील सर्व विघ्नें दूर करितात म्हणून यांचा प्रभाव पुष्कळ वाढलेला आहे. या दिक्पालांना त्यां-

कपुष्टांगशाकराकारवाहनारूढानाम् । नितांतचारुचामीकरातिबालभास्करांजनपुंजतमःस्तोमसुधाकरसुवर्णस्वर्णशशांकसकाशशरीरप्रभाभिरामाणाम् । कुलिशजाज्वलज्ज्वालाजालप्रचंडदंडमुद्गराहिपाशगादपशक्तित्रिशूलाप्रतिहतप्रभावप्रहरणानाम् । कमनीयकामिनीकुलललामभूतशची–स्वाहा–छाया-नैऋती-वरुणानी-वायुवेगी धनदेवी-पार्वती —नान— महादेवीमुखांबुजदत्तदृष्टीनाम् ॥ पाकशासनपावक-कृतांत-कौणप-पाशपाणि-पवन-पार्वतीशस्रच पार्वतीप्रियाभिधानानाम् । लोकपालानां कूर्मगतसितांगसांकुशपद्मावतीप्रियफणीश्वरकंठीरवारूढपांडुरतनुकुंतकररोहिणीजीवितेश्वरसहितानाम् । सकलसंपत्संपादक॰ ओं ऱ्हीं इंद्राग्नि॰ गृण्हीत २॥

इत्थं सारसपर्यया॰ सर्वेऽपि दिक्पालकाः ॥

चतुर्द्वाराभ्यंतरे च ।

द्वे रक्षमी द्वावसुरावही द्वौ । द्वौ वैनतेयाविति साष्टसंख्याः ॥
दौवारिकानिष्टबलिप्रदानात्पूर्वादिदिग्द्वारगतान्धिनोमि ॥

ओं सर्वाभीष्टफलदाविशिष्टेष्टजिनेष्टियष्टयाजकराष्ट्रचतुःसंघविघ्नविघातनाखंडितचंडिमाडंबरकोदण्डधरदंडायमानदंडकुंडलितपाशप्रचंडगदामंडितभुजादडपूजामडलपूर्वादिद्वारपालनप्रयुक्तद्वारपाल–कानाम् । सकलसंपत्सम्पादक॰ ॥ ओं ऱ्हीं रक्षोसुराहिगरुड न्वयोद्भवाद्विद्विसंख्याष्टद्वारपालकाः ॥

---

च्या परिवारासहित मी आव्हान करून त्यांना पूर्णार्घ्य देऊन पूजितो. यांचीं ऐरावत, मेंढा वगैरे वाहनें आहेत वज्र वगैरे आयुधें आहेत. इंद्राणी वगैरे देवांगना यांच्या स्त्रिया आहेत.

चार दरवाजामध्यें 'द्वे रक्षमीति' हा श्लोक म्हणून द्वारपालांना पूर्णार्घ्य द्यावें. पूर्व, दक्षिण, पश्चिम व

इदं गृण्हीत २ ॥

इत्थं सार० ॥ सर्वे प्रतीहारकाः ॥ वोर्पये ॥ पूर्णार्घ्यः ॥ ६ ॥
दिग्विन्यस्तक्षिबीजाक्षरलिखितलकारं ठकारावृतांगम् ॥
द्विर्धात्रीमंडलांतर्निहितमुपहितब्रह्मलींकारकोष्ठम् ।
ग्लौं क्ष्म ठं वेष्टितांतं क्षितितलमहितं ध्यायति प्रत्यहं यो ॥
देवं ह्म्ल्व्र्यूंकाररूपं रिपुकुलमखिलं तस्य संस्तंभमेति ॥ ७ ॥
ऊर्ध्वाधः पाशदत्तांकुशमितरदिशा योजितं क्लीं सुबीजं ॥
जंभामोहात्तकोष्ठज्वलनपुरपुटाग्रांतरों ब्लूंसमेतम् ॥
ओं ब्लें धात्रे वषड्वोंष्टतमवनिपुरंतर्गतं देव यस्त्वाम् ॥
न्हींकारं ध्यायतीद्धद्युतिमखिलजगद्वश्यता तस्य याति ॥
आवेद्यासनतः क्रियाप्रणमनं पश्चाद्विधेया स्थितिः ।
त्र्यावर्तैकशिरोनतिः प्रथमतः साम्य तदन्तेपि च ॥
कायोत्सर्गविधिर्नतिस्तवनमायोज्यं च तत्साम्यवत् ॥
कार्या भक्तिरभीप्सिता व्यवसितावालोचनाप्यासनात् ॥

उत्तर या चार दरवाजामध्यें क्रमानें राक्षस, असुर, नागकुमार व गरुड असें दोन दोन द्वारपाल आहेत. यांच्या हातांत धनुष्य, पाश, गदा, दंड हीं आयुधें आहेत. ' दिग्विन्यस्तेति ' ज्याच्या चारी दिशाला क्षि हें

इति लक्षणतः कार्या महाभिषवणक्रिया ॥
याजकैश्चैत्यसत्पंचगुरुशांतीशभाक्तितः ॥ १ ॥

ओं ऱ्हां ऱ्हीं ऱ्हूं ऱ्हौं ऱ्हः असि आ उसा नवदेवताः स्वस्थानं गच्छत २ जः ३ इति विसर्जनम् । ओं ऱ्हां ऱ्हीं अष्टाशीतिपरिवारदेवाः स्वस्थानं गच्छत २ जः इति यंत्र-देवताविसर्जनम् ॥ ११ ॥

तदन्ते चार्चनावेरं स्वस्थाने विनिवेशयेत ॥
शिलामध्येऽथ नासाया मध्ये सव्येतराग्रयोः ॥
शिलाया अपि षड्द्वारदेवताभ्यो बलिं ददे ॥

ओं ऱ्हीं क्रों प्रशस्तवर्ण सर्वलक्षण० हे क्षेत्रपालाः श्रेयोगंधर्वाः किन्नराः प्रेता भूताः सर्वेऽपि भूर्भुवः स्वः स्वाहा । इमं साध्यं चरुममृतामिव स्वस्तिकं यज्ञभागं गृण्हीत २ इति द्वार-पालबलिः ॥

---

बीजाक्षर व क्लींकार आहे. दोन पृथ्वीमंडळाच्या मध्यभागीं ओं व लीं हें अक्षर आहे. ग्लौ क्ष्मं ठं यानीं जो वेष्टित आहे त्या ह्म्ल्र्यूंकाररूपाचें जो स्मरण करितो त्याला सर्व शत्रुसमूह वश होतो.

'ओं ऱ्हामिति' हा मंत्र म्हणून नवदेवताविसर्जन करावें.

'ओं ऱ्हां ऱ्हीमिति' हा मंत्र म्हणून ८८ परिवारदेवांचें विसर्जन करावें. याप्रमाणें यंत्रदेवतांचें विसर्जन करावें. 'शिलेति' उंबरठ्याचा मध्यभाग दरवाजाच्यावरची शिला ( जिला गणेशपट्टी म्हणतात. ) मध्यभागीं, डाव्या व उजव्या बाजूला, व उंबरठ्याला ( याठिकाणीं सहा द्वारदेवता आहेत ) म्हणून द्वारपाल बलि द्यावा.

मध्येगृहं विधातारं अर्चयेत्सलिलादिभिः ॥
अष्टौ दिक्पालकान्दिक्षु बलिपीठेऽपदाभरान् ॥

ओं ऱ्हीं यानायुधयुवतिजनसहितब्रह्मन् ओं भूर्भुवः स्वः इमं सार्घ्यं गृहाण २ इति-ब्रह्मबलिः ॥ १४ ॥

ओं कनकवर्ण॰ इंद्र एहि २ इमं सार्घ्यं गृहाण २ ॥ ओं रक्तवर्ण॰ अग्ने एहि २ इमं सार्घ्यं गृहाण २ ॥ ओं कृष्णवर्ण यम॰ ॥ श्यामवर्ण॰ नैऋत्य॰ ॥ ओं धवलवर्ण॰ वरुण ॰ ॥ ओं कृष्णवर्ण॰ पवन॰ ॥ ओं पीतवर्ण॰ कुबेर॰ ॥ ओं धवलवर्ण ईशान॰ ॥ इति दिक्पालबलिः ॥

ओं ऱ्हीं क्रों अपदः सर्वे देवा इमं बलिं गृण्हीध्वं २ ॥ इत्यपददेवेभ्यो बलिं बलिपीठे दद्यात् ॥ इत्यपददेवताबलिः ॥

अथ श्रीबलिः ॥

ओं समस्ताभ्युदयानिःश्रेयससमुद्भूतदुस्तरसुखनिस्तीरनिजानंदेत्यादिनित्यमहोक्तगद्येन—पद्येन च पूर्वोक्तप्रकारेण मंगिणीतालादिना श्रीबलिं दद्यात् ॥ अथ मूलवेराग्रतः स्वेष्टप्रार्थना।

---

'मध्येगृहमिति' हा श्लोक ह्मणून व त्याचा मंत्र ह्मणून ब्रह्मा व आठ दिक्पाल यांना अर्घ्य द्यावा हा ब्रह्मबलि आहे. 'ओं समस्तेति' हें गद्य व नित्यमहामधील पद्यांनें मंगिणी तालावर श्रीबलि द्यावा. यानंतर मूल पीठावर इष्टप्रार्थना करावी. शांतिः शिरोधृतेति हे तीन श्लोक ह्मणून शुभानुध्यान करावें.

'प्रक्षीणेति' हा श्लोक ह्मणून जिनेश्वराचें विसर्जन करावें. 'प्रमादादिति' ह्मणून क्षमापणपूर्वक पंचांग नमस्कार करावा.

जय जय जिन शश्वत्० ॥ शांतिः शिरोधृतेत्यादिपद्यत्रये कृतस्तुतिपाठाच्छुभध्यानम् ।
प्रक्षीणेत्यादिना जिनेश्वरविसर्जनम् ॥ प्रमादादित्यादिना क्षमापणापूर्वकं पंचांगप्रणामः ।
मोहध्वांतविदारणमित्यादिना गमनापृच्छनम् ॥

इत्थं विधत्ते जिनपुंगवस्य महाभिषेकोत्सवसंविधिं यः ॥
मेरौ सुरेंद्रैश्च महाभिषेकं प्रपद्यतेऽमुत्र, स धर्मनेमिः ॥ १५ ॥

इत्यर्हत्प्रतिष्ठासारसंग्रहे नेमिचंद्रविरचिते प्रतिष्ठातिलकनाम्नि महाभिषेकविधिर्नाम त्रयोदशपरिच्छेदः ॥ १३ ॥

---

'मोहध्वांतेति' हा श्लोक ह्मणून जाण्याविषयी परवानगी घ्यावी.

'इत्थमिति' याप्रमाणें जो भव्य हा अभिषेकोत्सवविधि करितो त्याचा मेरुपर्वतावर इंद्रादिकाकडून अभिषेक होतो.

याप्रमाणें नेमिचद्र विरचित प्रतिष्ठातिलकांतील तेरावा परिच्छेद संपला.

---

# चतुर्दशः परिच्छेदः ।

अथैकादशविधकुंभन्यासविधिः ॥
उक्तानां वक्ष्यमाणानां घटानां न्याससिद्धये ॥
एकादशविधान्वक्ष्ये कुंभन्यासान्यथाक्रमम् ॥ १ ॥
नवानां तत्र कुंभानां न्यासः प्रथम इष्यते ॥
षोडशानां द्वितीयः स्यात्तृतीयः पंचविंशतेः ॥ २ ॥
वैकपंचाशतस्तुर्य एकाशीतेस्तु पंचमः ॥
षष्ठोऽष्टशतकुंभानां द्विनिघ्नानां तु सप्तमः ॥ ३ ॥
त्रिनिघ्नानां चतुर्घ्नानामष्टमो नवमः क्रमात् ॥
सचतुःपंचशत्यास्तु दशमः परिकीर्तितः ॥ ४ ॥

चौदावा परिच्छेद.

अकरा प्रकारचा कुंभरचनेचा विधि.

१–१० आतां या परिच्छेदांत ११ प्रकारचा कुंभरचनेचा विधि आह्मी यथाक्रमें सांगतो. पहिल्या रचनेंत नउ असतात. दुसऱ्या रचनेंत १६ असतात. तिसऱ्या रचनेंत २५ कुंभ असतात. चौथ्या रचनेंत ४९ कुंभ

अष्टोत्तरसहस्रस्य न्यास एकादशो मतः ॥
षष्ठादिसर्वन्यासेषु मध्ये वीथिद्वयं त्यजेत् ॥ ५ ॥
पादेनाधिकमंत्ये तन्न्यूनं षष्टे च सप्तमे ॥
सूत्राणां वक्ष्यमाणानामर्धं पूर्वाग्रमर्धकम् ॥ ६ ॥
उत्तराग्रं भवेत्तैस्तु कुर्यात्कुंभप्रमांशकान् ॥
प्रागेव सर्वकुंभानां प्रमाणं प्रतिपादितम् ॥ ७ ॥
पूर्वपूर्वाग्रसूत्राणि पिष्टलिप्तानि पातयेत् ॥
प्रथमे त्वष्टसूत्राणि सर्वांशेषु घटान्न्यसेत् ॥ ८ ॥
न्यासे द्वितीये द्विःसप्तसूत्राण्यत्र घटान्न्यसेत् ॥
कोणेष्वेकैकमाशासु द्वौ द्वौ च चतुरोत्तरे ॥ ९ ॥

असतात. पाचव्या रचनेत ८१ कुंभ असतात. सहाव्या रचनेत १०८ कुंभ असतात व सातव्या रचनेत २१६ कुंभ असतात. आठव्या रचनेंत ३२४ कुंभ व नवव्या रचनेंत ४३२ कलश आहेत. १० व्या रचनेंत ५०४ कलश व ११ व्या रचनेंत १००८ कलश असतात. सहाव्या रचनेला धरून अकराव्या रचनेपर्यंत मध्यमार्गी दोन ओळी सोडाव्यात पहिल्या रचनेमध्यें आडव्या चार रेषा व उभ्या चार रेषा असाव्या दोरीला रंग लाऊन तिच्या द्वारें जमिनीवर आडव्या व उभ्या रेषा काढाव्यात. अशा रीतीनें कुंभ ठेवण्याकरितां घरें पाडावीत. पहिल्या रचनेंत आठ घरामध्यें आठ कुंभ ठेवावेत. दुसऱ्या रचनेंत आडव्या सात व उभ्या सात अशा रेषा आखाव्यात. यांत घरें छत्तीस होतात. यामध्यें कोपऱ्याच्या घरामध्यें एक एक कुंभ ठेवावा. मधील दिशांच्या घरांमध्यें दोन दोन कुंभ ठेवावेत. मधील घरामध्यें चार कुंभ ठेवावेत. तिसऱ्या रचनेंत १६ सूत्रें अर्थात्

तृतीये षोडशैव स्युः सूत्राण्यत्र घटा मताः ॥
प्रतिदिक् त्रय एकैको विदिक्षु स्यान्नवांतरे ॥ १० ॥
चतुर्थे विंशतिसूत्राण्यत्र संस्थापयेद्घटान् ॥
चतुरः प्रतिकोणं स्यात्प्रतिदिक्षण्नवांतरे ॥ ११ ॥
चतुर्विंशतिसूत्राणि पंचमे स्थापयेद्घटान् ॥
प्रतिदिक्प्रतिकोणं च मध्ये च कलशान्नवान् ॥ १२ ॥
षष्ठे सूत्राणि तु त्रिंशद्बाह्यदंडे चतुर्थके ॥
षष्ठे वृत्तं घटान्सप्त स्थापयेदेकमंतरे ॥ १३ ॥
सप्तमेऽक्ष्यङ्घ्रिसूत्राणि न्यस्येद्बाह्यत्रये घटान् ॥
षष्ठे च नवमे भागे वृत्तं सप्तांतरेककम् ॥ १४ ॥

---

आडव्या आठ व उभ्या आठ अशा सोळा रेघा असतात प्रत्येक दिशेला तीन तीन कुंभ व विदिशामध्यें एक एक कुंभ आणि मध्यभागीं ९ अशा रीतीनें २५ कुंभ असतात.

११–चौथ्या रचनेंत २० सूत्रें असतात अर्थात् आडव्या १० व उभ्या १० अशा २० रेघा आखलेल्या असतात. प्रत्येक कोपऱ्याला चार चार कुंभ असतात प्रत्येक दिशेला सहा सहा कुंभ असतात. व मध्यभागीं नउ नउ कुंभ असतात.

११–१३ पांचव्या रचनेंत आडव्या १२ व उभ्या १२ अशा २४ रेघा आखाव्यात. प्रत्येक दिशेला, प्रत्येक कोणाला व मध्यभागीं नउ नउ कुंभ स्थापन करावेंत सहाव्या रचनेंत आडव्या १५ व उभ्या १५ अशा ३० रेघा

अष्टमे खेषु सूत्राणि बाह्यात्षष्ठात्त्रये युगम् ॥
दशमे तिथिसंख्याः स्युर्वृत्तमेकोत्तरे घटः ॥ १५ ॥
नवमेष्टसु सूत्राणि बाह्यात्षष्ठात् त्रये युगे ॥
दशमे द्वादशे वृत्तं तिथिमांस्त्वंतरेकक: ॥ १६ ॥
दशमेष्टसु सूत्राणि बाह्याच्चतुर्षु सप्तमात् ॥
त्रितये द्वादशैकैकावृत्तिमेकोन्तरे घटः ॥ १७ ॥
वसुगिरिमितिसूत्राण्यंतिमे पंचकेंत्यादातिपदयुगमांशे तच्चतुष्के त्रिके च ॥
तिथिमितिकलशांश्चाष्टादशांशे सुवृत्तं पृथुतरघटमेकं स्थापयेत्सर्वमध्ये ॥
बाह्यावरणकुंभेषु पूर्वाद्याशाक्रमात्सुधी : ॥
जलादिस्नपनद्रव्यं सर्वं च परिपूरयेत् ॥ १९ ॥
अंतःकुंभेषु सर्वेषु केवलं विमलं जलम् ॥

असतात बाहेरील दोन दोन घरामध्यें चौथ्या घरामध्यें व सहाव्या घरामध्यें सात सात कुंभ असतात व मध्यें एक कुंभ असतो.

१४–१८ सातव्यामध्यें ४२ सूत्र आहेत अर्थात उभ्या आडव्या एकतीस एकतीस रेघा समजाव्यात. बाहेरील तीन तीन पंक्तीमध्यें, साहाव्या व नवव्या पंक्तीमध्ये सात सात कुंभ स्थापन करून मध्यभागीं एक कुंभ स्थापावा. या सर्व कुंभांचीं रचना कशी असते हें यांच्या नकाशावरून समजेल. येथें कल्पना यावी म्हणून थोडकें लिहिलें आहे.

मध्यकुंभयुते न्यासे कोणकुंभाश्च संमताः ॥ २० ॥

इत्थं निवेशितघटोदरपूरितैर्यः । पंचामृतैर्जिनपतेः कुरुतेऽभिषेकम् ॥

सोयं सुरैः सुरगिरावभिषेकमेत्य लोकार्चितः खलु भविष्यति धर्मनेमिः ॥

इत्यर्हत्प्रतिष्ठासारसंग्रहे नेमिचंद्रदेवविरचिते प्रतिष्ठातिलकनाम्नि कलशन्यासविधिर्नाम चतुर्दशः परिच्छेदः ॥

इति विस्तरप्रतिष्ठाविधिः समाप्तः ॥

---

१९ बाहेरील आवरणाच्या कुंभामध्यें पूर्वादि दिशांच्या क्रमानें जलादिअभिषेकाचीं द्रव्यें भरून ठेवावीत व आंतील सर्व कुंभामध्यें फक्त शुद्ध पाणी भरावें

२० याप्रमाणें पंचामृतांनी भरलेल्या या कुंभांनीं जो जिनेश्वराचा अभिषेक करितो त्याचा मेरुपर्वतावर देवाकडून अभिषेक होतो व तो जगत्पूज्य होऊन धर्मरूपी चक्राची धाव रचतो.

याप्रमाणें प्रतिष्ठासारसंग्रहामध्यें नेमिचंद्रदेवांनीं रचलेला कलशन्यासविधि नांवाचा चौदावा परिच्छेद संपला.

याप्रमाणें सविस्तर प्रतिष्ठाविधि संपला

## पंचदशः परिच्छेदः ।

अथ मध्यमप्रतिष्ठाविधिः ।

मध्यमप्रतिष्ठाविधानमनुवर्णयिष्यामः ॥ तद्यथा—
अथेंद्रनंदियोगीन्द्र–प्रातष्ठाविधिलक्षणः ।
प्रयोगपरिपाटीयमुच्यते संप्रदायतः ॥ १ ॥
प्रतिष्ठादिवसात्पूर्वं मध्यकल्पाविवक्षया ॥
सप्तमेऽन्हि विधेयोंकुरार्पणः प्रथमोत्सवः ॥ २ ॥
द्वितीयेन्हि ततः कुर्यात्पंचमंडलपूजया ॥
त्रिसंध्यमर्हत्स्नानं च पूजनं श्रीबलिक्रियां ॥ ३ ॥

पंधरावा परिच्छेद.

मध्यम प्रतिष्ठेचा विधि.

१–३ इंद्रनदि आचार्यांच्या प्रतिष्ठाविधीला अनुसरून प्राचीनप्रतिष्ठाशास्त्रानुसारें मध्यमप्रतिष्ठाविधचिं आतां आम्ही वर्णन करितो. प्रतिष्ठादिवसाच्या पूर्वी सातव्या दिवशीं मध्यमपद्धतीला अनुसरून प्रथमतः अंकुरार्पणो-

शांतिहोमं च तद्रात्रौ सर्वविघ्नप्रशांतये ॥
एवं प्रतिदिनं कार्यं बुधैरवभृतावधेः ॥ ४ ॥
विघ्नशांतिकरः शांतिहोमो नित्यं मुनेर्मतः ॥
रोगशांत्यर्थिनः शस्तमौषधं केन वार्यते ॥ ५ ॥
तृतीयेऽन्हि ध्वजारोहं द्वितीयोत्सवसंज्ञकम् ॥
विदध्यादथ तद्रात्रौ भेरीताडनसंविधिम् ॥ ६ ॥
चतुर्थस्नानपर्यंतं श्रीबलेः समनंतरम् ॥
ध्वजदेवबलिं कुर्यात्पूजादौ घोषणामपि ॥ ७ ॥
चतुर्थे दिवसे प्राण्हे लघुशांतिकपूर्वकम् ॥
मंडपेंद्रं प्रतिष्ठाप्य भूषयेद्भूषणोत्करैः ॥ ८ ॥
पंचमेन्हि ततः प्राण्हे बृहच्छान्तिकपूर्वकम् ॥
वेदीद्वयं प्रतिष्ठाप्य भूषयेद्भूषणोत्करैः ॥ ९ ॥

---

त्सव करावा. तदनंतर दुसरे दिवशीं पंचमंडलपूजन तिन्ही संध्याकाल मध्यें अर्हताचा अभिषेक व पूजन आणि श्रीबलि हा विधि करावा. ४-५ त्याच रात्रीं सर्व विघ्नशांतीस्तव शांतिहोम करावा. हा शांतिहोम अवभृस्थनानाच्या विधीपर्यंत दररोज करावा हा शांतिहोम नित्य करावा असें इंद्रनंदि आचार्यांचें म्हणणें आहे बरोबर आहे रोगशांत्यर्थ उत्तम औषध घेऊं नये असें कोण म्हणेल? ६-८ तिसरे दिवशीं ध्वजारोहण विधि करावा व रात्रीं भेरीताडन नांवाचा विधि करावा. चतुर्थस्नान क्रिया करीपर्यंत श्रीबलिविधीच्या नंतर ध्वजदे-

वेदीमंडपनिर्माणं मुनेरस्यापि संमतम् ॥
प्रस्तुतार्थक्रियासिद्धेरन्यथानुपपत्तितः ॥ १० ॥
वा स्तुपूजान्वितं तच्च निर्माणं शोभनं मतं
शांतिकं वास्तुपूजात्र भवेद्बलिविहारयुक् ॥ ११ ॥
अथ तीर्थोदकादानं कार्यं षष्ठे दिने दिवा ॥
अचाल्यसौधबिंबानां प्रतिष्ठा चेद्विधित्सिता ॥ १२ ॥
चाल्यार्चान्यसने नेष्टं तस्य तत्स्थानयापनात् ॥
त्रिधोपवासं तदनु स्वीकुर्याद्गुरुसाक्षिकम् ॥ १३ ॥
जलाधिवासनं कुर्यात्तद्रात्रौ होमकर्म च ॥

---

वलावलि हा विधि करावा. चौथ्या दिवशीं प्रातःकालीं लघुशांतिकविधि करून मंडपप्रतिष्ठा करावी मंडप भूषणांनीं सुशोभित करावा. ९–१० पांचव्या दिवशीं मोठा शांतिविधि करून दोन वेदींची प्रतिष्ठा करून त्याभूषणांनीं शोभित कराव्यात. वेदीमंडप बनविणें हें इंद्रनंदि आचार्यांना मान्य आहे कारण अपर्युक्त क्रिया त्या शिवाय होत नाहीत.

११–१४ तें वेदिकानिर्माण वास्तुपूजेसहित करणें. उत्तम बलिविहारानें युक्त असें शांतिक व जिनपूजनही करावें. तदनतर अचल जिनबिंबाची प्रतिष्ठा करावयाची असेल तर सहाव्या दिवशीं तीर्थोदकादानविधि करावा. चलजिनप्रतिमाप्रतिष्ठेला हा विधि करूं नये । तदनंतर गुरुसाक्षिपूर्वक अन्न, खाद्य, व लेह्य यांचा त्याग प्रतिष्ठाविधि पूर्ण होईपर्यंत करावा. याच रात्रीं जलाधिवासन, होमकर्म व मंदिराच्या चारी दिशेला शांति शुद्धि अर्थात् विमानशुद्धि करावी.

विमानस्य चतुर्दिक्षु शांतिशुध्यामिधानकम् ॥ १४ ॥
विमानशुद्धिं कृत्वाथ तद्बिंबस्य यथोचितम् ॥
दर्भशय्याविधिं कुर्यात्प्रत्युषस्यंतरालये ॥ १५ ॥
सप्तमेऽन्हि महायंत्रमाराध्य च विभुष्य च ॥
न्यसेत्स्नपनवेद्यग्रे त्रयोदशशतं घटान् ॥ १६ ॥
तद्वेद्यां स्थापयेत्पीठं पंचमंडलमूर्धनि ॥

इति पूर्वक्रिया

स्नानव्रतादिशुद्धः सन्धृतवस्त्रोपवीतकः ॥
चतुःप्रतींद्रसहितः कृतेर्यापथशोधनः ॥ १ ॥
आचार्यानुज्ञया सिद्धभक्तिं च सकलीक्रियाम् ॥
कृत्वा समंत्रमिज्यांगपालद्रव्यं विशोध्य च ॥ २ ॥
भूपणैर्बहुभिः स्वं च प्रतींद्रानपि भूपयेत् ॥

---

१५ जिनप्रतिमेचा दर्भशय्याविधि प्रातःकाळीं जिनमंदिरामध्यें करावा.

१६ सातव्या दिवशी महायंत्राची आराधना करून स्नानवेदीच्या पुढें ११३ घट ठेवावेत व वेदीवर पंचमंडलाच्या मस्तकावर सिंहासन स्थापावें. ही सगळी पूर्वक्रिया करून

१–४ स्नान व व्रतें यांनीं शुद्ध होउन वस्त्रें व यज्ञोपवीत धारण करून चार प्रतींद्रासहित ईर्यापथशोधन ही क्रिया करावी. आचार्याच्या आज्ञेनें सिद्धभक्ति व सकलीकरण करून मंत्रसहित पूजाद्रव्यें शुद्ध करून

महाभिषेकविधिना स्थापिते भद्रविष्टरे ॥ ३ ॥
दर्भशय्यास्थितं बिंबमानीय स्थापयेत्ततः ॥
पंचमंडलमाराध्य स्थापयेदष्टतद्घटैः ॥ ४ ॥
नीराज्याष्टविधद्रव्यैर्जप्त्वाष्टशतपुष्पकैः ॥
पुनः पंचोपचारेण स्नापयेच्छेषतद्घटैः ॥ ५ ॥
चतुर्विधावतरणं चतुःकुंभाभिषेचनम् ॥
पुष्पांजलिः सुगंधोदस्नपनं च समर्चनम् ॥ ६ ॥
तद्बिंबस्थापनं मूलवेदीयंत्राग्रविष्टरे ॥
मूलबिंबासने स्वर्णशलाकाविनिवेशनम् ॥ ७ ॥
संप्रोक्षणं चतुःकुंडप्रतिष्ठाहोमसंविधिः ॥
मुखवस्त्रावृतिः कांडस्थापनं चाष्टधार्चनम् ॥ ८ ॥

भूषणांनीं स्वतःला व प्रतींद्रांनाही भूषित करावें. दर्भशय्येमध्यें असलेल्या जिनप्रतिमेला भद्रसिंहासनावर स्थापावें. पंचमंडलाची आराधना करून आठ कलशांनीं प्रतिमेचा अभिषेक करावा.

५–आठप्रकारच्या द्रव्यांनीं नीराजन करून १०८ पुष्पांनीं जप करावा व पुनः बाकीच्या कलशांनीं पंचोपचारानें अभिषेक करावा. ६ चारतऱ्हेचा अवतरण विधि करून चार कलशांनीं अभिषेक करावा पुष्पांजलि समर्पण करून, गंधोदकाभिषेक करून पूजा करावी. ७-मग बिंबाची मूलवेदीच्या यंत्राच्या पुढील सिंहासनावर स्थापना करावी. व सिंहासनापाशीं सुवर्णशलाका ठेवावी. संप्रोक्षणविधि करून चारकुंडामध्यें प्रतिष्ठा होम

नानासुमंगलद्रव्यार्चनं पुष्पजपस्तपः ॥
पुष्पजसुगंधादिद्रव्यैः सौवर्णतालगैः ॥ ९ ॥
नयनोन्मीलनं तेन गंधेनोद्वर्तनं ततः ॥
मुखवस्त्रापसरणं पुष्पांजलिरथाशिषः ॥ १० ॥
आराधनं नृत्यगीतवाद्यैर्नानाविधस्तवैः ॥
चैत्यादिभक्तित्रितयस्तवनं संघपूजनम् ॥ ११ ॥
वेदिस्थदेवतापूजाधामदिक्पालकार्चनम् ॥
षड्द्वारदेवताभ्यर्चा ग्रामदिक्पालपूजनम् ॥ १२ ॥
विहारः परया भूत्या तदुद्घोषणपूर्वकम् ॥
विहारानंतरं पंचविंशत्या स्नपनं घटैः ॥ १३ ॥
क्षमापणनमस्कारपूर्वं सर्वविसर्जनम् ॥
ततस्तिसृषु संध्यासु नित्यं नित्यमहोत्सवः ॥ १४ ॥

---

विधि करावा. प्रतिमामुख वस्त्रानें आच्छादावें; वर्णांची स्थापना करावी व अष्टद्रव्यानें पूजा करावी. अनेक सुमंगल द्रव्यांनीं पूजा करून मग पुष्पजप करावा. सुगंधद्रव्यांनीं नयनोन्मीलनविधि करावा. गंध प्रतिमेच्या सर्व अवयवाला लावावें. मुखवस्त्र काढून पुष्पांजलि, आशिर्वाद, आराधन हे करावेत. नृत्य, गीत, वादित्र व अनेक स्तुति, चैत्यादिभक्ति यांनीं स्तवन करून संघाचा आदरसत्कार करावा. १२-१५ वेदिस्थ देवतांची पूजा धामपूजा, दिक्पालपूजा, षड्द्वारदेवतापूजन, ग्रामदिक्पालपूजन, हे विधि करावेत. विहारघोषणा करून मोठ्या थाटानें श्रीजिनाचा विहारविधि करावा विहारानंतर २५ कलशांनीं स्नपन करावें. क्षमापण नमस्कार हे विधि

चतुर्थेऽन्हि महास्नानविधिश्चावभृथान्हयः ॥
अभिषेकक्रियां कृत्वा समभ्यर्च्य श्रुतं गुरुम् ॥ १५ ॥
गंधोदकभृतं कुंभं यष्ट्रे दद्यान्मुदाशिषः ॥
शेषां च सर्वभव्येभ्यो दद्यात्प्रागुदिताशिषः ॥ १६ ॥
यष्टा संपूजयेत्संघं यथाशक्ति यथोचितम् ॥
अथावरोह्य तद्रात्रौ प्रासादे स्थापयेद् ध्वजम् ॥ १७ ॥
पूर्ववत्तेन भात्येष सर्वेषां तच्छुभाय च
विसर्जनं निर्जराणामध्यात्मध्यासनं विभोः ॥ १८ ॥
शांतिधारां ततः शांतिबालिकर्मक्षमापणम् ॥
गमनापृच्छनं पश्चात्कृतकर्मफलार्थिनाम् ॥ १९ ॥

---

करून सर्वांचें विसर्जन करावें. तदनंतर तिन्ही संध्याकालांत नित्यमहोत्सव करावा. यानंतर चौथ्या दिवशीं अवभृथस्नान हा विधि करावा अभिषकक्रिया करून शास्त्र व गुरूची पूजा करावी

१६ यजमानाला गंधोदकानें भरलेला कुंभ आशीर्वादासह द्यावा. व सर्व भव्यांना शेषा ( जिनपादार्चित गंध, पुष्प, अक्षत व फळें ) हीं आशीर्वादासह द्यावी. १७ यजमानानें यथाशक्ति व यथायोग्य आदर करावा. तदनंतर त्या दिवशीं रात्रौ ध्वज उतरवून तो मंदिरावर स्थापावा. १८—२० हा ध्वज पूर्वीप्रमाणें शोभून सर्वांच्या कल्याणाला कारण होतो यानंतर देवाचें विसर्जन व जिनाचें आत्म्यामध्यें आरोपण करावें. शांतिधारा, शांतिबलि, कर्मक्षय, जाण्याविषयीं परवानगी घेणें, केलेल्या पूजेचे फलाची याचना, आशीर्वाद देणें, गुरुसाक्षीनें दीक्षा त्याग, शांतिभक्ति या क्रिया

आशीर्दानविधिं दीक्षामोचनं गुरुसाक्षिकम् ॥
शांतिभक्तिं च कृत्वेंद्रः प्रतिष्ठां तां समापयेत् ॥ २० ॥
निष्ठापितप्रातिष्ठं तं यष्टेन्द्रं बहु मानयेत् ॥
सत्कृत्य भक्त्या भव्यास्तं सर्वे यांतु यथायथम् ॥ २१ ॥
प्रतिष्ठादिवसे कुर्यादुत्सवं मासि मासि च ॥
आवर्षादथ ऊर्ध्वं तु वर्षे वर्षे च शक्तितः ॥ २२ ॥
उत्सवानां विधिर्भेदोऽप्युत्तरत्राभिधीयते ॥
इति मध्यप्रातिष्ठाया विधिः सर्वो निरूपितः ॥ २३ ॥
अनुक्तमन्यतो ग्राह्यमुचितं लक्षणादिकम् ॥
प्रागुदीरित एवात्र प्रयोगोऽपि प्रयुज्यताम् ॥ २४ ॥
यथोचितं समस्तानां कर्मणां कर्मकोविदैः ॥
इत्थं विधत्ते बहुभक्तियुक्तो मध्यक्रमेणापि जिनप्रतिष्ठाम् ॥

---

करून ही प्रतिष्ठाक्रिया समाप्त करावी. २१–२४ प्रतिष्ठा ज्यानें पूर्ण केली त्या इंद्राचा यजमानानें चांगला सत्कार करावा. सर्व भव्यांनींही त्याचा आदर करावा व आपल्या स्थानी जावें. पुढें प्रत्येक महिन्याला प्रतिष्ठेच्या दिवशीं उत्सव करावा. याप्रमाणें एक वर्षपर्यंत करावें. पुढें प्रत्येक वर्षी करावा. या उत्सवाचा

यो देशकालाद्युचितामुपैति स धर्मनेमिः परमप्रतिष्ठाम् ॥

इत्यर्हत्प्रतिष्ठसारसंग्रहे नेमिचंद्रदेवविरचिते प्रतिष्ठातिलकनाम्नि मध्यमप्रतिष्ठाविधिर्नाम पंचदशः प्रबंधः ॥

॥ इति मध्यमप्रतिष्ठाविधिः समाप्तः ॥ ❁ ❁

विधि व प्रकार आम्ही पुढें सांगणार आहोत. याप्रमाणें मध्यम प्रतिष्ठेचा विधि सांगितला. जें येथें सांगितलें नाहीं तें योग्य असें लक्षणादिक अन्य ग्रंथांतून घ्यावें. विद्वानांनीं यथायोग्य मार्गें सांगितलेल्या क्रियांचा ही येथें उपयोग करावा २५ याप्रमाणें बहुभक्तीनें जो ही (जिनाची) मध्यमप्रतिष्ठा करितो तो धार्मिक देश व काल यांना योग्य अशा उत्कृष्ट प्रतिष्ठेला पावतो.

याप्रमाणें नेमिचंद्रविरचित प्रतिष्ठातिलक ग्रंथांतील मध्यमप्रतिष्ठा वर्णनाचा १५ वा प्रबंध समाप्त झाला ❁

# षोडशः परिच्छेदः ।

अथ संक्षेपप्रतिष्ठाविधिः ॥

अथ संक्षेपतो वक्ष्ये प्रतिष्ठाविधिलक्षणम् ॥
संक्षेपतोऽपि सा कार्या देशकालानुसारतः ॥ १ ॥
तत्र पूर्वं प्रतिष्ठायाः पंचमेऽन्ह्यंकुरार्पणम् ॥
ततः प्राक् क्रियतामिंद्रप्रतिष्ठात्रापि मध्यवत् ॥ २ ॥
सर्वविघ्नप्रशान्त्यर्थं शांतिहोमविधिर्बुधैः ॥
ततः प्रभृति कर्तव्यो यावच्चावभृथक्रिया ॥ ३ ॥

संक्षेपानें प्रतिष्ठाविधि.

१-४ आतां मी संक्षेपानें प्रतिष्ठाविधि सांगतो. देशकालाला अनुसरून हा विधि करावा. प्रतिष्ठेच्या पूर्वी पांचव्या दिवशीं अंकुरार्पणाक्रिया करावी. ही क्रिया करण्यापूर्वी मध्यम प्रतिष्ठेमध्यें जसें अंकुरार्पण क्रियेच्या पूर्वी इंद्रप्रतिष्ठा करितात तशी येथेंही क्रिया करावी. सर्व विघ्नें नाहींशीं होण्याकरितां अवभृथ क्रिया होईपर्यंत शांतिहोम करीत जावें. दुसरे दिवशीं सकाळीं लघुशांतिपूर्वक मंडपाची प्रतिष्ठा करून भूषणांनीं तो सुशोभित करावा. ५-७ तिसऱ्या दिवशीं लघुशांतिपूर्वक दोन वेदींची प्रतिष्ठा करून त्या भूषित कराव्या-

द्वितीये दिवसे प्राण्हे लघुशांतिकपूर्वकम् ॥
मंडपेंद्रं प्रतिष्ठाप्य भूषयेद् भूषणोत्करैः ॥ ४ ॥
तृतीये दिवसे प्राण्हे लघुशांतिकपूर्वकम् ॥
वेदीद्वयं प्रतिष्ठाप्य भूषयेद् भूषणोत्करैः ॥ ५ ॥
अथ तीर्थोदकादानं कार्यं तुर्ये दिने दिवा ॥
अचाल्यसौधबिंबानां प्रतिष्ठा चोद्विधीयते ॥ ६ ॥
चाल्यार्चानीयतां पुष्पमंडपाढ्यजलाशयम् ॥
त्रिधोपवासं तदनु स्वीकुर्याद् गुरुसाक्षिकम् ॥ ७ ॥
जलाधिवासनं कुर्यात्प्रत्युषस्यंतगलये ॥
विधिनाभित्रयं प्राच्यं यागमंडलमन्वतः ॥ ८ ॥
समाराध्य समासेन पूर्वाह्णे पंचमेऽहनि ॥
न्यस्य स्नपनवेद्याः प्राक् सम्मार्जनघटाष्टकम् ॥ ९ ॥

---

त. चौथ्या दिवशीं दिवसा तीर्थोदकादानविधि करावा. ( अचल प्रतिमांची प्रतिष्ठा करावयाची असेल तर ) चलप्रतिमा पुष्पमंडपानें युक्त अशा जलाशयाकडे दिवसा न्यावी. यानंतर अन्न, खाद्य, व लेह्य अशा तीन पदार्थांचा त्याग अशा रीतीचा उपवास पांचवे दिवशीं करावा ८-९ जिनमंदिरामध्यें प्रातःकालीं जलाधिवासनविधि करून योग्यविधीनें तीन अग्नींची पूजा करावी. यानंतर यागमंडलाची संक्षेपानें आराधना करावी. तदनंतर

तद्वेद्यां स्थापयेत्पीठं पंचमंडलमूर्धनि ॥

इति पूर्वक्रिया ॥

स्नानव्रतादिशुद्धः सन् धृतवस्त्रोपवीतकः
चतुःप्रतींद्रसहितः कृत्वेर्यापथशोधनम् ॥ १ ॥
आचार्यानुज्ञया सिद्धभक्तिं च सकलीक्रियाम् ॥
कृत्वा समंत्रमिज्यांगपात्रद्रव्यं विशोध्य च ॥ २ ॥
भूषणैर्बहुभिः स्वं च प्रतीन्द्रानपि भूषयेत् ॥
महाभिषेकविधिना स्थापिते भद्रविष्टरे ॥ ३ ॥
दर्भशय्यास्थितं बिंबमानीय स्थापयेत्ततः ॥
पंचमंडलमाराध्य स्नापयेदष्टतद्घटैः ॥ ४ ॥

---

अभिषेक करण्याच्या वेदीच्या पूर्व दिशेला आठ सम्मार्जन कुंभांची स्थापना करावी. वेदीवर पंचमंडलाच्या वर सिंहासन स्थापन करावें. याप्रमाणें पूर्व विधि आहे

१–४ स्नान व्रतें इत्यादिकानीं शुद्ध होऊन इंद्रानें वस्त्र व यज्ञोपवीत धारण करावें. चार प्रतींद्रासहित ईर्यापथशोधन करून आचार्यांच्या आज्ञेनें सिद्धभक्ति व सकलीकरण करावें. मंत्रांनीं पूजाद्रव्यें शोधून पुष्कळ भूषणांनीं स्वतः प्रतींद्र यासह भूषित व्हावें. महाभिषेकविधीनें स्थापिलेल्या भद्रसिंहासनावर दर्भशय्येमध्यें असलेलें जिनबिंब स्थापावें. पंचमंडलाची आराधना करून आठ घटांनीं अभिषेक करावा.

तद्बिंबस्थापनं मूलवेदीयंत्राग्रविष्टरे ॥
संप्रोक्षणविधिः पश्चाच्छुद्धशाल्यादिवस्तुभिः ॥ ५ ॥
मुखवस्त्रकृतिः कांडस्थापनं चाष्टधार्चनम् ॥
नानासुमंगलद्रव्यार्चनं पुष्पजपस्ततः ॥ ६ ॥
पुष्पजससुगंधादिद्रव्यैः सौवर्णतालगैः ॥
नयनोन्मीलनं तेन गंधेनोद्वर्त्तनं ततः ॥ ७ ॥
मुखवस्त्रापसरणं पुष्पांजलिरथाशिषः ॥
आराधनं नृत्यगीतवाद्यैर्नानाविधस्तवैः ॥ ८ ॥
चैत्यादिभक्तित्रितयस्तवनं संघपूजनम् ॥
वेदीस्थदेवतापूजा धामदिक्पालकार्चनम् ॥ ९ ॥
षड्द्वारदेवताभ्यर्चा ग्रामदिक्पालपूजनम् ॥
क्षमापणं जिनेंद्रादिसर्वदेवविसर्जनम् ॥ १० ॥

१ ११ मग तें जिनबिंब मूलवेदीयंत्राच्या सिंहासनावर स्थापावें. तदनंतर शुद्ध साळी वगैरे पदार्थांनीं संप्रोक्षणविधि करावा. जिनप्रतिमेच्या मुखावर वस्त्र आच्छादावें. बाण जवळ ठेवावेत. अष्ट प्रकारें पूजा करावी. मंगल द्रव्यार्चन करावें. व पुष्पांनीं जप करावा. सुवर्णपात्रांतील सुगंधि द्रव्यांनीं नेत्रोन्मीलनविधि करून गंधाची उटी लावावी. यानंतर मुखवस्त्र दूर सारावें, पुष्पांजलिसमर्पण करावें आणि आशिर्वाद, आराधन, नृत्य, गीत वादित्र, नाना स्तुति हे विधि करावेत. चैत्यादि तीन भक्ति करून संघाचें पूजन करावें. यानंतर

ततः संस्नापयेत्पूर्वरात्रे लोकत्रयीगुरुम् ॥
कलशैः पंचविंशत्या शतेनाष्टाधिकेन वा ॥ ११ ॥
अनंतरदिने देवमेकवारं विहारयेत् ॥
ततः सायं घटैरष्टशतेन स्नापयेद्विभुम् ॥ १२ ॥
अभिषेकक्रियां कृत्वा समभ्यर्च्य श्रुतं गुरुम् ॥
गंधोदकभृतं कुंभं यष्ट्रे दद्यान्मुदाशिषः ॥ १३ ॥
शेषां च सर्वभव्येभ्यो दद्यात्प्रागुदिताशिषः ॥
यष्टा संपूजयेत्संघं यथाशक्ति यथोचितम् ॥ १४ ॥
विसर्जनं निर्जराणामध्यात्मध्यासनं विभोः ॥
शांतिधारा ततः शांतिबलिकर्मक्षमापणम् ॥ १५ ॥

वेदीवरील देवतांचें, धामदेवता व दिक्पालदेवता यांचें पूजन करून पडद्वारदेवतांचें पूजन करावे. क्षमापण करून सर्व देवतांचें विसर्जन करावें. तदनंतर रात्रीच्या पूर्वभागीं जिनाभिषेक २५ कलशांनीं अथवा १०८ कलशांनीं करावा.

१२-१४ लागलीच दुसऱ्या दिवशीं एकवेळेस जिनेश्वराचा विहार करवून मग सायंकाळीं १०८ कुंभांनीं त्याचा अभिषेक करावा. पूजा करावी. शास्त्र व गुरु यांचें पूजन करून यजमानाला आशीर्वाद देऊन गंधोदककुंभ अर्पण करावा. सर्व भव्यजीवांना शेषा व आशीर्वाद द्यावा. यजमानानें संघाची यथोचित पूजा करावी. यानंतर देवांचें विसर्जन व प्रभूला हृदयांत स्थापन करावें. १५—२० शांतिधारा, शांतिबलि, कर्म-

गमनाप्रच्छनं पश्चात्कृतकर्मफलार्थनम् ॥
आशीर्दानाविधिं दीक्षामोचनं गुरुसाक्षिकम् ॥ १६ ॥
शांतिभक्तिं च कृत्वेंद्रः प्रतिष्ठां तां समापयेत् ॥
निष्ठापितप्रतिष्ठं तं यष्टेन्द्रं बहु मानयेत् ॥ १७ ॥
सत्कृत्य भक्त्या भव्यास्तं सर्वे यांतु यथायथम् ॥
प्रतिष्ठादिवसे कुर्यादुत्सवं मासि मासि च ॥ १८ ॥
आवर्षादथ ऊर्ध्वं तु वर्षे वर्षे च शक्तितः ॥
उत्सवानां विधिर्भेदोप्युत्तरत्राभिधीयते ॥ १९ ॥
इति संक्षेपतश्चार्हत्प्रतिष्ठा प्रतिपादिता ॥
अनुक्तमन्यतो ग्राह्यमुचितं लक्षणादिकम् ॥ २० ॥
प्रागुदीरित एवास्य प्रयोगोऽपि प्रयोज्यताम् ॥

---

विनाश, जाण्याची परवानगी, पूजाफलयाचना, आशीर्वाददान हे विधि करून गुरूच्या साक्षीनें दीक्षा सोडावी. शांतिभक्ति करून प्रतिष्ठा समाप्त करावी. प्रतिष्ठा ज्यानें पूर्ण केली त्या इंद्राचा यजमानानें अतिशय आदर करावा व भव्यजनांनीं भक्तिनें आदर त्याचा करून आपआपल्या स्थानीं निघून जावें. प्रत्येक महिन्याला प्रतिष्ठेच्या दिवशीं उत्सव करावा. याप्रमाणें एकवर्ष करावें पुढें प्रत्येक वर्षी करावा. उत्सवाचे प्रकार पुढें आम्ही सांगू याप्रमाणें संक्षिप्त प्रतिष्ठा आम्ही सांगितली. न सांगितलेला पण योग्य असा ही विधि येथें करण्यास हरकत नाहीं.

यथोचितसमस्तानां कर्मणां कर्मकोविदैः ॥ २१ ॥

इत्थं विधत्ते बहुभक्तियुक्तः संक्षेपतो वापि जिनप्रतिष्ठाम् ॥
यो देशकालाद्युचितामुपैति स धर्मनेमिर्निजसत्प्रतिष्ठाम् ॥ २२ ॥

इत्यर्हत्प्रतिष्ठासारसंग्रहे नेमिचंद्रदेवविरचिते प्रतिष्ठातिलकनाम्नि संक्षेपविधिर्नाम षोडशः परिच्छेदः ॥

॥ इति संक्षेपप्रतिष्ठाविधिः समाप्तः ॥

---

२१-२२ पूर्वी सांगितलेला हा प्रयोग विद्वान माणसांनीं येथें करावा याप्रमाणें जो भक्तिमान भव्य संक्षेपानें प्रतिष्ठा करितो तो देशकालानुसारें स्वतःच्या प्रतिष्ठेला पावतो.

याप्रमाणें नेमिचंद्रदेवविरचित प्रतिष्ठातिलक ग्रंथांतील संक्षिप्त प्रतिष्ठाविधीचा सोळावा परिच्छेद संपला.

# अथ सप्तदशः परिच्छेदः ।

## अथ सिद्धप्रतिष्ठाविधिः ॥

अथ सिद्धप्रतिमादिप्रतिष्ठाविधानान्यभिधास्यामः ।
संक्षेपार्हत्प्रतिष्ठावत्प्रतिष्ठाविधिरिष्यते ॥
सिद्धादीनां प्रयोगे तु विशेषः प्रतिपाद्यते ॥

तद्यथा—

वचनम् ॥ सिद्धप्रतिष्ठादिनात्पूर्वं पंचमे दिनेऽङ्कुरार्पणं तद्दिनाद् द्वितीयदिने मंडपप्रतिष्ठां ततस्तृतीयदिने वेदीप्रतिष्ठां च ततश्चतुर्थदिने रात्रौ उपवासमादाय जलाधिवासनं विमानशुद्धिं दर्भशयनं चाग्नित्रयार्चनं च पूर्ववद्विधाय वेदिकायां पंचवर्णैः सिद्धचक्रोद्धरणं विदध्यात् ॥

'अथेति'– आतां सिद्धप्रतिमा, आचार्यप्रतिमा वगैरेच्या प्रतिष्ठांचे प्रकार आम्ही सांगतो संक्षेपानें अर्हन्ताची प्रतिष्ठा करण्याचा जो विधि आहे तसाच सिद्धादिकांच्या प्रतिष्ठाचा आहे. परंतु कांही विशेष आहे तो याप्रमाणें:—सिद्धप्रतिष्ठेच्या पूर्वी पांचव्या दिवशी अंकुरार्पणविधि करावा. दुसरे दिवशीं मंडपप्रतिष्ठा विधि, तिसरे दिवशी वेदीप्रतिष्ठा, चौथे दिवशीं रात्री उपवासाची प्रतिज्ञा करून जलाधिवासन, विमानशुद्धि, दर्भशयन, तीन अग्नींचें पूजन, हे विधि पूर्ववत् करून वेदिकेवर पांच रंगानीं सिद्धचक्राचा उद्धार करावा.

७५८

ऊर्ध्वाधो रयुत सबिंदु सपरं ब्रह्मस्वरावेष्टितम् ॥
वर्गापूरितदिग्गतांबुजदलं तत्संधितत्वान्वितम् ॥
अतःपत्रतटेष्वनाहतयुतं ऱ्हींकारसंवेष्टितम् ॥
देवं ध्यायति यः स मुक्तिसुभगो वैरीभकंठीरवः ॥ १ ॥

इति सिद्धचक्रमुद्धृत्य ॥ ओं ऱ्हीं अर्हं असि आ उसा अनाहतविद्याधिपते एहि २ संवौषट् । ओं ऱ्हीं अत्र तिष्ठ ठ ठ । ओं ऱ्हीं मम सन्निहितो भव २ वषट् । ओं ऱ्हीं अर्हं असि आ उसा अनाहतविद्याधिपते जलं गृहाण २ नम इत्यादिभिर्मंत्रैराव्हानादिपूर्वकमभ्यर्च्य हेमादिपात्रे हेमादिलेखन्या तिलकद्रव्यैः सिद्धचक्रमुद्धृत्य तन्मंडलमध्ये विन्यस्य ॥

ओं ऱ्हीं अ सि आउसा अनाहतविद्यायै नमः इति मूलमंत्रेण अष्टोत्तरशतवारं जात्यादिपुष्पैर्ज्ञानमुद्रया सिद्धपरमेष्ठिध्यानेन समाराध्य । दर्भशय्यास्थितासिद्धबिंबमानीय ।

उत्तरवेद्यां स्थापनपीठे निवेश्य पूर्ववद्धूलीकलशेनाभिषिच्याष्टसम्मार्जनकलशैः पूर्वमंत्रैराकारशुद्धिं विधाय प्राक्तनयंत्रोपरि विष्टरे संस्थाप्य प्रतिष्ठेयनिरूपणं कृत्वा ' नमस्ते पुरुषार्थाना ' मित्या

---

' ऊर्ध्वाधो इति ' खालीं आणि वर रेफानें युक्त असलेल्या हकाराला ' र्हं ' ह्या बीजाक्षराला ओंकारानें वेष्टित करावें, आणि त्याच्या भोंवतीं स्वराक्षरांचें वलय लिहावें त्या वलयाला सभोंवतीं कमलपत्राकार आठ दलें करावीत. त्या प्रत्येक दलांत क्रमानें स्वर व कवर्ग, चवर्ग, टवर्ग, तवर्ग, पवर्ग, यवर्ग आणि शवर्ग हे आठ वर्ग लिहावेत त्या प्रत्येक दोन दलांच्या सांध्यांत तत्वाक्षर लिहावें. हें ह्याला तत्वाक्षर म्हणतात.

प्रत्येक दलाच्या शेवटाला अनाहत मंत्र लिहावा. ह्या अष्टदल कमलाच्या भोंवतीं ऱ्हीं ' या मंत्राचें

दि सिद्धस्तोत्रं पठित्वा प्रतिमोपरि पुष्पांजलिं क्षिपेत् ॥

जानाति बोधं यदनुग्रहेण । द्रव्याणि सर्वाणि चराचराणि ॥
दुराग्रहत्यक्तनिजात्मरूपं । सिद्धेत्र सम्यक्त्वगुणं न्यसामि ॥

ओं ऱ्हीं परमावगाढसम्यक्त्वगुणभुषिताय नमः इति प्रतिमोपरि पुष्पांजलिं क्षिप्त्वा तद्गुणमारोपयेत् ॥ १ ॥ एवमुत्तरत्रापि विधेयम् । जानाति बोधमित्यादि सप्तपद्यानि पठन् अर्चां समंतात्परामृशेत् । इति गुणारोपणम् ।

---

वेष्टन करावें याला मंत्रराज म्हणतात. जो या मंत्राच्या आकृतीचें ध्यान करितो त्याला मुक्ति प्राप्त होते व तो शत्रुरूपी हत्तींचा नाश करण्यास सिंहासारखा होता ' या प्रमाणें सिद्धचक्राचें यंत्र काढून ' ॐ ऱ्हीं अर्हमिति ' इत्यादि मंत्र म्हणून सिद्धचक्राचें आव्हान, स्थापन, सन्निधीकरण करून पूजन करावें सुवर्णादि पात्रामध्यें सोनें वगैरेच्या लेखणीनें तिलक करण्याच्या द्रव्यांनीं सिद्धचक्र काढून तें मंडलामध्यें स्थापून ' ओं ऱ्हीं अ सि आ उसा इत्यादि ' या मूल मंत्राची ज्ञानमुद्रेने जायी वगैरेच्या पुष्पांनीं सिद्धपरमेष्ठीच्या ध्यानानें आराधना करावी. तदनंतर दर्भशय्येमध्यें ठेवलेल्या सिद्धप्रतिमेला आणून ती उत्तर वेदीतील स्नानपीठावर स्थापून तिचा पूर्वीप्रमाणें धूलिकलशानें अभिषेक करावा व आठ सम्मार्जन कलशांनीं पूर्व मंत्रांच्या द्वारें आकारशुद्धि करून पूर्वीच्या यंत्रावर सिंहासनावर ठेऊन प्रतिष्ठेला योग्य अशा प्रतिमेचें वर्णन करून ' नमस्ते पुरुषार्थानां ' वगैरे सिद्धस्तोत्र म्हणावें व प्रतिमेवर पुष्पांजलिक्षेपण करावें

' जानातीति ' हा श्लोक व ' ओं ऱ्हीं परमेति ' हा मंत्र म्हणून सिद्धप्रतिमेमध्यें पुष्पांजलि क्षेपण करून परमावगाढ सम्यक्त्व गुणाचें आरोपण करावें. ज्याच्या प्रभावानें ज्ञान हें चराचरद्रव्यें जाणतें ज्याच्या योगें आत्म्याचें स्वरूप दुराग्रहरहित होऊन शुद्ध बनतें, तो सम्यक्त्व गुण सिद्धामध्यें मी स्थापितो.

आहूता इव सिद्धमुक्तिवनितामित्यादि ॥ ओं ऱ्हीं णमो सिद्धाणं सिद्धपरमेष्ठिन्नत्र एहि २ संवौषट् । ओं ऱ्हीं तिष्ठ २ ठ ठ । ओं ऱ्हीं मम सन्निहितो भव २ वषट् । आव्हानादिमंत्रः । ओं ऱ्हीं श्रीं अर्हं असि आ उ सा सिद्धाधिपतये नमः । अनेन मंत्रेण कर्पूरान्वितचंदनेन तिलकं न्यसेत् । ओं ऱ्हीं मुखवस्त्रं दधामि स्वाहा ॥ इति मुखवस्त्रमंत्रः ॥

गंगादितिर्थप्प० इत्यादिभिरधिवासनां विदध्यात् । ओं ऱ्हीं सिद्धाधिपते प्रबुध्यस्व ध्यातृजनमनांसि पुनीहि २ स्वाहा । नेत्रोन्मीलनमंत्रः ॥ ओं ऱ्हीं सिद्धाधिपते मुखवस्त्रमपनयामि स्वाहा । इति श्रीमुखोद्घाटनमंत्रः ।

वारिणा स्वच्छशीतेन हारिणा तापहारिणा ॥

याच प्रमाणें पुढेंही 'जानाति' वगैरे सात श्लोक म्हणून प्रतिमेला स्पर्श करून बाकीच्या सात गुणांचें आरोपण करावें.

'आहूता इवेति' हा श्लोक व 'ओं ऱ्हीं णमो' वगैरे मंत्र म्हणून सिद्धपरमेष्ठींचें आव्हान, स्थापन, सन्निधीकरण हें करावें.

'ओं ऱ्हीं असिआउसा' हा मंत्र म्हणून कापरानें युक्त अशा चंदनाचा सिद्ध परमेष्ठीला तिलक करावा. व 'ओं ऱ्हीं मुखेति' हा मुखवस्त्राचा मंत्र म्हणून प्रतिमेचें मुखाच्छादन करावें.

'गंगादीति' हा श्लोक म्हणून अधिवासनक्रिया करावी. 'ओं ऱ्हीं सिद्धेति' हा मंत्र म्हणून नेत्रोन्मीलन क्रिया करावी. 'ओं ऱ्हीं सिद्धाधिपते' हा मंत्र म्हणून सिद्धप्रतिमेच्या मुखावरचें वस्त्र काढावें.

'वारिणेति' हा श्लोक म्हणून व मंत्र म्हणून पापनाशार्थ स्वच्छ शीतल तीर्थजलानें सिद्धप्रतिमेचा अभिषेक करावा.

विशुद्धानभिषिंचामि सिद्धानघविशुद्धये ॥

ओं ऱ्हीं श्रीं अर्हं सिद्धाधिपते तीर्थोदकेनाभिषिंचामीति स्वाहा। तीर्थोदकस्नपनम् ॥ १ ॥

पुंड्रेक्षुचोचचूतादिस्वरसोदारधारया ॥

विशुद्धा० ॥ ओं ऱ्हीं पुंड्रेक्षुप्रमुखरसैरभिषिंचामि इति स्वाहा। रसस्नपनम् ॥ २ ॥

पिंगहय्यंगवीनेन नवीनेन सुगंधिना।

विशुद्धा० ॥ ओं ऱ्हीं हय्यंगवीनघृतेन स्नपयामीति स्वाहा ॥ घृतस्नपनम् ॥ ३ ॥

क्षरत्सुधासदृक्षेण क्षीरपूरेण भूरिणा ॥

विशुद्धा० ओं ऱ्हीं० धारोष्णगव्यक्षीरपूरेणाभिषिणोमीति स्वाहा ॥ दुग्धस्नपनं ॥ ४ ॥

दध्ना पूर्णशरच्चंद्रचंद्रिकाधवलत्विषा। विशुद्धा० ॥

ओं ऱ्हीं जगन्मंगलेन दध्ना स्नपयामीति स्वाहा। दधिस्नपनम् ॥ ५ ॥

कषायद्रव्यसत्कल्ककाथचूर्णैः सुगंधिभिः ॥

उपस्करोमि शुद्धात्मसिद्धानघविशुद्धये ॥ ६ ॥

---

पुंड्रेक्षु इति हा श्लोक समंत्र म्हणून ऊस, नारळ, आंबे यांच्या रसानें सिद्धप्रतिमेचा अभिषेक करावा.
'पिंगेति' हा श्लोक समंत्र म्हणून लोणकढ ताज्या तुपानें श्री सिद्धाचा अभिषेक करावा.
'क्षरदिति' हा श्लोक समंत्र म्हणून अमृतप्रवाहासारख्या दुधाच्या प्रवाहानें अभिषेक करावा.
'दध्नेति' हा श्लोक समंत्र म्हणून पूर्णचंद्राच्या प्रकाशाप्रमाणें धवल अशा दह्यानें सिद्धप्रतिमेचा अभिषेक करावा
'कषायेति' हा श्लोक समंत्र म्हणून सुगंध कषाय द्रव्याच्या सुगंध चूर्णाची उटणी सिद्धप्रतिमेला लावावी.

ओं ऱ्हीं दिव्यप्रभूतसुरभिकषायद्रव्यकल्कक्वाथचूर्णैरुपस्करोमि स्वाहा । उद्वर्तनादिविधानम् ॥

पवित्रसुपविलोरुमनोरमफलोत्करैः

निर्वर्तयामि शुद्धात्मसिद्धानघविशुद्धये ॥

ओं ऱ्हीं विचित्रमनोरमफलैरवतारयामि इति स्वाहा ॥ फलावतरणम् ॥

तीर्थांभःसभृतैः कुंभैरष्टभिर्मंगलान्वितैः ॥ निर्वर्तयामि० ॥

ओं ऱ्हीं परमसुराभिद्रव्यसंदर्भपरिमलगर्भतीर्थांबुसंपूर्णसुवर्णकुंभाष्टतयेन परिषेचयामि स्वाहा ॥ कलशाष्टकाभिषेकः ॥ ८ ॥

पूतशीतलगंधोदैर्गंधद्रव्यादिवासितैः ॥ विशुद्धा ॥

ओं ऱ्हीं परमसौमनस्यनिर्बंधनगंधोदकपूरेणाप्लावयामि स्वाहा ॥ गंधोदकस्नपनम् ॥ ९ ॥

ओं बाह्याभ्यंतरहेतुजात० । ओं ऱ्हीं निरवशेषावरण० । स्वच्छैस्तीर्थ० । श्रीसिद्धनाथान्यजे ॥ ओं ऱ्हीं लोकोत्तरनीरधाराहरिचंदनद्रवकलमाक्षतपुंजाष्टकमंदारप्रमुखकुसुमदामसुधारसरप-

---

'पवित्रेति' हा श्लोक समंत्र म्हणून नानाप्रकारच्या पवित्र मनोहर फळांनीं सिद्धप्रतिमेवरून अवतरण क्रिया करावी.

'तीर्थेति' हा श्लोक व मंत्र म्हणून उत्कृष्टसुगंधिद्रव्यांनीं सुवासित अशा आठ कळशांनीं सिद्धप्रतिमेचा अभिषेक करावा.

'पूतेति' हा श्लोक म्हणून उत्कृष्ट सुगंधी अशा गंधोदक जलानें सिद्धप्रतिमेचा अभिषेक करावा.

'ओं बाह्येति' वगैरे म्हणून जलापासून अर्घ्यापर्यंत अष्टद्रव्यांनीं सिद्धप्रतिमेचें पूजन करावें. यानंतर सिद्धभक्ति करून इष्टप्रार्थनेचा श्लोक म्हणून पुष्पांजलि क्षेपण करावें. इष्टप्रार्थनाः—प्राण्यांना उत्कृष्ट सा-

णमो पत्तेयबुद्धाणं णमो सयंबुद्धाणं। णमो बोहियबुद्धाणं। णमो णमो रुजुमदीणं। णमो विउलमदीणं। णमो दसपुव्वीणं। णमो चउद्दसपुव्वीणं। णमो अट्ठंगाणिमित्तकुलाणं। णमो विवुणइड्ढिपत्ताणं। णमो विज्जाहराणं। णमो चारणाणं। णमो पण्णसमणाणं। णमो आगासगामिणं। णमो आसीविसाणं। णमो दिट्ठिविसाणं। इति षोडशपदानि विलिखेत्।

ततस्तद्बहिश्चतुर्विंशतिपत्रेषु णमो उग्गतवाणं १ णमो दित्ततवाणं २ णमो तत्ततवाणं ३ णमो महातवाणं ४ णमो घोरतवाणं ५ णमो घोरगुणाणं ६ णमो घोरपरक्कमाणं ७ णमो घोरगुणबह्मचारीण ८ णमो आमोसहिपत्ताणं ९ णमो खेलोसहिपत्ताणं १० णमो जल्लोसहिपत्ताणं ११ णमो दिप्पोसहिपत्ताणं १२ णमो सव्वोसहिपत्ताणं १३ णमो मणोबलीण १४ णमो वचोबलीणं १५ णमो कावबलीणं १६ णमा खीरसवीणं १७ णमो सप्पिसवीणं १८ णमो महुरसवीणं १९ णमो आमियसवीणं

---

'ओं अमिआउमा स्वाहा' ह्या मंत्रानें दक्षिणेकडून उत्तरेकडे श्रींकाराला वेष्टन घालावें नंतर सहा कोणामध्ये अप्रतिचक्र फट् अशीं सहा बीजाक्षरें लिहावींत. दोन दोन कोणाच्या अंतर्गी 'विचक्राय स्वाहा ह्रीं सहा बीजाक्षरें उजव्या बाजूनें स्थापावोत. व त्याच्यावर 'ओं'कार लिहावा. तदनंतर कोणाग्री श्री, ह्री, धृति, कीर्ति, बुद्धि, व लक्ष्मी ह्या सहा देवता डाव्या बाजूनें लिहाव्यात. याच्या बाहेर वलय करून आठ दलामध्यें 'णमो जिणाणं' वगैरे आठ मंत्र लिहावेत नंतर याच्या बाहेर पूर्वींप्रमाणें १६ दलामध्यें णमो सभिण्णसोदाराण' वगैरे १६ मंत्र लिहावेत

तदनंतर बाहेरील चोवीस पत्रामध्यें 'णमो उग्गतवाणं' असे चोवीस मंत्र लिहावेत. या मंत्रांना ह्रींकार मात्रेनें तीनदा वेष्टन करावें व क्रोंकारानें निरोध करावा व बाहेर पृथ्वीमंडल लिहावें. ओं ह्रीं श्री श्रीं वगैरे या मंत्रानें आठ पत्रामध्यें स्थापिलेल्या मंत्राची पूजा करावी. 'ओं णमो अरहताणं वगैरे मंत्रानें ४८ मं-

२० णमो अक्खीणमहाणसाणं २१ णमो वड्ढमाणाणं २२ णमो लोए सव्वसिद्धायदाणं २३ णमो भयवदो महातिमहावीरवड्ढमाणाण बुद्धरिसीणं २४ । इति चतुर्विंशतिपदान्यालिख्य र्‍हींकारमात्रया त्रिगुणं वेष्टयित्वा क्रोंकारेण निरुध्य बहिः पृथ्वीमंडलं विलिखेत् । ओं र्‍हीं क्ष्वीं श्रीं अर्हं अ सि आ उ सा अप्रतिचक्रे फट विचक्राय झ्रौं २ स्वाहा । अनेन मध्यपूजा विदध्यात् ॥ ओं णमो अरहंताणं । णमो जिणाणं इत्यादि र्‍हां र्‍हीं र्‍हूं र्‍हौं र्‍हः असि आ उ सा झ्रौं २ स्वाहा । एते अष्टचत्वारिंशत्पूजामत्राः । ततो दर्भशय्यास्थितबिंबमानीय स्नपनवेदीपीठाग्रे निवेश्य धूलीकलशाभिषेकानंतरं सर्वौषधिविमिश्रतीर्थाम्बुसंभृतैः पंचाचारसंकल्पपंचकुंभैः, चतुरनुयोगसंकल्पचतुःकुंभैः, रत्नत्रयसंकल्पेन त्रिभिः कुंभैः । क्रमादाचार्योपाध्यायसर्वसाधुबिंबानामाकारशुद्धिं विधाय मूलवेदीयंत्रोपरि विष्टरे तद्बिंबानत्र स्थाप्य ये येऽनगारा इति प्रागुक्तमहर्षिस्तवनं पठित्वा बिंबान्समंतात्परामृश्य पुष्पाजलिपूर्वकं पंचाचार

---

त्रांची पूजा करावी. तदनंतर दर्भशय्येंत असलेली आचार्यादिकांची प्रतिमा आणून स्नानवेदीच्या सिंहासनावर स्थापन करावी. प्रथम धूलीकलशाभिषेक करावा. नंतर सर्वौषधिमिश्रित तीर्थोदकाच्या पांच कुंभांनीं ( त्या कुंभामध्यें पांच आचारांचा संकल्प करावा ) अभिषेक करावा. प्रथमानुयोग वगैरे चार अनुयोगाचा चार कुंभामध्यें संकल्प करून व रत्नत्रयाचा तीन कुंभामध्यें संकल्प करून अभिषेक करावा. या रीतीनें आचार्य, उपाध्याय व सर्व साधूच्या प्रतिमांची आकारशुद्धि करून मूलवेदीच्या यंत्रावरील सिंहासनावर त्या बिंबांची स्थापना करावी. 'ये येऽनगारा' हें महर्षिस्तोत्र ह्मणून या बिंबांना सर्व बाजूनें स्पर्श करून पुष्पांजलिपूर्वक पांच आचार दर्शन, ज्ञान, वीर्य, चारित्र व तप असे पांच आचार; प्रथमानुयोग, करणानुयोग, चरणानुयोग व द्रव्यानुयोग हे

चतुरनुयोगरत्नत्रयलक्षणगुणान् तद्बिंबेषु क्रमेण समारोपयेत् ॥

ओं ऱ्हूं णमो आइरियाणं आचार्यपरमेष्ठिन् अत्र एहि २ संवौषट् । ओं ऱ्हूं तिष्ठ २ ठठ । ओं ऱ्हूं मम सन्निहितो भव २ वषट् । तथा ओं ऱ्हौं णमो उवज्झायाणं उपाध्यायपरमेष्ठिन् अत्र एहि २ संवौषडित्यादि । तथा ओं ऱ्हः णमो लोए सव्वसाहूणं साधुपरमेष्ठिन् अत्र एहि २ संवौषडित्यादि । इत्याचार्यादीनामाव्हानादिमंत्रः । ततश्च ओं ऱ्हूं णमो आइरियाणं धर्माचार्याधिपतये नमः इत्यादिमंत्रैः सिद्धप्रतिमावत्तिलकविधिं विदध्यात् । एवमुपाध्यायसाधुपरमेष्ठिनोरपि विकल्प्य कल्पयेत् ओं ऱ्हीं मुखवस्त्रं दधामीति स्वाहा । मुखवस्त्रमंत्रः । ओं ऱ्हूं णमो आइरियाणं आचार्यपरमेष्ठिन् जलं गृहाण २ नमः इत्यादिभिर्मंत्रैराचार्यपरमेष्ठिनमर्चयेत् । एवमुपाध्यायसाधुपरमेष्ठिनोरर्चनामंत्रा नियोजनीयाः । आचार्यादिनामांकितेन सिद्धप्रतिष्टोक्तेन-

---

चार अनुयोग, सम्यग्दर्शन, सम्यग्ज्ञान व सम्यक् चारित्र अशा सर्व गुणांचा क्रमानें या तीन प्रतिमामध्यें आरोप करावा.

ओं ऱ्हूं णमो आयरियाणं वगैरे मंत्र म्हणून आचार्यपरमेष्ठींचें आव्हान, स्थापन, सन्निधीकरण करावें याच प्रमाणें उपाध्याय व सर्व साधु यांच्या आव्हानादिकानें मंत्र म्हणून त्याचें आव्हान, स्थापन वगैरे करावें.

ओं ऱ्हूं णमो आइरियाणं धर्माचार्याधिपतये नमः इत्यादि मंत्र म्हणून सिद्धप्रतिमेप्रमाणे आचार्य प्रतिमेचा तिलकविधि करावा. याचप्रमाणें उपाध्याय व सर्व साधु यांचेंहि मंत्र म्हणून तिलकविधि करावा.

'ओं ऱ्हीं मुखवस्त्रं दधामि स्वाहा' हा मंत्र म्हणून यांच्या मुखावर वस्त्राच्छादन करावें

'ओं ऱ्हूं णमो आयरियाणं आचार्यपरमेष्ठिन् जलं गृहाण' वगैरे मंत्र म्हणून आचार्य, उपाध्याय व

नयनोन्मीलनं आचार्यादिबिंबानां कुर्यात् । ओं ऱ्हीं आचार्यादीनां योजिनेन मुखवस्त्रोद्धटनमंत्रेण मुखवस्त्रोद्घाटनम् ।

वारिणा स्वच्छशीतेन हारिणा तापहारिणा ॥
विशुद्धानपि सिंचामि धर्माचार्यान्स्वशुद्धये ॥

वारिणा स्वच्छ० । पाठकेंद्रान्स्वशुद्धये ॥ वारिणा स्वच्छ० ॥ सर्वसाधून्स्वशुद्धये ॥ इत्यादिभिर्मंत्रैर्यथोचितं योजितैराचार्यादिबिंबानामाभिषेकं कुर्यात् ॥ यागमंडलोक्ताचार्योपाध्यायसर्वसाधुगद्यपद्यैः पूजावसरप्रार्थनां कृत्वा, ओं ऱ्हीं लोकोत्तम्नीरधाराहरिचंदनेत्यादिमंत्रवाक्यैः पूजां विदध्यात् । ततः क्रियाकांडोक्तक्रियां कृत्वाभिमतप्रार्थनामिदं पठित्वा पुष्पांजलिं प्रकल्पयेत् । प्राज्यं साम्राज्यमस्तु० । धर्मसूरिप्रसादात् ॥ प्राज्यं साम्राज्यमस्तु० । पाठकेंद्रप्रसादात् ॥ प्राज्यं साम्राज्यमस्तु० । सर्वसाधुप्रसादात् ॥ ततः पूर्ववद्विसर्जनादिकमनुतिष्ठेत् । प्रातिष्ठानंतरदिनेऽवभृथस्नानादिकं पूर्व-

---

सर्वसाधु यांची अष्ट द्रव्यानीं पूजा करावी नयनोन्मीलनाच्या मंत्रांत आचार्य उपाध्याय व साधु यांच्या नांवाची योजना करून यांचा नयनोन्मीलनविधि सिद्धप्रतिष्ठेंत सांगितल्याप्रमाणें करावा. यानंतर मुखवस्त्र काढण्याचा मंत्र ह्मणून तें काढावें वारिणा स्वच्छशीतेन वगैरे श्लोक ह्मणून आचार्य, उपाध्याय व सर्व साधु यांचा पंचामृताभिषेक करावा यागमंडलांत पूजेच्या वेळीं सांगितलेली आचार्य उपाध्याय व साधु यांची गद्य पद्य मंत्रांनीं स्तुति करून मग ओं ऱ्हीं लोकोत्तरेति ' वगैरे मंत्र ह्मणून अष्ट द्रव्यांनीं पूजा करावी. तदनंतर क्रियाकांडांत सांगितलेली क्रिया करून इष्टप्रार्थना ह्मणून पुष्पांजलि समर्पण करावी

' प्राज्य साम्राज्येति ' हे श्लोक ह्मणून व विसर्जनाचे श्लोक वगैरे ह्मणून विसर्जन वगैरे करावें. प्र-

पत्कृत्वा प्रतिष्ठां निष्ठापयेत् ॥

इत्याचार्यादिप्रतिष्ठाविधानम् ॥

अथ श्रुतदेवताप्रतिष्ठाविधानम् ।

श्रुतदेवताप्रतिष्ठादिनात्प्राक्पंचमे दिने अंकुरार्पणं कृत्वा, अग्नित्रयार्चनपर्यंतं कर्म पूर्ववत् कृत्वा, वेद्यां सारस्वतयंत्रोद्धरणं विदध्यात् । पूर्वकर्णिकायां ऱ्हींकारमालिख्य तद्बाह्ये हंकारं सविसर्गं सकारं च लिखित्वा, ओं ऱ्हीं श्रीं वद वद वाग्वादिनि भगवति सरस्वति ऱ्हीं नमः इत्यनेन मूलमंत्रेण वेष्टयेत् तद्बहिः पूर्वादिदिक्क्रमेण चतुर्षु पत्रेषु ओं वाग्वादिन्यै नमः। ओं भगवत्यै नमः। ओं सरस्वत्यै नमः । ओं देव्यै नमः। इति चतुराख्या लिखेत् ॥ तद्बहिरष्टसु पत्रेषु ओं नंदायै नमः । ओं भद्रायै नमः । ओं जयायै नमः । ओं विजयायै नमः । ओं अपराजितायै नमः । ओं जंभायै नमः । ओं मोहायै नमः । ओं स्तंभिन्यै नमः इति चाष्टौ देवीर्लिखेत् । तद्बाहिश्च

---

तिष्ठेनंतर दुसर दिवशीं अवभृथस्नान वगैरे करून आचार्य, उपाध्याय, साधु यांची प्रतिष्ठा पूर्ण करावी याप्रमाणे आचार्यादिप्रतिष्ठाविधि आहे.

श्रुतदेवता प्रतिष्ठादिवसाच्या पूर्वी पांचव्या दिवशीं अंकुरार्पण करून तीन अग्नीची पूजा करणे एथपर्यंतचा सर्व विधि पूर्वीप्रमाणें करून वेदीवर सारस्वतयंत्र लिहावें. तें या प्रमाणें:—प्रथम कर्णिकेंत 'ऱ्हीं' हें अक्षर लिहून बाहेर 'हं' व 'सः' हीं अक्षरें लिहावीत. व या अक्षरांना 'ओं ऱ्हीं श्रीं वद वद वाग्वादिनि भगवति सरस्वति ऱ्हीं नमः' या मूलमंत्रानें वेढा घालावा अर्थात सभोंवती 'ओं वाग्वादिन्यै नमः' इत्यादि चार मंत्र लिहावेत. याच्यार बाहेर आठ पत्रामध्यें ओं नंदायै नमः वगैरे आठ मंत्र लिहावेत. पुनः त्याच्या बाहेर सोळा पत्रा-

षोडशपत्रेषु, ओं रोहिण्यै नमः, ओं प्रज्ञप्त्यै नमः, इत्यादिमंत्रैः षोडश विद्यादेवीः स्थापयेत् । ततः पूर्वाद्यष्टदिक्षु इंद्राय स्वाहा इत्यादिमंत्रैरष्ट दिक्पालान्विन्यसेत् । पूर्वेशानदिशोश्चांतराले, ओं अधोनागेभ्यः स्वाहा इति नागान्विन्यसेत् । पश्चिमदिक्पालोपरिष्ठाच्च ओं ऊर्ध्वब्रह्मणे नमः इति परब्रह्म प्रतिष्ठापयेत् ।। इंद्रादधश्च ओं मयूरवाहिन्यै नमः इति नागादिदेवतां स्थापयेत् ।। ततस्त्रिर्मायामात्रया क्रोंकारेण निरुध्य तद्बावेष्ट्य बहिः पृथ्वीमंडलं लिखेदिति । ततो दर्भशय्यास्थितबिंबमानीय स्नपनवेदीपीठाग्रे निवेश्य सर्वौषधिविमिश्रतीर्थांभःसंभृतैश्चतुरनुयोगसंकल्पचतुःकुंभैः ओं ऱ्हीं श्रुतदेव्याः कलशस्नपनं करोमि स्वाहेत्यनेन मंत्रेणाकारं शोधयेत् ।।

निर्मूलमोहतिमिरक्षपणैकदक्षं । न्यक्षेण सर्वजगदुज्ज्वलनैकतानम् ।।
सोषेस्व चिन्मयमहो जिनवाणि नूनं । प्राचीमतो जयसि देवि तदल्पसूतिम् ।।

मध्यें ' रोहिण्यै नमः ' वगैरे सोळा विद्यादेवतांचे मंत्र लिहावेत. तदनंतर पूर्वादि आठ दिशामध्यें ' इंद्राय स्वाहा ' वगैरे मंत्र लिहावेत. पूर्व व ईशान्य दिशांच्या मध्यभागीं ' अधानागेभ्यः स्वाहा ' हा मंत्र लिहावा पश्चिम दिक्पालाच्यावर ' ऊर्ध्वब्रह्मणे नम ' हा मंत्र लिहावा. इंद्रदिक्पालाच्या खालीं ' ओं मयूरवाहिन्यै स्वाहा ' हा मंत्र लिहावा तदनंतर, तीनदा मायामात्रेनें व ओंकारानें यांना वेष्टन घालावें व बाहेर पृथ्वीमंडल लिहावें यानंतर दर्भशय्येवर असलेलें श्रुतदेवतेचें बिंब आणून स्नानवेदीच्या सिंहासनावर त्याची स्थापना करावी. सर्वौषधिमिश्रित तीर्थजलांनीं भरलेल्या चार कुंभामध्यें चार अनुयोगाचा संकल्प करून त्या कुंभानीं ' ओं ऱ्हीं श्रुतदेव्या' कलशस्नपनं करोमि स्वाहा' या मंत्रानें अभिषेक करून आकारविशुद्धि करावी.

' निर्मलेति ' ही सरस्वती देवी मोहांधकाराचा नाश करणारी, सर्व जगाला प्रकाशित करणारी, अशा चिन्मय ज्योतिला प्रसवली आहे. यास्तव हिनें अल्प प्रकाशधारक सूर्याला प्रसवणाऱ्या पूर्व दिशेला जिंकलें

आभवादपि दुरासदमेव श्रायसं सुखमनन्तमाचिंत्यम् ॥
जायतेद्य सुलभं खलु पुंसां त्वत्प्रसादत इहांब नमस्ते ॥
चेतश्चमत्कारकरा जनानां । महोदयाश्चाभ्युदयाः समस्ताः ॥
हस्ते कृताः शस्तजनैः प्रसादात् तवैव लोकांब नमोस्तु तुभ्यम् ॥
सकलयुवतिसृष्टेरंबचूडामणिस्त्वं । त्वमसि गुणसुपुष्टेर्धर्मसृष्टेश्च मूलम् ॥
त्वमसि च जिनवाणि स्वेष्टमुक्त्यंगमुख्या । तदिह तव पदाब्जं भूरिभक्त्या नमामः ॥
इति श्रुतदेवीस्तवनं पठित्वा प्रतिमोपरि पुष्पांजलिं क्षिपेत् ॥
ततश्च ।

बारह अंगंगिज्जा दंसणतिलया चरित्तवत्थहरा ॥
चोद्दसपुव्वाहरणा ठावे दव्वाय सुयदेवी ॥ १ ॥
आचारशिरसं सूत्रकृतवक्त्रां सुकंठिकाम् ॥
स्थानेन समवायागव्याख्याप्रज्ञप्तिदोर्लताम् ॥ २ ॥

---

आहे- ' अभवादपीति ' संसारअवस्थेंत दुर्लभ असें अचिंत्य व अनंत मोक्षसुख हे माते तुझ्या प्रसादामुळें मनुष्यांना प्राप्त होतें यास्तव आम्ही तुला नमस्कार करितो. ' चेतश्चमि ' हे माते अंतःकरणास विस्मित करणारे स्वर्गीय व मोक्षाचें ऐश्वर्य तुझ्या प्रसादानें लोकांना मिळतें यास्तव मी तुला नमस्कार करितो. हे माते तूं सर्वस्त्रीसृष्टिमध्यें चूडामणि आहेस. तुझ्या पासून धर्माची व गुणांची उत्पत्ति होते तूं मुक्तीचें मुख्य साधन आहेस म्हणून आम्ही तुझ्या पदकमलाला नमस्कार करितो. या प्रमाणें श्रुतदेवीचें स्तवन म्हणून

वाग्देवतां ज्ञातृकथोपासकाध्ययनस्तनीम् ॥
अंतकृद्दशसन्नाभिमनुत्तरदशांगतः ॥ ३ ॥
सुनितंबां सुजघनां प्रश्नव्याकरणश्रुतात् ॥
विपाकसूत्रदृग्वादचरणां चरणांबराम् ॥ ४ ॥
सम्यक्त्वातिलकां पूर्वचतुर्दशाविभूषणाम् ॥
तावत्प्रकीर्णकोदीर्ण—चारुपत्रांकुरश्रियम् ॥ ५ ॥
आसदृष्टप्रवाहौघद्रव्यभावाधिदेवताम् ॥
परब्रह्मपथादृप्तां स्यादुक्तिं भुक्तिमुक्तिदाम् ॥ ६ ॥
सर्वदर्शनपाखंडदेवदैत्यखगार्चिताम् ॥

प्रतिमेवर पुष्पांजलिक्षेपण करावें. ' बारहेति ' श्रुतदेवीला बारा अंगें आहेत. सम्यग्दर्शन हा तिलक आहे, चारित्र हें तिचें वस्त्र आहे चौदा पूर्व हे तिचे आभरण आहे अशी कल्पना करून तिची स्थापना करावी. ' आचारेति ' आचारांग हें तिचें मस्तक आहे. सूत्रकृतांग हें मुख आहे. स्थानांग हें तिचा कंठ आहे. समवायांग व व्याख्याप्रज्ञप्ति हीं दोन अंगें तिचे दोन बाहु आहेत. ' वाग्देवतेति ' ज्ञातृकथा व उपासकाध्ययन हीं दोन अंगें तिचे स्तन होत अंतकृद्दशांग हे तिची वेणी होय. अनुत्तरदशांग हें तिचें ढुंगण होय. प्रश्नव्याकरणांग हें तिच्या कमरेच्या पुढचा भाग आहे. विपाकसूत्र व दृष्टिवाद हे तिचे पाय आहेत. सम्यक्त्व हा तिचा तिलक आहे. चौदापूर्व हे डागिने आहेत प्रकीर्णक हें सुंदर वेलबुट्टीप्रमाणें आहे

' आसेति ' श्री जिनेश्वरानीं पदार्थांतील सर्व पर्याय पाहिले आहेत. या सर्व पर्यायांची ही श्रुतदेवता अधिष्ठात्री आहे अर्थात् हिच्या आश्रयानें पदार्थांच्या सर्व अवस्थांचें लोकांस ज्ञान होतें. परब्रह्माच्या मार्गाचें अवलोकन करणाऱ्या लोकांना स्याद्वादाचें रहस्य सांगणारी व भोग आणि मोक्ष देणारी अशी ही श्रुतदेवता आहे.

जगन्मातरमुद्धर्तुं जगदत्रावतारयेत् ॥ ७ ॥

ओं अर्हन्मुखकमलवासिनि पापांधकारक्षयकारिणि श्रुतज्वालासहस्रप्रज्वालिते सरस्वति मम पापं हन २ क्षां क्षीं क्षूं क्षौं क्षः क्षीरधवले अमृतसंभवे वं २ मं २ हं स्वाहा । एतत्पठन् प्रतिमायाः अंगप्रत्यंगपरामर्शं कुर्यात् । गुणारोपणम् ॥

ओं ह्रीं अर्हन्मुखकमलवासिनि पापांधकारक्षयकारिणि श्रुतज्वालासहस्रप्रज्वालिते सरस्वति अत्र एहि २ संवौषट् ॥ ओं ह्रीं अर्हन्मुख॰ तिष्ठ २ ओं ह्रीं अर्हन्मुख॰ मम सन्निहिता भव २ वषट् । आव्हानादिमंत्राः ॥ ततो मूलमंत्रेण तिलकं दत्वा मुखवस्त्रमंत्रेण मुखवस्त्रं दत्वा । ओं ह्रीं श्रीं वद वद वाग्वादिनि भगवति सरस्वति जलं गृहाण २ नमः इत्यादिभिर्मंत्रैरभ्यर्च्य मूलमंत्रेण नयनोन्मीलनं कृत्वा समंत्रं मुखवस्त्रमुद्घाटयेत् ॥

वारिणा स्वच्छशीतेन हारिणा तापहारिणा ॥
विशुद्धामभिषिंचामि जिनवाणीं स्वशुद्धये ॥

---

'सर्वेति' सर्व मतांतील लोक, पाखंडी, देव, दैत्य, विद्याधर या सर्वांकडून जगाची माता अशी ही श्रुतदेवता पूजनीय आहे. यास्तव तिचा आह्मी उद्धार करितो.

'ओं अर्हदिति' हा मंत्र ह्मणून श्रुतदेवतेच्या प्रतिमेच्या सर्व अवयवांना स्पर्श करावा. ओं ह्रीं अर्हदिति हा मंत्र ह्मणून तिचें आव्हान, स्थापन, सन्निधीकरण करावें. तदनंतर मूलमंत्रानें तिलक करून मुखवस्त्राचा मंत्र ह्मणून मुखावर वस्त्र आच्छादावें. 'ओं ह्रीं श्री' हा मंत्र ह्मणून जलादिकांनीं श्रुतदेवतेची पूजा करावी. या नंतर मूलमंत्रानें नयनोन्मीलन क्रिया करून मंत्र ह्मणून मुखवस्त्र उघडावें.

अथैवमाकारशुद्धिं विधाय मूलवेद्यां नवधौतवस्त्रं सदर्भाक्षतपुष्पं प्रस्तीर्य तत्र तत्प्रतिमां निवेश्याभ्यर्च्य कांडाग्रदूर्वाग्रेण प्रोक्षणं विधाय शांतिहोमं यक्षमंत्रेण कृत्वा पुण्याहं घोषयित्वा स्वर्णशलाकोपात्तेन स्वर्णपात्रनिहितेन हिमपयःशर्करेण सुमुहूर्ते नयनोन्मीलनं कुर्यात् ॥ ततोऽधिवासनादिविधिं विधाय वस्त्राभरणमाल्यादिभिरभ्यर्च्य विसर्जनादिकं कुर्यात् । प्रतिष्ठानंतरदिनेऽवभृथस्नानादिकं पूर्ववत्कृत्वा प्रतिष्ठां निष्ठापयेत् ॥ ततः प्रभृति च तां नित्यं पूजयेत् ॥

एष एव च शेषाणां यक्षणां स्थापनाविधिः ॥
यक्षीणां च मतः किंचिद्भेदो मंत्राश्रयो भवेत् ॥
इति गदितविधानैः सिद्धमुख्यप्रतिष्ठाम् ॥
बहुविधजिनभक्त्या यो विधत्तेऽत्र भव्यः ॥
उपचितबहुपुण्यः साधु निर्विश्य भोगान् ॥

---

त्यावर ती यक्षप्रतिमा ठेऊन दर्भ व दूर्वा यांच्या अग्रभागानीं प्रोक्षण विधि करून यक्षमंत्रानें शांतिहोम विधि करावा. पुण्याहवाचन करून सोन्याच्या पात्रांत असलेले कापूर, दूध व साखर यांनीं सुवर्ण शलाकेनें सुमुहूर्तावर नयनोन्मीलनक्रिया करावी तदनंतर अधिवासनादि विधि करून वस्त्र, आभूषण, पुष्पमाळा वगैरेंनीं पूजन विसर्जनादिक क्रिया करावी. प्रतिष्ठेनंतर दिवशी अवभृथस्नानादिक पूर्वीप्रमाणे करून प्रतिष्ठा समाप्त करावी. मग दररोज यक्षप्रतिमेचें पूजन करावें.

'एषेति' याचप्रमाणें बाकीच्या यक्षांच्या स्थापनेचा विधि आहे. यक्षींच्या स्थापनेमध्यें थोडासा फरक आहे तो मंत्रांत आहे अर्थात् मंत्रप्रयोग स्त्रीलिंगी करावेत. याप्रमाणें सांगितलेल्या विधीस अनुसरून सि-

स भवति जिनसौख्यांभोधिनक्षत्रनेमिः ॥

⊛ इत्यर्हत्प्रतिष्ठासारसंग्रहे नेमिचंद्रदेवविरचिते प्रतिष्ठातिलकनाम्नि सिद्धादिप्रतिष्ठाविधिर्नाम सप्तदशः परिच्छेदः ॥ १७ ॥ ⊛

ह्यांची त्यांत सुरूपतें करून प्रतिष्ठा आहे असे हे विधि जो भव्यजीव करितो तो पुष्कळ पुण्य संचय करून अनेक भोगांचा उपभोग घेऊन तो स्वाभाविक सुखरूपी समुद्राला चंद्रासारखा होतो.

* याप्रमाणें नेमिचंद्र देवांनीं रचलेल्या या प्रतिष्ठातिलक ग्रंथामध्यें सिद्धादिप्रतिष्ठाविधीचें वर्णन करणारा १७ वा परिच्छेद समाप्त झाला. *

इत्यादिभिस्तामभिषिंचेत ॥ यागमंडलोक्तसरस्वतीगद्यपद्यमंत्रवाक्यैरभ्यर्चयेत् । ततः श्रुतभक्तिं कृत्वा अभिमतप्रार्थनार्थमिमं पठित्वा पुष्पांजलिं प्रकल्पयेत् । प्राज्यं साम्राज्यमस्तु० भवतु च जिनदेवतायाः प्रसादात् ॥ प्रतिष्ठानंतरदिनेऽवभृथस्नानादिकं कृत्वा प्रतिष्ठां निष्ठापयेत् ॥

इति श्रुतदेवताप्रतिष्ठाविधानम् ॥

अथ श्रुतस्कंधादिप्रतिष्ठाविधानम् ॥

शुभे शिलादौ श्रुतस्कंधमुत्कीर्य सरस्वतीप्रतिष्ठावत्प्रतिष्ठापयेत् । परमागमपुस्तकमालेख्य श्रुतपंचम्यां सुलग्ने वा तद्वत्प्रतिष्ठापयेत् । अक्षाकारशुध्यादिकं दर्पणप्रातिबिंबितपुस्तकस्य विदध्यात् । ऐदंयुगीनाचार्यादिषु पूर्वाचार्यगुणस्य सत्तां वीक्ष्य तत्पादुकाद्वयं आचार्यादिप्रतिष्ठावत्प्रतिष्ठापयेत् । प्रसिद्धसंन्यासमरणप्राप्तगुर्वादेर्निषेधिकां जिनगृहे निर्माप्य जिनप्रतिष्ठाकाले प्रति–

'वारिणेति' वगैरे श्लोक ह्मणून पंचामृताभिषेक करावा. यागमडळांत सांगितलेल्या गद्यपद्य मंत्रांनीं पूजा करावी. तदनतर श्रुतभक्ति करून इष्टप्रार्थनेचा 'प्राज्यमिति' हा श्लोक ह्मणावा व पुष्पांजलि समर्पण करावी. प्रतिष्ठेच्या दुसऱ्या दिवशीं अवभृथस्नानादि विधि करावा या प्रमाणे श्रुतदेवतेचा प्रतिष्ठाविधि करावा.

श्रुतस्कंधप्रतिष्ठाविधान.

उत्तम अशा शिला वगैरे मध्यें श्रुतस्कंध कोरून सरस्वतीच्या प्रतिष्ठेप्रमाणें त्याची प्रतिष्ठा करावी परमागमाचें शास्त्र लिहवून श्रुतपंचमीच्या दिवशीं अथवा उत्तम मुहूर्तावर श्रुतस्कंधाप्रमाणें त्याची प्रतिष्ठा करावा

शाप्य क्षपकांगोज्झनभूमौ निवेशयेत् । अथवा बहिरेव निमाप्य जिनप्रतिष्ठासमये नयनोन्मलिनं तद्द्रव्येण प्रापय्य तत्र गत्वा शेषाविधिं स्वयमिंद्रः कृत्वा संघक्रियां कुर्यात् । अथवा क्षपकांगोज्झनावनौ आचार्यादिप्रतिष्ठोक्तविधिं सर्वं समासतः कृत्वा वर्द्धमानस्वामिनिर्वाणकाले निषेधिकां प्रतिष्ठापयेत् ॥

इति श्रुतस्कंधादिप्रतिष्ठाविधानम् ॥

अथ यक्षायक्षीप्रतिष्ठाविधानम् ॥

यक्षप्रतिष्ठादिनात्पूर्वं पंचमे दिनेंकुरार्पणं कृत्वा, अग्निलयार्चनपर्यंतं कर्म दिनक्रमेण कृत्वा वेद्यां मंडलोद्धरणं विदध्यात् । वेद्यां पंचवर्णचूर्णैः सकार्णिकमष्टदलकमलं चतुष्कोणमंडलचतुष्टयं पृथ्वीमंडलं विरचय्य तत्र ओं ऱ्हीं क्रों सुवर्णवर्णवृषभवाहनपरशुफलाक्षमालावरदांकितचतुर्भुजवृषभवक्त्रधर्मचक्रालकृतमस्तकगोमुखयक्षाय संवौषट् स्वाहेति मंत्रं कार्णिकायामालिख्य तद्बहिरष्टसु

परमागमशास्त्रामध्यें आकारशुद्धि वगैरे कृत्यें करावयाची ती दर्पणामध्ये पडलेल्या त्याच्या प्रतिबिंबाची करावी. या कालातील आचार्यादिकांच्या ठिकाणीं पूर्वाचार्यांच्या गुणाचा सद्भाव असलेला पाहून या कालांतील आचार्यांच्या पादुकांची आचार्यांच्या प्रतिष्ठेप्रमाणें प्रतिष्ठा करावी प्रसिद्ध सन्यासमरणास प्राप्त झालेल्या आचार्यादिकांची निषेधिका ही जिनगृहामध्यें निर्माण करून जिनप्रतिष्ठेच्या वेळी जेथें आचार्यादिकांचे समाधिमरण झालें असेल तेथें ती स्थापावी अथवा बाहेरच निर्माण करून जिनप्रतिष्ठेच्या वेळीं जिनांच्या नयनोन्मीलन द्रव्यानें निषेधिकमध्यें ही नयनोन्मीलन क्रिया करून बाकीचा विधि स्वतः इंद्रानें करावा. सर्वानें ही यथाक्रम हा विधि करावा. अथवा जेथें आचार्यांनीं समाधिमरणानें देह त्याग केला असेल तेथें आचार्यप्रतिष्ठेप्रमाणें सर्वविधि संक्षेपानें करून महावीर स्वामीच्या निर्वाणाच्या दिवशीं निषेधिकेची स्थापना करावी.

पत्रेषु ओं ऱ्हीं क्रों श्रियै संवौषट् स्वाहेत्यादि दिक्कुमारीमंत्रानष्टौ । तद्बाहिर्वलयांतः ओं ऱ्हीं क्रों यक्षवैश्वानर —रक्षो—नधृत–पन्नगासुरसुकुमार–सवितृ–विद्यामालि—चमर--वैरोचन--महाविद्य-मारविश्वेश्वरपिंडाभिधानपंचदशातिथिदेवान्संस्थापयामि स्वाहा । इति तिथिदेवान्पंचदश । तद्बहिर्वलयांतः ओं ऱ्हीं क्रों सूर्यसोमांगारकसौम्यगुरुभार्गवशनिराहुकेतून् स्थापयामि इति स्वाहा। इति ग्रहदेवान्नव ॥ तद्बहिर्मंडलांतः ओं ऱ्हीं क्रों किन्नरेंद्र, किंपुरुषेंद्र, महोरगेंद्र, गंधर्वेंद्र, यक्षेंद्र, राक्षसेंद्र, भूतेंद्र, पिशाचेंद्रान्स्थापयामि स्वाहा इति व्यंतरेंद्रानष्टौ ॥ तद्बहिर्मंडलमध्ये वज्रचक्रखड्गहलमुसलगदाशक्तिभिंडिवालाख्यान्यष्टायुधानि च लिखित्वा बहिर्भूमंडलं विलिखेत् ॥ एवं मंडलं वर्तयित्वा स्वस्वमंत्रैर्यक्षादिदेवान् जलगंधादिभिरभ्यर्च्य कलशाष्टकादिभिर्वेदीं भूषयेत् ॥ अथ स्नपनमंडपे तां प्रतिमामानीय दर्भप्रस्तारे धान्यप्रस्तारे च स्थापयित्वा क्रमेण स्नपयेत् तत

---

या प्रमाणें श्रुतस्कंधादि प्रतिष्ठाविधि समजावा. यक्ष व यक्षी यांच्या प्रतिष्ठेचा विधि या प्रमाणें:—यक्षप्रतिष्ठादिवसाच्या पूर्वी पांचवे दिवशीं अंकुरार्पण विधि करून व तीन अग्नीच्या पूजनापर्यंतचें कर्म करून दिनक्रमाने वेदीवर मंडल काढावें. तें या प्रमाणें—वेदीवर पांच रंगांच्या चूर्णांनीं कर्णिकेसहित आठ दळांचें कमळ काढावें. याच्या सभोंवती चौकोनी चार मंडळें काढावींत. व पृथ्वीमंडल लिहावें. प्रथम कर्णिकेमध्यें ओं ऱ्हीं क्रों सुवर्णवर्ण वगैरे गोमुख यक्षाचा मंत्र लिहावा.

कर्णिकेच्या बाहेरील आठ पत्रामध्यें 'ओं ऱ्हीं क्रों श्रियै स्वाहा' वगैरे श्री ऱ्ही धृति वगैरे आठ दिक्कुमारींचे मंत्र लिहावेत. याच्या बाहेरच्या प्रथम वलयामध्यें 'ओं ऱ्हीं क्रों यक्षेति' हा मंत्र लिहून पधरा तिथिदेवतांची स्थापना करावी. त्याच्या बाहेरच्या वलयामध्यें 'ओं ऱ्हीं क्रों सूर्येति' वगैरे मंत्र लिहून नवग्रह

स्तत्रैव वेदिकायां नवकलशान्सर्वालंकारोपेतान्सर्वौषधिसंमिश्रशुद्धयंत्रमंत्रान्वितान् तीर्थजलपरिपूर्णान् शालिप्रस्तारोपरि लिखितमायाबीजासनान् निधाय, तत्पश्चिमभागे स्नपनपीठं स्थापयित्वा प्रक्षाल्यालंकृत्वा तदुपरि भुवनाधिपतिं लिखित्वाक्षतपुष्पदर्भान्विरचय्य तत्प्रतिमा तत्र स्थापयित्वा, पंचोपचारविधिनाऽभ्यर्च्य बाह्याष्टककलशैर्मंत्रपूर्वकमभिषिच्य चतुर्नीराजनं कृत्वा पुष्पांजलिपूर्वकं एकादशमाभिषेकं मध्ये कलशेनामृतमंत्रेण कुर्यात् ॥

तेजोमायादिकाख्यानं क्रियमाणक्रियान्वितम् ॥
तत्तत्पल्लवसंयुक्तं करोम्यंतं पदं स्मरेत् ॥ १ ॥

देवतांची स्थापना करावी. याच्या बाहेरच्या मडलामध्यें 'ओं ऱ्हीं क्रों किनरेंद्रेति' वगैरे मंत्र लिहून आठ व्यंतरेंद्रांची स्थापना करावी. त्याच्या बाहेरचे मंडलामध्यें वज्र, चक्र, खड्ग, हल, मुसल गदा, भिंडिवाल ही आठ आयुधें लिहून तदनंतर बाहर पृथ्वीमंडल लिहावें. या प्रमाणें मंडलांची रचना करून आपआपल्या मंत्रांनीं यक्षादिदेवतांना गंध अक्षतादिकांनीं पूजन आठ कलशांनीं वेदी भूषित करावी. नंतर स्नपनमडपांत ती प्रतिमा आणून दर्भशय्येत अथवा धान्य प्रस्तरामध्यें तिची स्थापना करून मग तिचा अभिषेक करावा. तदनंतर त्याच वेदीवर सर्वालंकारानीं युक्त, सर्वौषधिमिश्र शुद्धयंत्रमंत्र यानीं युक्त तीर्थजलानें भरलेले असे नऊ कलश ज्यांच्या वर माया बीज ( ऱ्हीं ) लिहिलेलें आहे अक्षता पसरून त्यावर ते ठेवावेत. यांच्या पाश्चिमभागीं स्नपनाकरितां सिंहासनाची स्थापना करून त्यावर भुवनाधिपातिला लिहून अक्षत, पुष्प, दर्भ यांची रचना करून यक्षाची प्रतिमा तेथें स्थापन करावी. पंचोपचार विधीनें पूजून आठ कलशांनीं मंत्रपूर्वक अभिषेक करावा. चार वेळा नीराजनविधि करून पुष्पांजलिपूर्वक मध्य कलशानें अमृत मंत्र ह्मणून अभिषेक करावा.

याप्रमाणें आकार शुद्धि करून मूलवदीवर दर्भ, अक्षता व पुष्प यासह नवीन धुतलेलें वस्त्र पसरून

# अथ अष्टादशः परिच्छेदः ।

जिनेंद्रमिंद्रसंदोहसंपादितमहोत्सवम् ॥
नत्वा स्वर्मोक्षदं वक्ष्ये विविधोत्सवसंविधिम् ॥ १ ॥
उत्कर्षेण महाभूत्या सूयते तीर्थवारिभिः
विहारपूर्वकं देवो यत्रासावुत्सवो मतः ॥ २ ॥
जिनोत्सवविधिं भक्त्या कुर्वन् धर्मप्रभावकः ॥
निर्विश्याभ्युदयं सर्वं निःश्रेयसमवाप्नुयात् ॥ ३ ॥
तस्य कारयिता चानुमंता द्रष्टा च भक्तितः ॥
धर्मार्थकाममोक्षार्थानापर्नोपद्यते ध्रुवम् ॥ ४ ॥
वर्णानामाश्रमाणां च विधत्ते विहितोत्सवः ॥

१-४ सर्व इंद्रांनीं मिळून ज्याचा महोत्सव केला अशा जिनेश्वरास नमस्कार करून स्वर्गमोक्षप्राप्ति करून देणाऱ्या अनेक तऱ्हेच्या उत्सवांची माहिती मी आतां सांगतो. मोठ्या ऐश्वर्यानें जिनेश्वराचा विहार करऊन तीर्थजलानें जो अभिषेक करणें त्यास उत्सव असें म्हणतात. धर्माची प्रभावना करणाऱ्या भव्यजीवानें भक्तीनें जिनोत्सव करावा म्हणजे त्यास इहलोकचीं सुखें मिळतील व तो क्रमानें मोक्षास प्राप्त होईल. जिनेश्वराचा उत्सव करविणारा, त्यास अनुमोदन देणारा अशा मनुष्यास धर्म, अर्थ, काम व मोक्ष या पुरुषार्थांची प्राप्ति होते.

सद्धर्मश्रीबलोद्धायुरारोग्यादिसमीहितम् ॥ ५ ॥
राजाराष्ट्रसमृद्धिः स्याज्जायते जातु नेतयः ॥
वियंति विपदः सर्वाः संपद्यंते च संपदः ॥ ६ ॥
किमत्र बहुनोक्तेन जिनोत्सवविधायिनः ॥
ध्रुवं यास्यंति ते सप्त परमस्थानसंपदः ॥ ७ ॥
आष्टान्हिकः पांचदिनः त्रैदिनश्चैकवासरः ॥
इत्युत्सवश्चतुर्द्धा स्यात्कर्तृशक्तिव्यपेक्षया ॥ ८ ॥
रथोपेतो रथापेत इत्याद्यो द्विविधो भवेत् ॥
रथोपेतो रथापेत इत्याद्यो द्विविधो भवेत् ॥ ९ ॥
तत्र राजाधिराजाद्या रथोपेतं वितन्वते ॥
महामुकुटबद्धाद्यैः क्रियमाणः स एव हि ॥
चतुर्मुखाभिधानः स्यात्सर्वतोभद्रसंज्ञकः ॥१०॥

५–८ या उत्सवामुळें वर्ण व ब्रह्मचारी वगैरे आश्रमांस धर्म, श्री, बल, आयुष्य, आरोग्य वगैरेची प्राप्ति होते व राष्ट्र यांची समृद्धि होते. कधींही अतिवृष्टि, अनावृष्टि वगैरेची बाधा होत नाहीं. संकटें सर्व नाहींशीं होतात व संपत्तींची प्राप्ति होते आणखी जास्ती काय सांगावयाचें आहे? त्यास सज्जाति, सद्गृहीत्व, वगैरे सात परमस्थानांची प्राप्ति होते. आठ दिवसाचा, तीन दिवसांचा व एक दिवसाचा पांच दिवसांचा असे उत्सवाचे हे उत्सव करण्याच्या सामर्थ्यावर अवलंबून चार भेद आहेत.

९–११ रथसहित व रथरहित असे उत्सवाचे दोन भेद आहेत. राजे महाराजे वगैरे लोक रथसहित उ-

किमिच्छकेन दानेन सार्वभौमेन चेत्कृतः॥
अयमेव रथोपेतः कल्पवृक्षाह्वयो भवेत् ॥ ११ ॥
रथोन्मुक्तममात्यादिप्रभवः प्रवितन्वते ॥
सामान्याशक्तितः कुर्युरवशिष्टास्त्रिधोत्सवान् ॥ १२ ॥
देशकालानुसारेण स्वस्वशक्त्यनुरोधतः ॥
सर्वानप्युत्सवान्सर्वे कुर्युः कल्पद्रुमादृते ॥ १३ ॥
षट्सु पौषादिमासेषु तीर्थभानि यथाक्रमम् ॥
पुष्यो मघा चोत्तरा च चित्रा राधा च मूलभम् ॥ १४ ॥
तीर्थभस्य दिने कुर्यात्तीर्थाख्यावभृथक्रियाम् ॥
ततस्तीर्थदिनात्पूर्वं नवमेऽष्टादशेऽथवा ॥ १५ ॥

त्सव करितात. मुकुटबुद्ध राजे वगैरेकडून केले जाणाऱ्या उत्सवाला चतुर्मुख, सर्वतोभद्र असें म्हणतात. किमिच्छक दान देऊन चक्रवर्तीकडून जो रथसहित उत्सव केला जातो त्यास कल्पवृक्ष हें नाव आहे.

११–१३ प्रधान सरदार वगैरेकडून रथरहित उत्सव केला जातो. सामान्य माणसांनीं बाकीचा तीन तऱ्हेचा उत्सव करावा. देश, काल यांना अनुसरून आपल्या शक्तिप्रमाणें कल्पद्रुमोत्सवाला सोडून बाकीचे उत्सव करण्याला हरकत नाहीं

१४–१८ पौषादि सहा महिन्यामध्यें अर्थात् पौषापासून ज्येष्ठमहिन्यापर्यंत पुष्य, मघा, उत्तरा, चित्रा राधा व मूला या नक्षत्रावर हे उत्सव करावेत या नक्षत्रांना तीर्थभ असें म्हणतात. या नक्षत्राच्या दिवशीं तीर्थ नांवाची अवभृथ क्रिया करावी. तीर्थदिवसाच्या पूर्वी नवव्या, आठराव्या अथवा एकविसाव्या दिवशीं

एकविंशेऽन्हि वा कुर्याद्ध्वजारोहणसंविधिम् ॥
ध्वजारोहदिनात्पूर्वे पंचमेऽन्हि ध्वजांकुरम् ॥ १६ ॥
तीर्थांकुरं तीर्थदिनान्नवमे दिवसे चरेत् ॥
तद्दिने चेद्ध्वजारोहो न प्राक्कुर्याद्ध्वजांकुरम् ॥ १७ ॥
तद्रात्रौ वा चरेत्प्राज्यदीपैश्चत्वरशोधनम् ॥
तद्रात्रावेव कुर्वीत भेरीताडनसंविधिम् ॥ १८ ॥
द्वात्रिंशत्करमुख्याष्टशतांतायामविस्तृतीन् ॥
जघन्यमध्यमोत्कृष्टमंडपान्प्राहुरुत्सवे ॥ १९ ॥
तन्मध्ये वेदिकां तत्तन्नवभागसमायतीम् ॥
आयामसमविस्तारां तत्षडंशसमुच्छ्रिताम् ॥ २० ॥
चतुर्दिग्गतसोपानां चतुष्कोणां त्रिमेखलाम् ॥
वेदीं निर्वृत्तिविधिना चारु निर्वर्तयेत्सुधीः ॥ २१ ॥

ध्वजारोहण विधि करावा. तीर्थदिवसाच्या पूर्वी नवव्या दिवशीं तीर्थांकुर विधि करावा. नवव्या दिवशीं ध्वजारोहणविधि करावयाचा असेल तर त्याच्यापूर्वी ध्वजांकुर विधि करू नये. ध्वजारोहाच्या रात्रीं उत्कृष्ट दीपांनीं अंगणशोधन व त्याच रात्रीं भेरीताडनविधि करावा.

१९–२१ या उत्सवाच्या वेळीं ३२ हातापासून १०८ हातापर्यंत लांब रुंद असे जघन्य, मध्य व उत्कृष्ट

तेषामन्यतमं स्नानमंडपं प्रकृतोचितम् ॥
निर्माप्य विधिनाचार्यः प्रतिष्ठाय विभूषयेत ॥ २२ ॥
धामाग्रनिर्मितादस्मान्महास्नपनमंडपात ॥
पुरस्तादुचितायामविस्तारं नृत्यमंडपम् ॥ २३ ॥
तोरणध्वजसत्पुष्पदर्भमालावितानकैः ॥
यवारकविरूढाद्यैर्भूषयेद्यागमंडपम् ॥ २४ ॥
अश्वत्थोदुंबरप्लक्षन्यग्रोधमयतोरणैः ॥
मंडपानां तु पूर्वादिद्वाराणि परिभूषयेत ॥ २५ ॥
चतुष्कं चंद्रयानं च नासिका पुष्परंगकम् ॥

असे मंडप करावेत. अर्थात् आपल्या शक्तीप्रमाणें लहान किंवा मोठा मंडप करावा त्या मंडपामध्यें जी वेदी करावयाची ती मंडपाच्या नवव्या भागाच्या प्रमाणाची असावी. लांबी रुंदी समान असावी. त्या मानानें उंची असावी. अर्थात् वेदीची उंची लांबी व रुंदी यांच्या साहाव्या भागा एवढी असावी. चारी दिशेला पायऱ्या असाव्यात अशी वेदीची रचना करावी. त्या तीन मंडपांपैकीं एक स्नान मंडप निर्माण करावा व त्याची प्रतिष्ठा करून तो सुशोभित करावा.

२३ जिनमंदिराच्या पुढील स्नानमंडपाच्या पुढें योग्य लांबी रुंदीचा नृत्यमंडप असावा तो तोरण, ध्वज, पुष्पमाला, दर्भमाला, चांदवा यांनीं सुशोभित करावा.

२४ यागमंडपाला विरूढक व यवारकांनीं शोभित करावें.

२५ या मंडपांचीं पूर्वादि दिशांचीं द्वारें पिंपळ, उंबर, पिंपरी व वड यांच्या पानांच्या तोरणांनीं शोभवावीत.

पुष्पयानं गजरथो सिंहयानमितिक्रमात् ॥ २६ ॥
अष्टौ यानानि चैत्याने विहारे त्रिजगत्प्रभोः ॥
रथो दिवैव शेषं तु दिवा निशि च योज्यताम् ॥ २७ ॥
नवमेऽन्हि ध्वजारोहं उद्दिश्याद्य यथाक्रमम् ॥
प्रत्यहं च विधेयानां कर्मणा क्रम उच्यते ॥ २८ ॥
दशम दिवसे तीर्थादिंद्रो यष्ट्रा पुरस्कृतः ॥
यज्ञदीक्षा समासाद्य केतुदंडादि सज्जयेत् ॥ २९ ॥
यष्टा देशांतरात्संघमानयेल्लेखनादिभिः ॥
प्रत्युद्गमेन चायातमाद्रियेत यथोचितम् ॥ ३० ॥
नवमे दिवसे प्रातराचार्येण प्रयत्नतः ॥
स्नानादिसिद्धभक्त्यतः कार्यः पूजामुखक्रमः ॥ ३१ ॥

२६ चतुष्क, चंद्रयान, नामिका, पुष्परंगक, पुष्पयान, गजरथ व सिंहयान हीं वाहनें आहेत. या वाहनांतून जिनाचा विहार करवावा. रथयात्रा दिवसाच काढावी, व बाकीच्या वाहनांतून जिनाचा विहार दिवसा व रात्रीं करवावा.

२७-३१ नवव्या दिवशीं ध्वजारोहणविधि करावा लागतो म्हणून त्याला उद्देशून दररोज कोणत्या क्रिया कराव्या लागतात त्यांचा क्रम आम्ही सांगतो. तीर्थाक्रापासून दहाव्या दिवशीं यजमानासहित इंद्रानें यज्ञदीक्षा घ्यावी. व ध्वजदंड वगैरे सज्ज करावा. यजमानानें इतर प्रांतांतील संघाला पत्रलेखन वगैरे उपा-

जिनामरमहर्षीणामिष्टिः स्वस्त्ययनं ततः

आत्मालंकरणं कृत्यसंकल्पः कुसुमांजलिः ॥ ३२ ॥

भूमिसंशोधनं दर्भन्यासो भूम्यर्चनं ततः ॥

मंडपस्य प्रतिष्ठातो वेदिकायाः प्रतिष्ठितिः ॥ ३३ ॥

चूर्णन्यासोप्यथ बृहद्यागमंडलवर्तनम् ॥

सम्यगाराधनं तस्य व्यासतो वा समासतः ॥ ३४ ॥

जलहोमोऽग्निहोमश्च ग्रहाणां सुप्रसत्तये ॥

ऐशान्यां दिशि तद्वेद्यामनावृतसमर्चनम् ॥ ३५ ॥

मंगलायुधसत्केतुकुंभाष्टकनिवेशनम् ॥

---

यांनीं आणावें. आलेल्यांच्या सामोरे जाऊन त्यांचा योग्य सत्कार करावा. नवव्या दिवशीं प्रातःकालीं प्रतिष्ठाचार्यानें स्नानापासून सिद्धभक्ति पर्यंत पूजेच्या प्रारंभाचा क्रम करावा. जिनपूजा, सिद्धपूजा व महर्षिपूजा हे विधि करून नंतर स्वस्त्ययन विधि करावा.

३२–३१ स्वतः अलंकार घालून जें कृत्य करावयाचें असेल त्याचा संकल्प करून पुष्पांजलि अर्पण करावी. मग भूमिशोधनविधि, दर्भन्यासविधि हे करून भूमिपूजन करावें. या विधिनंतर मंडपाची प्रतिष्ठा करून वेदीची प्रतिष्ठा करावी.

३४ अनेक रंगाच्या चूर्णांनीं यागमंडलाचें यंत्र काढून त्याचें संक्षेपानें अथवा विस्तारानें पूजन करावें.

३५ ग्रहांच्या प्रसन्नतेकरितां जलहोम व अग्निहोम करावा. व ईशान्य दिशेंत अनावृत यक्षाचें पूजन करावें.

३६ मंगल पदार्थ, वज्र, चक्रादि आठ आयुधें, पताका, आठकुंभ, दर्भ, पांढऱ्या मोहऱ्या या पदार्थांनीं

वेदीविभूषणं बाणासिद्धार्थकयवारकैः ॥ ३६ ॥
धूपकुंभाष्टकन्यासो वेदिकायाः समंततः ॥
शांतिमंत्रं च जपतामष्टादिक्षु नियोजनम् ॥ ३७ ॥
धामाभिमुखतो यक्षपटस्य परिलंबनम् ॥
तदग्रे मंगलामत्रगंधादिप्रतिवेशनम् ॥ ३८ ॥
स्थापनं नवकुंभानां प्रोक्षणं तद्घटांबुभिः ॥
प्रातिबिंबितयक्षस्य दर्पणेऽभिमुखस्थिते ॥ ३९ ॥
गंधलेपो यवानिकानेत्रोन्मीलनमर्चनम् ॥
जिनधामबलिः केतुबलिर्वास्तुबलिस्ततः ॥ ४० ॥
क्रमादेतानि कर्माणि कुर्यादिंद्रो विचक्षणः ॥

वेदीला शोभा आणावी. वेदीच्या सभोवती आठ धूपकुंभ स्थापन करावे व शांति मंत्रांचा जप करणाऱ्यांची आठ दिशेला स्थापना करावी जिनमंदिराच्या समोर यक्षाच्या आकृतीचा पट बांधावा व त्याच्या पुढें मंगल पात्रांत गंधादि द्रव्यें ठेवावीत.

३९-४१ नउ कुंभ स्थापून त्यांच्यांतील पाण्यानें दर्पणामध्यें प्रतिबिंबित झालेल्या यक्षाचा प्रोक्षण विधि करावा. या नंतर गंधलेपन, नेत्रोन्मीलन, पूजन, जिनधामबलि, ध्वजबलि, वास्तुबलि हे विधि क्रमानें निपुण अशा इंद्रानें करावेत. त्या वेदीजवळ नियुक्त अशा प्रतींद्राकडून शांतिमंत्राच्या द्वारें जप व होम हे विधि करावेत.

शांतिमंत्रैर्जपं होमं कारयेत्तत्र योजितैः ॥ ४१ ॥
तस्मिन्नेव दिने यष्टा प्रातरेव प्रयत्नतः ॥
भूषयेदष्टशोभाभिर्वीथीं वीथीं समंततः ॥ ४२ ॥
मार्जनं तोरणं रंगवलिः पुष्पबलिर्ध्वजम् ॥
गीतं नृत्यं च वाद्यं चेत्यष्टौ शोभाः प्रकीर्तिताः ॥ ४३ ॥
विहारबेरं विन्यस्य नृत्यमंडपविष्टरे ॥
एकादशविधाभ्यर्च्य तांबूलैर्भव्यतर्पणम् ॥ ४४ ॥
विहारघोषणा पश्चादानंदस्तवपूर्वकम् ॥
तद्बिंबस्थापनं चारु श्रीविहारचतुष्कके ॥ ४५ ॥
तच्चतुष्कं दृढं धृत्वा याति वाहकसंचये ॥

४२ त्याच दिवशीं प्रातःकाळीं यजमानानें रस्ते स्वच्छ करवावेत व तेथें जागोजागीं तोरण, रंगावलि, पुष्पबलि, गीत, नृत्य, वाद्यें वगैरेंनीं, अशा आठ शोभा कराव्यात

४४ नृत्यमंडपामध्यें सिंहासनावर जिनप्रतिमा स्थापून तिच अकरा प्रकारांनीं पूजन करावें व तांबूलांनीं भव्यांचा आदरसत्कार करावा.

४५ विहाराची घोषणा करून जिनेश्वराची आनंदस्तुति करावी. चतुष्क नांवाच्या वाहनावर जिनबिंब स्थापित करून तें चतुष्क लोकांनी वाहून न्यावें

४६–५१ या जिनबिंबाचा विहारविधि करीत असतांना नगरांतून प्रत्येक घरांतून भव्यांनीं जिनाची पूजा करावी. हा विहारविधि संहिता शास्त्रांत सांगितलेल्या विधीप्रमाणें करावा. तो याप्रमाणें:—जिनेश्वराचा विहार

तदग्रे दूरतो याति ध्वजदेवाभिमुख्यतः ॥ ४६ ॥
देवं विहारयेत्पुर्यां प्रतिसद्मार्पितार्चनम् ॥
विहारविधिना जैनसंहितोक्तेन तद्यथा ॥ ४७ ॥
तस्मिन्नेव दिने पूर्वं पूर्वाण्हे ति विभूतिमत् ॥
विहारयेद्विशिष्टर्द्धि विश्वभूतविभूतये ॥ ४८ ॥
नवीकृतेषु गेहेषु सर्वेपूद्बद्धकेतुषु ॥
द्वारेष्वलंकृतेपूच्चैः पूगपूर्णघटादिभिः ॥ ४९ ॥
रथ्यासु मार्जितास्वाद्भिः सिक्तासूद्रेत्रदर्शकैः ॥
असंस्पृश्यजने दूरं सार्यमाणे सहुंकृतम् ॥ ५० ॥
केतनानां शते याति पुरतश्चित्तहारिणि ॥
वाताहताच्चलद्धामःसमुन्मृष्टनभोंगणे ॥ ५१ ॥
सहस्रारस्फुरद्धर्मचक्रे यात्यनुकेतनम् ॥

---

त्याच दिवशीं प्रातःकाळीं मोठ्या थाटानें करावा. सर्वांनीं आपलीं घरें स्वच्छ करावीत, गुढ्या तोरणें बांधावीत. दरवाजाजवळ जलपूर्ण कुंभ स्थापावेत. रस्ते स्वच्छ करावेत. त्यावर सडा घालावा. ज्यांनीं हातांत वेत घेतला आहे अशा लोकांनीं ( चोपदारांनीं ) अस्पृश्य लोकांना बाजूला होण्यास सांगावें. शेकडो मनोहर पताका मिरवणुकींत पुढें असाव्यात.

५२–५५पश्चात् आपल्या डोक्यावर धारण केलेल्या धर्मचक्राची मिरवणुक ही पताकांच्या मागून कान

यक्षेण संधृते मूर्ध्नी ब्रध्नबिंबानुकारिणि ॥ ५२ ॥
दुंदुभिध्वनिते कुर्वत्यनुचक्रं विजृंभणम् ॥
पूरयित्वा नभोऽशेषं क्षुभ्यदब्धिस्वनोपमे ॥ ५३ ॥
जयकोलाहलं भर्तुरग्रे भव्यमहार्णवे ॥
कुर्वाण व्योमनिःशेषमारुध्य प्रमदोदयात् ॥ ५४ ॥
पठत्सु मंगलं पश्चान्मधुरं भव्यबंधुषु ॥
नांदीतूर्यरवे पश्चाच्छात्रानंदं प्रतन्वति ॥ ५५ ॥
गायंतीषु सुकंठीषु गानविज्ञानचंचुषु ॥
स्ववत्सुरवं विहृद्यं च श्रीविहारमहोत्सवम् ॥ ५६ ॥
आतन्वतीषु तन्वीषु सविलासं विनर्तनम् ॥
आसन्नमप्रताश्चित्रैरंगहारादिभिर्विभोः ॥ ५७ ॥
व्राते चित्रातपत्राणां भूषितैरुच्छ्रितर्जैनैः ॥
निरुंधति प्रभाजालं निखिलं तिग्मदीधितेः ॥ ५८ ॥

---

ढावी. या चक्राच्या मागें अनेकनन्देच्या वाद्याच्या ध्वनीन आकाश दुमदुमून सोडावें. भव्यांनीं जय जय शब्द करीत चालत जावें. कांहीं भव्यांनी मागून मंगलगाणीं गात जावे.

५६-५९ भगवंताच्या विहारविषयावर रचलेली गाणीं गात गत स्त्रियांनीं ही गमन करावें. भक्तीनें स्त्रियांनीं हाव भावासहित नृत्य करावें. प्रभूवर पांढरें सुशोभित असें छत्र धारण करावें. व सुंदर अशा चवऱ्या

दंडस्य परितो द्वारद्वयदारुवृतेर्विधिः ॥
व्येकपंचाशता कुंभैः स्नपनं त्रिजगत्प्रभोः ॥ ७१ ॥
प्रथमाद्यनुयोगानां संपाठः पुरतः प्रभोः ॥
चैत्यपंचगुरुशांतिभक्तिभिः ससमाधिभिः ॥ ७२ ॥
स्तवनं सर्वसंघेन विभोर्नानाम्तवैरपि ॥
देवस्य मंडपस्थानां देवानां च विसर्जनम् ॥ ७३ ॥
आहाराभयभैषज्यशास्त्रदानानि सादरम् ॥
चतुःसंघस्य चातीर्थोत्कर्तव्यानि विशेषतः ॥ ७४ ॥
वंदिवृंदारकादीनामिष्टदानं स्वशक्तितः ॥
नित्यमातीर्थदिवसात्कार्यं कर्त्रा विशेषतः ॥ ७५ ॥
तस्मिन्नहनि सायान्हे त्वंकुरार्पणमंडपे ॥
यक्षेश्वरादिदेवानां स्वस्वस्थानेऽधिवासनम् ॥ ७६ ॥

कट्टा मजबूत करावा. बाकीच्या दंडावर शुद्ध स्नानारोपण करावें. त्यानंतर एकावन कुंभांनीं जिनप्रतिमाभिषेक करावा. प्रथमानुयोग वगैरे अनुयोगाचा पाठ करून चैत्यभक्ति, पंचगुरुभक्ति, शांतिभक्ति व समाधिभक्ति म्हणून सर्व संघासह जिनस्तुति करून जिनाचें व सर्व मंडपांतील देवांचें विसर्जन करावें. चार संघाला प्रेमानें चार दानें द्यावीं. हा प्रकार तीर्थविधि होईपर्यंत विशेषरीतीनें करावा.

तीर्थविधीच्या दिवशीं संध्याकाळीं अंकुरार्पण मंडपामध्यें यक्षादिकांचा अधिवासनविधि करावा. याटानें

मृत्तिकासंग्रहो भूत्या बीजारोपो यथाविधि ॥
उत्करेण प्रदीपानां चत्वरीपरिशोधनम् ॥ ७७ ॥
तद्रात्रौ पूर्ववत्पूजामुखं यंत्रसमर्चनम् ॥
जिनधामबलिः पश्चाच्छ्रीबलिध्वजपूजनम् ॥ ७८ ॥
ध्वजभूम्यापलेपश्च धामाभिमुखवार्तिनः ॥
यक्षबिंबस्य च छत्रत्रयस्य परिपूजनम ॥ ७९ ॥
आतीर्थात्स्वस्वपीठेषु दिक्पालादिनिवेशनम् ॥
ध्वजदंडाभिषेकश्च पूजनं तद्ध्वजाद्बहिः ॥ ८० ॥
द्रोणद्वयमितव्रीहिप्रस्तरे सकुशाक्षते ॥
विन्यस्तभेरीशंखादेर्भुम्यर्चाविधिनार्चनम् ॥ ८१ ॥
स्नानेनालंकृतेन त्रिर्जिनधाम परीतिना ॥

---

मृत्तिकासंग्रह करून यथाविधि बीज पेरावेत. रात्रीं दिवे लाऊन अगणांत शोभा करावी. रात्रीं पूजामुख करून यंत्रपूजा करावी. जिनधामबली नंतर श्रीबलि व ध्वजपूजा करावी ध्वजभूमी स्वच्छ करून यक्षबिंबाची व छत्रत्रयाची पूजा करावी तीर्थसमाप्ति होईपर्यंत आपआपल्या पीठावर दिक्पालादिकांची स्थापना करावी ध्वजदंडाचा अभिषेक व पूजन करून दोन द्रोण प्रमाणाच्या दर्भासहित अक्षतावर भेरी शंख वगैरे पदार्थ ठेऊन त्याची भूमीप्रमाणें पूजा करावी. स्नान करून जिनमंदिरास तीन प्रदक्षिणा देऊन व जिनाच्या चरणांना नमस्कार करून वाद्यें वाजविणाऱ्यानें पुष्पांजलिक्षेपण करून भेरी, शंख वगैरे वाद्यें वाजवावीत

८२–८८ स्नानालंकृत होऊन व जिनमंदिरास तीन प्रदक्षिणा करून जिनेश्वरास नमस्कार करावा. पुष्पां

नमता जिनपादाब्जं किरता कुसुमांजलिम् ॥ ८२ ॥
धामाभिमुख्यं भेर्यादिताडनं ताडकेन वै ॥
जपादिमंत्रमुद्घोष्य याजके कुसुमांजलिम् ॥ ८३ ॥
उत्किरत्यमुना भेरीताडनं च पुनः पुनः ॥
ब्रह्मतालस्य दिक्पालतालानामपि ताडनम् ॥ ८४ ॥
यक्षच्छत्रत्रयाभ्यां वै गत्वा वास्तुबलिस्ततः ॥
विहारः पूर्ववत्पंचविंशत्या स्नपन घटैः ॥ ८५ ॥
विभोः प्रभुतचरुणा पूजा संगीतकेन च ॥
प्रारंभः शांतिहोमस्य शांतिमंत्रजपस्य च ॥ ८६ ॥
शांतिमंत्रजपो नित्यं शांतिहोमोऽर्धरात्रके ॥
प्रभातेऽपि च पुष्ट्यर्थो होमः कैश्चिद्विधीयते ॥ ८७ ॥
चतुर्भुक्तिक्रियाशांतिमंत्रैर्होमो जपस्तथा ॥

जलि समर्पण करून जिनमंदिरासमोर नगारा वगैरे वाद्यें वाजवावीत. याजकानें जपादि मंत्राचा घोष करून पुष्पांजलि अर्पण करावी. ब्रह्मताल, दिक्पालताल या तालांचें वादन करावें. यक्ष व छत्रत्रयासह विहार करून वास्तुबलि हा विधि करावा. नंतर प्रभूंचा पंचवीस कलशांनीं अभिषेक करून पुष्कळ नैवेद्यानीं पूजा करावी. स्तुति म्हणावी. शांतिहोमाला प्रारंभ करून नित्य शांतिमंत्राचा जप करावा. शांतिहोम हा, अर्धरात्रीं व प्रातः

दानं चतुर्विधं कार्यं नित्यमातीर्थवासरात् ॥ ८८ ॥
द्वितीयेन्हि ध्वजारोपात्पूर्वं पूजामुखक्रमः ॥
यागमंडलपूजा च जिनधामबलिस्तथा ॥ ८९ ॥
ध्वजदेवबलिः पश्चाद्ग्रामवास्तुबलिस्तथा ॥
देवपादार्चितैर्गंधताम्बूलैर्भव्यतर्पणम् ॥ ९० ॥
चंद्रमंडलयानेन विहारस्त्रिजगत्प्रभोः ॥
एकाशीतिघटैर्देवस्नपनं पूर्ववत्स्तुतिः ॥ ९१ ॥
तद्रात्रौ च तथा किंतु कलशैरष्टसंख्यकैः ॥
स्नापनं प्राज्यचरुणा पूजा संगीतकेन च ॥ ९२ ॥

---

काळीं ही पुष्टयर्थ कित्येक करीत असतात. तीर्थदिवसापर्यंत चार भक्तींच्या क्रिया, शांतिमंत्र, होम, जप व चार प्रकारचीं दानें देणें हे विधि करावेत

८९–९२ दुसऱ्या दिवशी ध्वजारोपण करण्याच्या पूर्वी पूजामुखाचा क्रम उरकून घ्यावा. नंतर याग-मंडलपूजन व जिनधामबलि हे विधि करावेत. नंतर ध्वजदेवबलि, ग्रामबलि, वास्तुबलि करून जिनेश्वराच्या पायांची पूजा ज्यांच्या द्वारे केलीं अशा गंध, तांबूलांनीं भव्यलोकांचा आदर करावा. यानंतर चंद्रमंडल नांवाच्या वाहनावर प्रभूला स्थापन करून विहार करवावा. ८१ कलशांनीं प्रभूचा अभिषेक करावा. व स्तुति करावी. याचप्रमाणें रात्रींही करावें. परंतु रात्रीं आठ कलशांनीं अभिषेक करावा. उत्कृष्ट नैवेद्य अर्पण करून संगीतस्तुति करावी.

तृतीयेऽन्हि ततो वास्तुबल्यंता विधयः क्रमात् ॥
याजकेन विधातव्याः पूर्वोक्तविधिना ततः ॥ १३ ॥
गंधतांवूलसत्पुष्पैर्भव्यतोषणमर्चितैः ॥
नृत्यमंडपपीठस्थविभोरभ्यर्चनं ततः ॥ १४ ॥
नासिकाचंधयानेन विहारो विश्वत्रेदिनः ॥
घटैरष्टशतेनाथ स्नपनं पूर्ववत्स्तुतिः ॥ १५ ॥
तद्रात्रौ च तथा किं तु कलशैरष्टमंख्यकैः ॥
स्नपनं प्राज्यचरुणा पूजा संगीतकेन च ॥ १६ ॥
चतुर्थेऽन्हि ततो वास्तुवल्यंता विधयः क्रमात ॥
याजकेन विधातव्याः पूर्वोक्तविधिना ततः ॥ १७ ॥
प्रभूतैर्गंधतांवूलैः सत्पुष्पैः सुरसैः फलैः ॥
जिनपादार्चितैः सर्वभव्यलोकप्रतर्पणम् ॥ १८ ॥

१३-१८ याजकानें तिसऱ्या दिवशीं पूर्वोक्त विधिप्रमाणें वास्तुबलिपर्यंत क्रिया कराव्यात व पूजिलेल्या गंध, तांबूल व फुलांनीं भव्यांचा आदर करावा. नृत्यमंडपातील पीठावर असलेल्या जिनप्रतिमेची पूजा करून नासिकाबध या वाहनावर जिनाची स्थापना करून विहार करावा नतर १०८ कलशांनीं स्नपन करून स्तुति करावी. त्याच दिवसाच्या रात्रीं याच प्रमाणें आठ कलशांनीं अभिषेक करून पुष्कळ नैवेद्यानें पूजा करावी; स्तुति, संगीत वगैरे करावें.

पुष्परंगाख्ययानेन विहारो विश्वदृश्वनः ॥
द्व्यष्टाद्विशतकुंभैश्च स्नपनं पूर्ववत्स्तुतिः ॥ ९९ ॥
तद्रात्रौ च तथा किं तु कलशैरष्टसंख्यकैः
स्नपनं प्राज्यचरुणा पूजा संगीतकेन च ॥ १०० ॥
पंचमेऽन्हि ततो वास्तुबल्यंता विधयः क्रमात् ॥
याजकेन विधातव्याः पूर्वोक्तविधिना ततः ॥ १०१
अस्मिन्नेव दिने प्राण्हे स्थापिते मंडले कृते ॥
प्रक्षिप्योलूखले श्वेततंडुलैश्चगेयेन्निशाः ॥ १०२ ॥
ततश्चायेत चूर्णैस्तैश्चूर्णिताशेषकल्मषम् ॥
गेयवाद्यरवे व्योम पूरयत्यंघ्रिविष्टरे ॥ १०३ ॥
ततश्चूर्णं तदादाय भव्यौघं परितर्पयेत ॥
जिनेंद्रश्रीपदांभोजस्पर्शमात्रेण पावनम् ॥ १०४ ॥

९९–१०४ चौथ्या दिवशीं तिसऱ्या दिवसा प्रमाणें विधि करावा. व जिनपादपूजित अशा पुष्कळ गंध, तांबूल, पुष्पें, व सुरस फळें यांनीं भव्यांचा आदर करावा. पुष्परग नांवाच्या वाहनावरून प्रभूचा विहार करऊन २१६ कुंभांनीं अभिषेक व स्तुति करावी. रात्रीं याच प्रमाणें आठ कलशांनीं अभिषेक करून पुष्कळ नैवेद्यानें पूजा करावी व संगीत गान करावें. पांचव्या दिवशीं चौथ्या दिवसाप्रमाणें विधि करावा. याच दिवशीं मंडलस्थापना करून उखळामध्यें तांदळासह हळदीचें चूर्ण करावें या चूर्णानीं सर्वपापांचें चूर्ण करणाऱ्या जिनाचें पूजन करावें. तें चूर्ण जिनचरणाच्या स्पर्शानें पवित्र झालेलें आहे असें समजून भव्यांनीं स्वतःच्या कपाळ, गळा, बाहु वगैरे ठिकाणीं

ललाटादौ प्रकुर्युस्तच्चूर्णं भव्याः प्रशांतये ॥
ततश्च पुष्पयानेन पुरि देवं विहारयेत ॥ १०५ ॥
अष्टात्रिंशतकुंभैस्तं स्नपनं पूर्ववत्स्तुतिः ॥
तद्रात्रौ च तथा किं तु कलशैरष्टसंख्यकैः ॥
स्नपनं प्राज्यचरुणा पूजा संगीतकेन च ॥ १०६ ॥
षष्ठेऽहनि ततो वास्तुबल्यन्ता विधयः क्रमात ॥
याजकेन विधातव्याः पूर्वोक्तविधिना ततः ॥ १०७ ॥
उचितायामविष्कंभागाधे क्रीडासरोवरे ॥
सुधालिप्ते ससोपाने धामोद्देशविनिर्मिते ॥ १०८ ॥
उपरिष्टान्महामानकायमानविभूषिते ॥
वितानध्वजमाल्यादिनानामंडनमंडिते ॥ १०९ ॥

शांतिस्तव लावावें. तदनंतर पुष्पयानावर प्रभूचा विहार करवावा.

१०५–११५ तीनशे आठ कुंभांनीं जिनाभिषेक करून पूर्वी प्रमाणें स्तुति करावी. त्या रात्रीं आठ कलशांनीं अभिषेक करून पुष्कळ नैवेद्यानें संगीता सह पूजा करावी. सहाव्या दिवशीं याजकानें पूर्वोक्त विधीनें वास्तुबलि पर्यंत सर्व क्रिया कराव्यात तदनंतर योग्य लांबी रुंदी व खोलीच्या क्रीडासरोवरावर जिनाभिषेक करावा. सरोवराच्या पायऱ्या चुन्यानें सारवलेल्या असाव्यात ध्वजादिकांनीं त्याला शोभा आणावी. त्या सरोवराच्या पश्चिम तटावर श्री जिनाची सिंहासनावर स्थापना करावी. व प्रत्येक दिशेला १ अशा आठ दिशांतील सुवर्णकुंभांनीं श्रीजिनाचा अभिषेक व पूजा करावी. अभिषेकाचें पाणी सुगंधित असावें. त्या गंधोदकाच्या संयोगानें पवित्र झालेलें तें

काश्मीरागरुकर्पूरगंधद्रव्यविमिश्रितैः ॥
सौरभाकृष्टभृंगौघैः पूरितैस्तीर्थवारिभिः ॥ ११० ॥
स्वपश्चिमतटन्यस्तपीठस्थं स्नातकं जिनम् ॥
तीर्थार्णःपूर्णसौवर्णकुंभैरस्याष्टदिग्गतैः ॥ १११ ॥
प्रतिदिङ्नवसंख्यानैः संस्नाप्य च समर्च्य च ॥
तद्गंधोदकसंयोगपूतं क्रीडासरोजलम् ॥ ११२ ॥
अनन्यहार्यदुष्कर्मकर्दमक्षालनक्षमम् ॥
वहंतु भव्याः सर्वेऽपि स्वस्वमूर्धनि सादरम् ॥ ११३ ॥
ततो विहारयेद्देवं गजयानेन भूतितः ॥
सद्द्वात्रिंशच्चतुःशत्या घटैः संस्नाप्य संस्तुयात् ॥११४॥
तद्रात्रौ च तथा किं तु कलशैरष्टसंख्यकैः ॥
स्नपनं प्राज्यचरुणा पूजा संगीतकेन च ॥ ११५ ॥
सप्तमेऽन्हि ततो वास्तुबल्यंता विधयः क्रमात् ॥

---

क्रीडासरोवरांचें पाणी पापरूपी चिखलाचा नाश करणार आहे असें समजून मस्तकावर आदरानें धारण करावें तदनंतर मोठ्या थाटानें हत्तीवरून श्री जिनाची मिरवणूक काढावी. ४३२ घटांनीं अभिषेक करून स्तुति करावी. याच प्रमाणें रात्रीं आठ कलशांनीं अभिषेक करावा व पुष्कळ नैवेद्यांनीं संगीतासह पूजा करावी.

११६ सातवे दिवशीं याजकानें पूर्वोक्तविधीनें वास्तुबलि पर्यंत क्रिया विधि करावा.

याजकेन विधातव्याः पूर्वोक्तविधिना ततः ॥ ११६ ॥
तांबूलगंधपुष्पाद्यैरर्चितैर्भव्यतर्पणम् ॥
नानापानकसत्रौघैः सर्वलोकप्रतोषणम् ॥ ११७ ॥
कलशध्वजमाल्यादिभूषितस्य रथस्य च ॥
संप्रोक्षणं चतुर्दिक्स्थनवकुंभाम्बुसेचनैः ॥ ११८ ॥
होमस्तस्य चतुर्दिक्स्थदर्भत्रिघनमुष्टिभिः ॥
तद्दशाशासु दिक्पालपूजनं च रथार्घ्यकम् ॥ ११९ ॥
विहारघोषणानंदस्तुतिपूर्वरथाग्रके ॥
शिबिकानीतजैनार्चास्थापनं तत्समर्चनम् ॥ १२० ॥
परितोऽर्हत्प्रभोरष्टप्रातिहार्यैरलंकृतिः ॥
शांतिररिष्टनेमेश्च परविद्याच्छिदेस्तथा ॥ १२१ ॥
रथशीघ्रोच्चालनस्य मंत्रान्संजपता क्रमात् ॥

---

११७–१२१ जिनपूजित तांबूल, गंध पुष्प वगैरेंनीं भव्यांना खुष करावें व उत्तम पिण्याच्या पदार्थांनीं व अन्नांनीं सर्व लोकांना संतुष्ट करावें. कलश, ध्वज माळा यांनीं रथ सुशोभित करावा. व चारी दिशांतील नऊ कुंभांतील जलांनीं चांगला स्वच्छ करावा रथाच्या चारी दिशेला होम करावा व २७ मुठींनीं दर्भांच्या आहुती त्यांत याव्यात. रथाच्या दाही दिशेला दिक्पालपूजन करून रथाला अर्घ्य द्यावा. विहार घोषणा करून स्तुतिपूर्वक रथाच्या अग्रभागीं पालखींतून आणिलेल्या प्रतिमेची स्थापना करावी व तिचें पूजन करावें.

शांतिमंत्रः प्रागेवोक्तः ॥ ओं णमो भगवदो अरिट्ठणेमिस्स अरिट्ठेण बंधेण बंधामि रक्खसाणं, भुयाणं, खेयराणं, चोराणं, डायिणीणं, सायिणीणं, महोरगाणं, वग्घाणं, अण्णे च के वि दुट्ठा संभवंति तेसिं सव्वाणं मणं मुह कोहं दिट्ठिं गइं बंधाभि घणु वण महाघणु २ स्वाहा । ओं श्रीं ऱ्हीं ह्रैं कलिकुंडदंडस्वामिन् अतुलबलवीर्यपराक्रम स्फ्रां स्फ्रीं स्फ्रूं स्फ्रें स्फ्रौं स्फ्रः आत्मविद्यां रक्ष २ परविद्यां छिंद २ ह्रूं फट् स्वः ॥ परविद्याच्छेदनमंत्रः ॥

यथा कोटिशिला पूर्वं चालिता सर्वविष्णुभिः ॥

चालयामि तार्थत्तिष्ठ शीघ्रं चल महारथ ॥ रथशीघ्रोच्चालनमंत्रः ॥ स्थापनांते चतुर्दिक्षु वादकादेर्निवेशनम् ॥ १२३ ॥

ततो रथेन यानेन विहारास्त्रिजगत्प्रभोः ॥
सचतुःपंचशत्याभिषेकः कुंभैस्ततः स्तुतिः ॥ १२४ ॥
तद्रात्रौ च तथा किं तु कलशैरष्टसंख्यकैः ॥

---

प्रतिमेच्या सभोवती आठ प्रातिहार्यांनीं शोभा आणावी. तदनंतर शांतिमंत्र, अरिष्टनेमिमंत्र, परविद्या छेदन मंत्र व रथ शीघ्र चालण्याचा मंत्र या मंत्रांचा जप करावा. जशी कोटिशिला पूर्वीच्या ९ नारायणांनीं चालविली होती अर्थात् उचलली होती. या प्रमाणें हे रथा मी तुला चालवितो. तूं चाल. अशा अभिप्रायाचा मंत्र म्हणावा. रथाच्या चारी दिशेला वाजंत्रवाल्यांची योजना करावी.

१२४-१३१ तदनंतर रथांतून त्रैलोक्यनाथाचा विहार करून ५०४ कुंभांनीं अभिषेक करावा व स्तुति करावी. त्या दिवशीं रात्रीं आठ कलशांनीं अभिषेक करून पुष्कळ नैवेद्यांनीं संगीतासह पूजा करावी

स्नपनं प्राज्यचरुणा पूजा संगीतकेन च ॥ १२५ ॥
अष्टमेऽन्हि ततो वास्तुबल्यंता विधयः क्रमात् ॥
याजकेन विधातव्याः पूर्वोक्तविधिना ततः ॥ १२६ ॥
ततः सिंहकयानेन जलयात्रा विभोस्ततः ॥
घटैरष्टसहस्रेण महाभिषवणोत्सवः ॥ १२७ ॥
विभोः प्रभूतचरुणा पूजा संगीतकेन च ॥
तस्मिन्नेव दिने रात्रौ कुर्यात्कौतुकबंधनम् ॥ १२८ ॥
मंडपे मंडिते मध्ये समभ्यर्चितविष्टरे ॥
संस्थाप्य प्राङ्मुखं यक्षं छत्राणां च त्रयं यजेत् ॥ १२९ ॥
ततः सौवर्णतालस्य बध्नीयाद्दक्षिणे करे ॥
दंडे च रजनीसूत्रं याति तूर्यरवे दिशः ॥ १३० ॥
नवमेऽन्हि ततो वास्तुबल्यंता विधयः क्रमात् ॥

---

आठव्या दिवशीं याजकानें पूर्वोक्त विधीनें वास्तुबलीपर्यंत विधि करावा. या नंतर सिंहक नांवाच्या वहनावरून विभूची जलयात्रा काढावी. १००८ कलशांनीं अभिषेकोत्सवविधि करून प्रभूची पुष्कळ नैवेद्यांनीं संगीतासह पूजा करावी. या दिवशीं रात्रीं कौतुकबंधन विधि करावा. सुशोभित अशा मंडपामध्यें पूजित अशा सिंहासनावर पूर्वेकडे तोंड करून यक्ष व छत्रत्रय यांची स्थापना करावी. व त्यांची पूजा करावी तदनंतर सुवर्णतालाच्या उजव्या हातांत व दंडामध्यें हळदीनें रंगविलेलें सूत्र कंकण बांधावें त्यावेळीं वाद्यें वाजवावीत. नवव्या

याजकेन विधातव्याः पूर्वोक्तविधिना ततः ॥ १३१ ॥
नृत्यमंडलमध्यस्थमहापीठास्थितं विभुम् ॥
पंचोपचारविधिना यजेदेकादशार्चनैः ॥ १३२ ॥
जिनपादार्चितैर्गंधद्रव्यचूर्णानुलेपनैः ॥
प्रभूतैः पुष्पतांबूलैः सर्वभव्यान्प्रतोषयेत ॥ १३३ ॥
तस्मिन्नन्हि विशेषेण प्राज्यभोज्यप्रदानकैः ॥
चतुर्वर्णोचितैः सत्रैरागतान्भोजयेज्जनान् ॥ १३४ ॥
ततः परिगमय्येशं पुरि पद्मारुययानकम् ॥
मार्जितेन विशुद्धेन संसिक्तेन तथा जलैः ॥ १३५ ॥
सरोनद्यादि संप्राप्य शुद्धतोयं जलाशयम् ॥
तत्तीरे षोडशस्तंभे कल्पिते सुंदराकृतौ ॥ १३६ ॥

दिवशीं पूर्वोक्त विधीनें याजकानें वास्तुबलिपर्यंत सर्व विधि करावा. नृत्यमंडपाच्या मध्यभागीं मोठ्या सिंहासनावर श्रीजिनाची स्थापना करून पंचोपचारविधीनें अकरा प्रकारानें पूजन करावें. जिनेश्वराच्या पायांची पूजा केलेल्या गंध, चूर्ण, उटी, पुष्कळ तांबूल व पुष्पें यांनीं भव्यजीवांचा आदर सत्कार करावा. त्या दिवशीं विशेष रीतीनें पक्वानांचें जेवण चारी वर्णाच्या लोकांना द्यावें.

१३५–१३६ तदनंतर शहरामध्यें पद्मयानानें विहार करऊन झाडलेल्या व सडा घातलेल्या अशा रस्त्यानें नदी किंवा सरोवराकडे प्रभूस न्यावें. तेथें नदी किंवा सरोवराच्या काठीं सोळा खांबाचा सुंदर आकृतीचा नउ

नवदशकरव्यासे मंडपाद्यै सुमंडिते ॥
मध्यांशे स्थापिते प्रत्यक् तीर्थेशं तीर्थदिङ्मुखम् ॥ १३७ ॥
यक्षं छत्रत्रयं चाग्रे दक्षिणेतरपार्श्वयोः ॥
प्रक्षिप्याथ सुगंधीनि प्रसूनानि तदंभसि ॥ १३८ ॥
क्षीरोदपद्मगंगादिनीरं मत्वाभिमंत्रिते
पुरस्तात्स्थापयेद्धीमांस्तद्वारिपरिपूरितान् ॥ १३९ ॥
नव षोडश वा पंचविंशतिं वा घटान् विभोः ॥
ततोऽवतार्य तद्द्रव्यैः संपूज्य च जगद्गुरुम् ॥ १४० ॥
ततश्चक्रं तथा छत्रत्रितयं च समर्च्य च ॥
आहूतदिक्पतीन्सर्वानाखंडलपुरःसरान् ॥ १४१ ॥
समभ्यर्च्य ततो नाथममीभिः स्नापयेद्घटैः ॥
यक्षेश्वरधृतं धर्मचक्रं छत्रत्रयं च तत् ॥ १४२ ॥

---

किंवा दहा हात व्यामाचा असा मंडप घातलेला असावा. तेथें मध्यभागीं पश्चिमेकडे तीर्थंकर प्रतिमेची स्थापना करावी व यक्ष आणि छत्रत्रयांची उजवे व डावे बाजूकडे स्थापना करावी. तदनंतर पाण्यामध्यें सुगंधि फुलें टाकून हें पाणी क्षीरसमुद्र, पद्मादि सरोवरें यांचें आहे असा संकल्प करून प्रभूच्या पुढें नऊ सोळा किंवा पंचवीस घट जलानें भरून स्थापावेत. तदनंतर अर्हन्ताची पूजा करून चक्र व छत्रत्रयांची पूजा करावी

इंद्रादि दहा दिक्पालांचें आव्हान करून व त्यांची पूजा करून उपर्युक्त कलशांनीं प्रभूचा अभिषेक करावा.

निमज्जयेज्जलाधारे जगतःशांतिरस्त्विति ॥
तदेतत्पुण्यतीर्थांभः कुर्युर्भव्याः स्वमूर्धनि ॥ १४३ ॥
ततः कौतुकसूत्रं तत्प्रक्षिप्ते तज्जलाशये ॥
ततः समर्च्य लोकेशं जलगंधाक्षतादिभिः ॥ ॥१४४ ॥
प्रभूतचरुभिश्चाथ चक्रादिद्वितयं यजेत् ॥
ततो विसृज्य दिक्पालान्प्राप्य देवालयं प्रभुम् ॥ १४५ ॥
कलशैः पंचविंशत्या स्नापयेत्तद्द्वयान्वितम् ॥
सयमार्थोपकरणैर्वस्त्रैराभरणैर्धनैः ॥ १४६ ॥
संघपूजां प्रकुर्वीत यजमानः स्वशक्तितः ॥
इंद्रस्य च प्रतींद्राणां सत्कारमुचितं कृती ॥ १४७ ॥

---

तदनंतर यक्ष व छत्रत्रय यांना जलामध्यें बुडऊन तें पवित्र पाणी जगाला शांति लाभो या इच्छेनें आपल्या मस्तकावर धारण करावें. तदनंतर तें कौतुकसूत्र जलामध्यें टाकावें. जलगंधादिकांनीं व पुष्कळ नैवेद्यांनीं प्रभूची पूजा करावी.

तदनंतर दिक्पालाचें विसर्जन करून प्रभूला देवालयामध्यें नेऊन तेथें पंचवीस कलशांनीं चक्र व छत्रत्रय या सहित प्रभूचा अभिषेक करावा. व संयमाचीं उपकरणें पिंछी कमंडलु वगैरे व वस्त्र, आभरण, धन इ. त्यादिकांनीं यजमानानें यथाशक्ति संघाचा आदर करावा. यात्र प्रमाणें इंद्र प्रतींद्र यांचा ही योग्य सत्कार करावा.

१४७–१५८ नंतर सायंकाळीं महाध्वजाची पूजा करून जिनेश्वराचा मोहावरील जय सूचित

क्रुत्वा तन्वा च चरणौ दातात्मानं समर्पयेत् ॥
ततः सायं समभ्यर्च्य वैजयंतीं महाध्वजम् ॥ १४८ ॥
त्रिः परावर्तयेन्मोहजयशासिनमीशिनः ॥
तदैयं तत्क्रिया तस्य राज्यराष्ट्रविवर्धनम् ॥ १४९ ॥
ततः संचितपुण्यास्ते यांत्वायाता यथायथम् ॥
आयातभव्यलोकस्य तत्कर्म स्याद्विसर्जनम् ॥ १५० ॥
केतनारोहणं तेषामाव्हानं भाविनां भवेत् ॥
अर्धरात्रे ततः सूरिराहूय स्थापितान्सुरान् ॥ १५१ ॥
समभ्यर्च्य विसृज्यामून् ध्वजं समवरोहयेत् ॥
रथान्वितोत्सवस्यैवं कथितः कर्मणां क्रमः ॥ १५२ ॥
अयमेव क्रमः प्रायो रथोन्मुक्तेऽपि चोत्सवे ॥
किं तु नात्र रथारोहे घटाः स्युः स्वेष्टसंख्यकाः ॥ १५३ ॥

---

करणाऱ्या ध्वजाचें तीन वेळां परिवर्तन करावें अशा कृत्यानें राज्य व राष्ट्राची उन्नति होतें. नंतर ज्यांनीं या उत्सवाला येऊन पुण्यसंचय केला त्या सर्व भव्यांनीं आपल्या स्थानीं जावें. याला सर्व सबविसर्जन म्हणतात. यानंतर सर्व भव्यांना बोलाऊन ध्वजारोहण विधि करावा. अर्धरात्रीं तदनंतर स्थापित केलेल्या देवांचें आव्हान करून पूजन करून विसर्जन करावें. याप्रमाणें ध्वजारोहण विधि करवा. हा सर्व कार्यक्रम रथयुक्त उत्सवाचा सांगितला आहे; रथरहित उत्सवाचाही हाच क्रम जाणावा. परतु या उत्सवांत

चूर्णोत्सवतीर्थदिने तीर्थ एव जलोत्सवः ॥
एवमाष्टान्हिको नाम महोऽन्यास्मिन्महत्रये ॥ १५४ ॥
न ध्वजारोहणं तीर्थपूजा विश्वविहारणम् ॥
अष्टान्हिकोत्सवेऽपि स्यान्न ध्वजारोहणादिकम् ॥ १५५ ॥
यथा सैष महोदर्कः संविधातु न शक्यते ॥
मंत्राः कर्मविशेषाश्च प्रोक्तानां सर्वकर्मणाम् ॥ १५६ ॥
प्रागव कथितास्तस्मात्प्रयोगो नात्र भण्यते ॥ १५७ ॥
इति निगदितमार्गानुत्सवान्येत्र भक्त्या ।
विदधाति नियमाच्चानन्दमन्दं स्वशक्त्या ॥
उपचितबहुपुण्याः साधु निर्विश्य भोगान् ॥
अपगतसकलाघाः क्षिप्रमेष्यंति मोक्षम् ॥ १५८ ॥

अभिषेकासाठीं कलशांची संख्या नियत असली पाहिजे असें नाहीं. चूर्णोत्सव व तीर्थ दिवस या दिवशींच जलोत्सव विधि करावा. या प्रमाणें हा आष्टान्हिक उत्सव आहे इतर अशा उत्सवामध्यें म्हणजे पांच दिवसांचा ३ दिवसाचा व १ दिवसाचा अशा उत्सवामध्यें ध्वजारोहण, तीर्थपूजा विश्वविहार हे. विधि करीत नसतात. अष्टान्हिकोत्सवांतही हे विधि करीत नाहींत. कारण एवढा मोठा कार्यक्रम करणें कठीण असतें. या सर्व क्रियांचे मंत्र वगैरे मागें सांगितले आहेत म्हणून आम्ही येथें सांगत नाहीं.

या प्रमाणें भक्तीनें यथाशक्ति जो भव्य दरवर्षी हें उत्सव करितो त्याला पुष्कळ पुण्यप्राप्ति होते. तो भोगाचा उपभोग घेऊन संपूर्ण पापरहित होतसाता लौकरच मोक्षाला प्राप्त होतो.

कविवंशवर्णनम् ।

पुराकृतयुगस्यादावादिब्रह्मतनूभवः
अन्त्यब्रह्मा स भरतो यान्ससर्ज द्विजोत्तमान् ॥ १ ॥
तेषु केचिदथात्यक्तजिनमार्गा विवेकिनः ।
अविच्छिन्नान्वयाचारपरा ववृतिरे द्विजाः ॥ २ ॥
तदन्वयभवाः केचित्कांचीनाममहापुरे ।
त्रिपचाशत्क्रियानिष्ठास्तस्थुः षट्कर्मकर्मठाः ॥ ३ ॥
तान् किलाद्रियतेऽस्मार्यान्विशालाचार्यपुंगवः ।
उपासकमहावेदरहस्याद्युपदेशनैः ॥ ४ ॥
तद्वंशसंभवा बाल्ये स्वभ्यस्तोपासकागमाः ।
यौवने भुंजते भोगान्भूपैर्लोकैश्च पूजिताः ॥ ५ ॥

कविवंशाचें वर्णन.

१-११ 'पुरेति' पूर्वी कृतयुगाच्या प्रारंभीं आदिब्रह्माचे ( आदिनाथ तीर्थंकराचे ) पुत्र ( ज्यांना अन्त्य ब्रह्मा असें म्हणतात ) भरतचक्रवर्तींनीं त्र्यग्रवर्णाची उत्पत्ति केली त्यांनीं अनेक उत्तम ब्राह्मण उत्पन्न केले त्यांपैकीं कित्येक विवेकी ब्राह्मणांनीं जैनमार्गाचा त्याग केला नाहीं आपल्या वंशपरंपरेचा आचार उत्तमरीतीनें पाळला. त्या ब्राह्मणांच्या वंशामध्यें उत्पन्न झालेले कांहीं ब्राह्मण कांचीशहरांत रहात असत. ते ५३ क्रियेमध्यें

जैनीमाददते दीक्षां वार्धके शुद्धबुद्धयः ।
एवं कुलव्रताः प्रायो व्यतीयुर्बहवः क्रमात् ॥ ६ ॥
तदन्वयेऽजनिष्टाकलंकभट्टारको महान् ॥ ॥
वाग्वज्रचूर्णितासर्ववादिगर्वमहीधरः ॥ ७ ॥
ततोऽजनि कुले तस्मिन्निंद्रनंदिमुनीश्वरः ॥
सिद्धांतपारगः सार्वः सर्वशास्त्रोपदेशकः ॥ ८ ॥
तस्मिन्ननंतवीर्यार्यवर्योऽजनि कुले ततः ।
यदुक्तिरकलंकार्यनिधेः स्याद्दीपवर्तिका ॥ ९ ॥

व देवपूजादि सहा कर्मामध्यें तत्पर होते. त्या ब्राह्मणांना विशाखाचार्यांनीं उपासकाध्ययनांतील रहस्याचा उपदेश देऊन निपुण केलें. या वंशांतील ब्राह्मण लहानपणीं श्रावकाचाराचा उत्तम अभ्यास करीत असत. लोक व राजे यांनीं पूजित होऊन तरुणपणीं हे भोगांचा उपभोग घेत असत व म्हातारपणीं निर्मळ बुद्धिचे धारक हे ब्राह्मण निर्ग्रंथ दीक्षा घेऊन आत्मकल्याण करीत असत. याप्रमाणें यांच्या कुलामध्यें अनेक विद्वान व्रतपालक ब्राह्मण होऊन गेले.

तदनंतर यांच्या वंशामध्यें भट्टाकलंक आचार्य झाले. हे आपल्या वचनरूपी वज्रानें वादींच्या गर्वरूपी पर्वतांचा चुराडा करीत असत. तदनतर यांच्या वंशांत सिद्धांतपारग सर्व शास्त्रांचा उपदेश करणारे हितकारक असें इंद्रनंदि मुनीश्वर झाले. तदनंतर अनंतवीर्य मुनिराज उत्पन्न झाले ज्यांचीं वचनें अकलंकाचार्यांच्या शास्त्र रूपी निधीला दाखविण्यास दिवटीप्रमाणें उपयोगी पडतात. याच वंशरूपी उदय पर्वतावर वीरसेन रूपी सूर्य जैनशासनरूपी आकाशाला प्रकाशित करणारा असा झाला अर्थात् वीरसेन नावाचे आचार्य झाले. तदनंतर जि·

वीरसेनमुनींद्रार्कस्तद्वंशोदयभूधरे ।
उदीयाय चिरं जैनशासनांबरभासन: ॥ १० ॥
कलानिधि: सुधास्यंदी निजवाङ्मयचांद्रिक: ।
जिनसेनमुनिश्चंद्रस्तद्वंशाब्धिमवर्धयत् ॥ ११ ॥
वादीभसिंहसूरिश्च वादिराजश्च तार्किकौ ॥
एतावन्वर्थनामानौ वंशे तस्मिन्नुदीयतु: ॥ १२ ॥
प्रवादिहास्तिनां मल्लो हास्तिमल्लसमुद्भव: ॥
गृहाश्रमी बभूवार्हच्छासनातिप्रभावक: ॥ १३ ॥
प्रवादिविजये मल्ल: परवाद्यादिमल्लवाक् ॥
मुनि:प्राभावयज्जैनशासनं तत्कुलोद्भव: ॥ १४ ॥
इत्थमन्येपि तद्वंशसंजाता द्विजपुंगवा: ॥
प्रव्रज्य प्रायशो जाता जिनमार्गप्रभावका: ॥ १५ ॥

---

नसेनरूपी चंद्र आपल्या वाङ्मयरूपी चांदण्याने युक्त व कलांचा साठा असा झाला त्यामुळे या वंशरूपी समुद्राला भरती आली अर्थात् याच वंशांत जिनसेनाचार्य उत्पन्न झाले

१२-२२ जिनसेनाचार्यांच्या वंशात वादीभसिंह व वादिराज हे अन्वर्थ नावाचे आचार्य झाले. याच वंशांत वादिलोकांना मल्लासारखा हस्तिमल्ल नावाचा कवि झाला. हा गृहाश्रमी व जिनशासनाची प्रभावना करणारा होता. वाद्यांना जिंकणारा परवादिमल्ल नांवाचा मुनिराज या वंशामध्यें झाला. यानें जैनधर्माची फार प्रभावना केली. याप्रमाणें या वंशामध्यें पुष्कळ श्रेष्ठ ब्राम्हण उत्पन्न झाले व ते दीक्षा घेऊन बहुतकरून

प्रतिष्ठा०

असीत्तदन्वये लोकपालाचार्य इति द्विजः ॥
गृहस्थाचार्यतारूढो विद्वान्निस्तारकोत्तमः ॥ १६ ॥
चोलेन पूजितो राज्ञा तेन राज्ञा सम स च ॥
प्रातिदेशाख्यकर्नाटदेशं प्राप्य स्वबंधुभिः ॥ १७ ॥
पुत्रःसमयनाथाख्यस्तस्यासीत्तर्ककर्कशः ॥
तत्पुत्रःकविराजादिमल्लःकविशिखामणिः ॥ १८ ॥
वादी वाग्मा च तत्पुत्रश्चिंतामणिसमाव्हयः ॥
अनंतवीर्यस्तत्सूनुर्घटवादविशारदः ॥ १९ ॥
तदात्मजः पार्श्वनाथः संगीतागमशास्त्रवित ॥
आदिनाथस्तु तत्सूनुरायुर्वेदविशारदः ॥ २० ॥
तस्यात्मजो धनुर्वेदी वेदिकोदंडरामकः ॥

---

मुनि बनले होते. याच वंशामध्यें लोकपालाचार्य नांवाचा विद्वान ब्राह्मण झाला. हा गृहस्थाचार्य होता व हा संसारांतून भव्यांना तारून नेत असे चोल राजानें याचा फार सन्मान केला व या राजाबरोबर हे लोकपालाचार्य कर्नाटक देशांत आपल्या बांधवासह येऊन राहिले. या लोकपालाचार्यास समयनाथ नांवाचा मुलगा होता हा तर्कशास्त्रांत फार निपुण होता. याला वाद करणारा व उत्तम वक्ता असा कविराजमल्ल नांवाचा पुत्र होता. याला चिंतामणि नांवाचा विद्वान मुलगा होता. या चिंतामणीला अनतवीर्य नांवाचा मुलगा घटवादामध्यें निपुण असा होता. याला पार्श्वनाथ नांवाचा संगीतशास्त्रवेत्ता असा मुलगा होता. पार्श्वनाथास आयुर्वेद निपुणप असा आदिनाथ नांवाचा पुत्र होता. या आदिनाथाला धनुर्वेदामध्यें रामचंद्रासारखा निपुणप दकर्मे करणारा असा ब्रह्मदेव नांवाचा

तन्नंदनो ब्रह्मदेवो धीमान् षट्कर्मकर्मठः ॥ २१ ॥
देवेंद्रस्तत्सुतो नाम्ना देवेंद्रोपमवैभवः ॥
संहिताशास्त्रनिष्णात:कलासु कुशल:शुची ॥ २२ ॥
राजमान्यो वदान्यश्च जिनधामादिकारकः ॥
त्रिवर्गलक्ष्मीसंपन्नश्चतुरो बधुवत्सलः ॥ २३ ॥
सधर्मचारिणी तस्य सैवाभूदादिदेविका ॥
या श्रीविजयपार्यस्य श्रीमत्याश्च सुता सती ॥ २४ ॥
यस्याः सहोदरा धीराश्चंदपार्यो बुधोत्तमः ॥
महाविद्वान् ब्रह्मसूरिः पार्श्वनाथ इति त्रयः ॥ २५ ॥
तद्देवेंद्रादिदेव्याख्यदंपत्योरादिनाथकः ॥
नेमिचंद्रो विजयप इति पुत्रास्त्रयोऽभवन् ॥ २६ ॥

---

मुलगा होता. ब्रह्मदेवाला इंद्राच्या ऐश्वर्यासारखें ऐश्वर्य धारण करणारा, संहिताशास्त्रनिपुण, कलाकुशल व पवित्र असा देवेंद्र नांवाचा पुत्र झाला.

२३-२४ हा देवेंद्रकवि राजमान्य व दानशूर होता जिनमंदिरें वगैरे बनविणारा, त्रिवर्गलक्ष्मीसंपन्न, निपुण व बंधूवर प्रेम करणारा असा होता. याच्या पत्नीचें आदिदेवी असें नांव होतें. हिच्या पित्याचें विजयप व मातेचें श्रीमती असें नांव होतें. या आदिदेवीला चंदपार्य, ब्रह्मसूरि व पार्श्वनाथ असे तिघे बंधु होते. देवेंद्र व आदिदेवी या उभयतांना आदिनाथ, नेमिचंद्र व विजयप अशीं तीन मुलें झालीं. आदिनाथ

तत्रादिनाथः सर्वार्हत्संहिताशास्त्रपारगः ।
तत्पुत्रास्त्रैलोक्यनाथजिनचंद्रादयो बुधाः ॥ २७ ॥
धीमान् विजयपाख्यस्तु ज्योतिःशास्त्रादिकोविदः ॥
समंतभद्रस्तत्पुत्रः साहित्यरससांद्रधीः ॥ २८ ॥
धीधनो नेमिचंद्रस्तु तर्कव्याकरणागमान् ॥
अधीत्याभयचंद्राख्यमहोपाध्यायसन्निधौ ॥ २९ ॥
पदवाक्यप्रमाणज्ञरूढीं वादमुपागतः ॥
पुत्रौ द्वौ तस्य कल्याणनाथाख्यो धर्मशेखरः ॥ ३० ॥
इति तत्रादिमः सर्वशास्त्रवाराशिपारगः ॥
द्वितीयस्त्वद्वितीयोऽभूच्छात्रेषु सकलेष्वपि ॥ ३१ ॥
अथ यो नेमिचंद्रार्यः शास्त्रं वेत्त्यखिलं स्फुटम् ॥
व्याख्याति शास्त्रमर्थिभ्यो यः सदा धर्मकाम्यया ॥ ३२ ॥

सर्व जिनसंहिताशास्त्रामध्यें निपुण होता. याला त्रैलोक्यनाथ, जिनचंद्र वगैरे मुलें होती. विजयप ( नेमिचंद्रांचा धाकटा बंधु ) हा ज्योतिःशास्त्रांत निपुण होता. याला समंतभद्र नांवाचा मुलगा होता. याची बुद्धि साहित्य रसानें ओली झालेली होती. विद्वान् नेमिचंद्रानें अभयचंद्र महोपाध्यायाजवळ तर्क, व्याकरण, आगम यांचें अध्ययन केलें होतें व या शास्त्राचे जाणते विद्वानामध्यें त्याचा फार सन्मान होत असे. याला कल्याणनाथ व धर्मशेखर असे दोन मुलगे झाले. त्या पैकीं पहिला मुलगा सर्वशास्त्ररूपी समुद्राच्या परतीराला जाऊन

सत्यशासनपरीक्षामुख्यप्रकरणादिकम् ॥
यस्तु शास्त्रं व्यरचयद्विश्वविद्वज्जनस्तुतम् ॥ ३३ ॥
नृपास्थानेषु तर्केषु कर्कशान्प्रतिवादिनः ॥
निर्जित्य बहुशो यस्तु जैनं प्राभावयन्मतम् ॥ ३४ ॥
यो नृपार्पितान्दोलशिबिकाछत्रवैभवः ॥
यो ददात्यर्थमर्थिभ्यो भुंक्ते भोगान्स्वबंधुभिः ॥ ३५ ॥
अकारयच्च यो जैनधाममंडपवीथिकाः ॥
गीतं वाद्यं च नृत्यं च पार्श्वेशाग्रे न्ययोजयत् ॥ ३६ ॥
एवं च धर्मकामार्थत्रिवर्गश्रीविराजितः ॥
आस्ते स्थिरकदंबाख्ये नगरे राजपूजितः ॥ ३७ ॥

पोहोंचला होता. दुसरा मुलगा हा सर्व विद्यांमध्यें मुख्य होता. हे नेमिचंद्रार्य धर्मेच्छेनें नेहमीं शास्त्राध्ययनाची इच्छा करणाऱ्यांना शास्त्राचें रहस्य समजाऊन देत असत. सत्यशासनपरीक्षा, मुख्यप्रकरण वगैरे विद्वन्मान्य ग्रंथ यांनीं रचिले आहेत. राजांच्या सभेंत तर्ककर्कश अशा वादयांना जिंकून यानें जैनधर्माची मोठी प्रभावना केली होती.

३५-या नेमिचंद्रार्यांना राजानें पालखी व छत्र दिलें होतें. हे नेमिचंद्र दररोज याचकाला दान देऊन आपल्या ऐश्वर्याचा उपभोग घेत असत. यांनीं जिनमंदिर, मंडप वगैरे बनविले होते. या प्रमाणें त्रिवर्ग लक्ष्मीनें विराजित होऊन हे स्थिरकदंब नांवाच्या शहरांत राहात असत. यांचे मामा, व मामेभाऊ, चुलते, बंधु व त्यांचीं मुलें, यांचीं स्वतःचीं मुलें, इतर नातलग व विद्वान मंडळी हे सर्व पार्श्वनाथ जिनाचे भक्त होत.

श्रीपार्श्वनाथपादाब्जसेवाहेवाकमानस :॥
मातुला: स्वस्य तत्पुत्रा: पितृव्याश्च सहोदरा: ॥ ३८ ॥
तत्पुत्राश्च स्वपुत्राश्च बंधवोऽन्ये विपश्चित: ॥
कदाचित्प्रार्थयंते ऽस्म तमेवं प्रीतमानसा: ३९ ॥
आयुष्मन् शृणु भो सूरे सर्वशास्त्रविशारद ॥
प्रतिष्ठाशास्त्रमेकं सत्पंचकल्याणविस्तरम् ॥ ४० ॥
विरच्यतामिति ततो जिनभक्त्या च चोदित: ॥
स चाहं नेमिचंद्राख्यो निर्मिणोमि स्म शक्तित: ॥ ४१ ॥
प्रतिष्ठातिलकं नाम प्रतिष्ठाशास्त्रमुत्तमम् ॥
शास्त्रे ऽत्र स्खलितं यन्मे तद्बुधा: क्षतुमर्हथ ॥ ४२ ॥
जिनेज्यासाधनत्वेन स्वर्मोक्षामोघसाधनम् ॥

यांनीं एकदां नेमिचंद्राचार्यांची आपण पंचकल्याणिकांनीं सुशोभित प्रतिष्ठाशास्त्र रचा अशी प्रार्थना केली. तदनंतर त्यांच्या प्रार्थनेस अनुसरून व जिनभक्तीनें प्रेरित होऊन या नेमिचंद्राचार्यांनीं प्रतिष्ठातिलक नांवाचें उत्तम प्रतिष्ठाशास्त्र रचिलें.

हें शास्त्र जिनपूजनाचें साधन आहे व स्वर्ग आणि मोक्षाचें ही साधन आहे. यास्तव याज्ञिक भव्यांनीं या शास्त्राचा पूजन कार्यीं उपयोग करून घ्यावा. हें शास्त्र दोऱ्यानें युक्त, सुंदर, कांतिसंपन्न, संताप दूर करणारें गोल अशा रत्नसमूहांनीं पूर्ण, डोळ्याला आल्हादित करणारें अशा कंठाभरणाप्रमाणें आहे. हें विद्वानांच्या

भव्या व्यवहरंत्वेतच्छास्त्रं यज्ञेषु याज्ञिकाः ॥ ४३ ॥

अनुगतवरसूत्रं चारुकांतिप्रसादं परिहृतजनतापं वृत्तरत्नौघपूर्णम् ॥

सुखयदमलदृष्टीन् कंठिकाकल्पमेतद्भवतु सुकृतिकंठे शास्त्रमाचंद्रतारम् ॥४४ ॥

मनोहारि तमोहारि तापहार्यमृतावहम् ॥

शरणं भक्तिमानोमि चंद्रवज्जिनशासनम् ४५ ॥

● इत्यर्हत्प्रतिष्ठासारसंग्रहे नेमिचंद्रदेवविरचिते प्रतिष्ठातिलकनाम्नि उत्सवविधिर्नाम अष्टादशपरिच्छेदः ॥ ● श्रीः श्रीः श्रीः ●

---

कंठामध्यें चंद्रसूर्य असे तोपर्यंत राहो. हें शास्त्र आगमसूत्राला अनुसरणारें, कांति व प्रसाद या काव्यगुणांनीं युक्त, संसारताप दूर करणारें, चारित्ररूपी रत्नसमूहांनीं पूर्ण, सम्यग्दृष्टींना आल्हादित करणारें आहे यास्तव त्याला भव्यांनीं आपल्या कंठांत सूर्यचंद्र असे तोपर्यंत धारण करावें

४५ हें जिनशासन चंद्राप्रमाणें मनोहरण करणारें, संसार ताप नाहींसा करणारें, व अमृतावह अर्थात् मोक्ष देणारें आहे. यास्तव मी या जिनशासनाला शरण जातो. चंद्र मनोहर, अंधार दूर करणारा, संताप नष्ट करणारा, व अमृतोत्पत्ति करणारा असतो त्या प्रमाणें हें शास्त्र आहे.

या प्रमाणें नेमिचंद्र विरचित प्रतिष्ठातिलक नांवाच्या ग्रंथांतील उत्सवविधि नांवाचा अठरावा परिच्छेद संपला.

# ग्रंथकर्तुः प्रशस्तिः ।

सद्वर्णी सूत्रयुक्तः प्रकृतिगुणयुतः साधिकारः सलिंगः ।
सश्रद्धः शुद्धवाक्यः पदगुणसुभगो वृद्धिमान् धातुपूज्यः ॥
सद्रूपः सौम्यनामा व्ययविधिविमलः शब्दसिद्धिप्रगल्भः ॥
सत्कीर्तिर्नेमिचंद्रोऽभवदवनितले रूपमालासदक्षः ॥ १ ॥
विपाब्धिदंभोरुहषंडभानुः स्थिराधिपास्थानमणिप्रदीपः ॥
जिनागमांभोनिधिपूर्णचंद्रो जयत्वजस्रं भुवि नेमिचंद्रः ॥ २ ॥
पलायध्वं पलायध्वं रे रे तार्किकदिग्गजाः ॥
नेमिचंद्रः समायातः स्याद्वादवनकेसरी ॥ ३ ॥

'सद्वर्णीति' श्रीनेमिचंद्राचार्य या भूतलावर रूपमाला व्याकरणासारखे आहेत. व्याकरणामध्यें वर्ण, सूत्र प्रकृति, गुण, अधिकार, पुल्लिंगादिक लिंगें, श्रद्धासंज्ञा (आकारांत स्त्रीलिंगशब्दांना ही संज्ञा आहे] व शुद्ध वाक्यरचना असते. व्याकरणांत पदांना गुण व वृद्धि होत असतात धातु-क्रियापदें यांनीं तें युक्त असतें. शब्दांचीं रूपें सिद्ध केलेलीं असतात. नाम, अव्यय, समासविधि यानीं तें युक्त असतें. याचप्रमाणें नेमिचंद्रही सद्वर्णी ब्रह्मचारी, आगमसूत्राचे जाणते, स्वाभाविक रीतीनेंच गुणयुक्त, अधिकारयुक्त, श्रद्धावान्, शुद्ध बोलणारे, गृहस्थाचार्यांच्या गुणांनीं शोभणारे. नहमीं उन्नतिशील, धातुपूज्य-राजपूजित, सुस्वरूपी, सौम्यनांवाचे, व्ययविधिविमलः दान देण्यानें पवित्र झालेले, शब्दसिद्धिमध्यें निपुण असे होते.

धर्मेन्द्राव्हयसंयतेन लिखितं श्रीमज्जिनेंद्रप्रति-
ष्ठासारं जिनभाक्तिकेन विलसन्नेमींदुना निर्मितम् ॥
ग्रंथो ऽयं त्वधुना मया भुवि चिरं संतिष्ठते प्राग्भवे ॥
पुण्योपार्जनमुक्तिलोकहृदये कंठे सदर्थान्वितम् ॥ ४ ॥
जयति विजयकीर्तिः श्रीमदाचार्यमूर्तिर्भवजलधितरंडः खंडितानंगकांडः ॥
गुणमणिगुणसिंधुर्भव्यसंदोहबंधुर्निरतिशयचरित्रः क्ष्मातलस्तोत्रपात्रः ॥ ५ ॥
आनंदाब्दे चैत्रमासे पंचम्यां परिपूरणात् ॥
मया विलिखितं पुस्तमिदं स्थेयाच्चिरं भुवि ॥ ६ ॥
आब्रह्माख्यवर्णांशं सादरीकृतसंघकम् ।
मेदिनीपतिपूजाऽपादपद्मं नमाम्यहम् ॥

हे नेमिचंद्र विद्वानरूपी कमलांना सूर्यासारखे होते. राजाच्या सभामध्यें स्थिर अशा रत्नदीपाप्रमाणें होते. जिनशास्त्ररूपी समुद्राला भरती आणण्यास चंद्राप्रमाणें होते त्याचा नेहमीं जगामध्यें विजय होवो.

'पलायध्वमिति' हे तार्किकदिग्गजांनो ? पळा पळा. हा स्याद्वादरूपी अरण्यामध्यें गर्जणारा सिंह नेमिचंद्र येत आहे.

श्रीनेमिचंद्रांनीं रचिलेला हा प्रतिष्ठापाठ धर्मचंद्र मुनींनें लिहिला आहे. हा ग्रंथ पुण्योपार्जन करण्यामध्यें गढून गेलेल्या लोकांच्या हृदयांत अर्थासहित राहो.

आचार्य विजयकीर्तिचा सदा विजय होवो. हे आचार्य भवसमुद्रामध्यें नावेप्रमाणें आहेत. यांनीं म-

कंद छंदः ॥ सुजनैकसेव्यनमलं वृजिनहर विजयकीर्तिमुनिसुतनेनली ॥
विजयवर्णीशगणं भुजगेंद्रगल्लदुळिदरवे स्तुतिसल ॥ १ ॥
श्रीमत्पंचगुरुभ्यो नमः । सरस्वत्यै नमः । गणधरादिमहामुनिभ्यो नमः ॥

इति श्रीनेमिचंद्रदेवविराचितप्रतिष्ठातिलकनामसंहिताशास्त्रं समाप्तम् ॥

वर्द्धतां जिनशासनम् ॥ श्रीः श्रीः श्रीः ॥

---

दनाचे बाण नष्ट केले आहेत. गुणरत्नांचा हे साठा आहेत. हे भव्यबंधु आहेत यांचें चारित्र अवर्णनीय आहे.

हें पुस्तक आनंद संवत्सरामध्यें चैत्रमासीं पंचमीच्या दिवशीं मी ( धर्मचंद्रमुनीनें ) लिहून पूर्ण केलें आहे.

आग्रम्ह नांवाचे मुनि सर्वसंघास आदराला पात्र आहेत. राजे लोकांना पूज्य आहेत. त्यांना मी नमस्कार करितो.

याप्रमाणें हें प्रतिष्ठातिलक शास्त्र संपूर्ण झालें.



# अथ वास्तुबलिविधानम् ॥

अथ पूर्ववद्वायुकुमारादिप्रयोगेण भूमिसंस्कारः। ततः संकल्पः। अथ पुण्याहवाचना विधेया ।

ब्रह्मस्थाने मघोनः ककुभि हुतभुजो धर्मराजस्य रक्षो–
राजस्याहींद्रपाणेरवनिरुहभृतः[?] शंभुमित्रस्य शंभोः ॥
नागेंद्रस्यामृतांशोरपि सदकलसद्भरुणादिदूर्वा ॥
दर्भान्वेद्या दिशासु न्यसनमिह महे यज्ञनिर्विघ्नसिद्ध्यै ॥ १ ॥

ओं ह्रीं दर्पमथनाय स्वाहा । दिग्दर्भस्थापनम् ॥

ओं–आभिः पुण्याभिरद्भिः परिमलबहुलेनामुना चंदनेन ॥
श्रीहृक्पेयैरमीभिः शुचिसदकचयैरुद्गमैरेभिरुद्धैः
हृद्यैरेभिर्निवेद्यैर्मखभवनमिमैर्दीपयद्भिः प्रदीपैः ॥

वास्तुबलिविधानम् ॥

'अथेति' प्रथमतः पूर्वी प्रमाणें वायुकुमारादिकांचे आव्हान करून भूमिसंस्कार करावा. अर्थात् भूमिशोधन, भूमिप्रज्वलन वगैरे विधि करावा. यानंतर पुण्याहवाचना करावी.

'ब्रह्मस्थानेति' हा श्लोक म्हणून व मंत्र म्हणून दहा दिशांना दर्भस्थापना करावी.

'आभिरिति' हा श्लोक म्हणून व मंत्र म्हणून अष्टद्रव्यांनीं भूमिपूजन करावें.

धूपैः प्रायोभिरेभिः पृथुभिरपि फलैरेभिरर्चामि भूमिम् ॥ २ ॥

ओं ह्रीं नीरजसे नमः । भूम्यर्चनम ॥ २ ॥

वेद्यां मंडलमालिखार्चितासितैश्चूर्णैः सिताकल्पभृत् ।
नागाधीशधनेशपीतवसनालंकारपीतैश्च तैः ॥
नीलैर्नीरजनीलवेष सुमनो रक्ताभरक्तैस्ततो ॥
रक्ताकल्पककृष्णमेघविलसन्कृष्णैश्च कृष्णप्रभ ॥ ३ ॥

पंचचूर्णस्थापनम् ॥

सन्मंगलस्यास्य कृते कृतस्य कोणेषु बाह्यक्षितिमंडलस्य ॥
वज्राणि चत्वारि च वज्रपाणिन् वज्रस्य चूर्णेन लिखाय वेद्याम् ॥ ४ ॥

इति वज्रस्थापनम् ॥

अथार्हदीशप्रतिमाप्रतिष्ठा-विधाननिर्विघ्नममाप्तिसिद्धयै ॥
ततोऽकुरार्चादिवसाच्च पूर्वदिने क्षपाया विदधीत नांदीम् ॥५॥
तत्रापि पूर्वं विदधीत वास्तु–दिवौकसां भेकपदे स्थितानाम् ॥

---

'वेद्यामिति' हा श्लोक म्हणून पांढऱ्या, पिवळ्या, नीळे, तांबडे, व काळे अशा चूर्णांनी मंडलरचना करावी.

'सन्मगलेति' हा श्लोक म्हणून या मंडलाच्या बाहेर चार कोणामध्ये चार वज्रांची स्थापना करावी.

'अथेति' हा श्लोक म्हणून अरहताच्या प्रतिष्ठेचा विधि निर्विघ्न समाप्त व्हावा म्हणून अङ्कुरार्पणदिवसाच्या पूर्व

तथा परे वा विदधत्सपर्यां क्रमेण सामान्यविशेषसत्राम् ॥६॥
स्नात्वा समाचम्य समेत्य धाम कृत्वा तथेर्यापथशोधनं च ॥
स्तुत्वा च सिद्धान्सकलीविधानं कृत्वैकतानो विजनप्रदेशे ॥ ७ ॥
कृत्वा समासाज्जिनराजपूजां श्रुत्वा समाराध्य तथा मुनींद्रान् ॥
गुरोरनुज्ञां शिरसा गृहीत्वा दत्वा नियोगं परिचारकाणाम् ॥ ८ ॥
प्रत्यग्रधौतोत्तमशुभ्रवासमसा कृत्वांतरीयं च तथोत्तरीयम् ॥
हैमोपवीतांगदहारमुद्रिकाकिरीटकर्णाभरणादिभूषितः ॥ ९ ॥
तद्देवपूजासमये समुक्तमंत्रात्परं वाक्यमभाषमाणः ॥
चतुःपरीचारविधिज्ञयुक्तः समाहितात्मा यजने प्रवीणः ॥ १० ॥
इंद्रः प्रतींद्रेण समं विधाय पदं क्रियार्थे मखमंडपादौ ॥

दिवशीं रात्रीं नांदीमंगल विधि करावा. प्रथमतः भेकपदावर असलेल्या वास्तुदेवतांची पूजा करावी.

'स्नात्वेति' स्नान व आचमन करून जिनमंदिरामध्यें यावें तेथें ईर्यापथशोधन करून व सिद्धांची स्तुति करून एकाग्रमनानें एकांत स्थानीं सकलीकरण करावें. 'कृत्वेति' संक्षेपानें जिन, शास्त्र व गुरु यांची पूजा करून गुरूची आज्ञा मस्तकावर धारण करून परिचारकांना आपआपलीं कार्यें करण्यास आज्ञा द्यावी. शुद्ध धुतलेलें पांघरण्याचें व नेसण्याचें वस्त्र धारण करून सुवर्णयज्ञोपवीत, अंगद, हार, आंगठी, किरीट व कुंडल हीं आभरणें धारण करावीत. देवपूजासमयीं सांगितलेल्या मंत्राशिवाय दुसरें कांहीं बोलूं नये. विधि जाणणारे चार परिचारकांना घेऊन पूजानिपुण इंद्रानें मंडपामध्यें प्रतींद्रासह प्रवेश करावा पददेवतांना प्रथम बलि द्यावा. बलीचे दोन भेद आहेत. वरण भाजी, वडे भात यांचा बलि हा एक प्रकार व दुसरा प्रकार त्या त्या देवतांना अर्पण करावयास

पदेत्र दद्यात्पददेवतानां बलिं सुयोपागणकादि·······[?]॥ ११ ॥
बलिश्च सामान्यविशेषभेदात्पुरोपदिष्टो द्विविधः पदेशाम् ॥
एकस्तु सव्यंजनपूपभक्तं शेषस्तु तत्तत्पृथगिष्टिवेद्यः ॥ १२ ॥
ब्रह्माणमिंद्रादिदिशाधिनाथानार्यादिदेवांश्च सविंद्रपूर्वान् ॥
पर्जन्यपर्जन्यदिवौकसाऽपि विचारिकाद्यांश्च यजेत्क्रमेण ॥ १३ ॥
दधातु पूजां सकलामगणा उच्चारयन्मानस एव मन्त्रम् ॥
तत्र प्रयुक्तं वचनं च यद्यत्तन्मंत्रतः प्राक्पठनीयमेत्र ॥ १० ॥

इति प्रारंभनिरूपणम् ॥

अथ पुष्पांजलिपुरःसरं ब्रह्मादिवास्तुदेवतानां पृथगिष्टिः ।

श्रीमज्जैनमहामहोत्सवविधिव्यापारसंसिद्धये ।
भव्यानामपि तं नियोगनिचयश्रद्धापरीतात्मनाम् ॥
क्षेमार्थं क्रियमाणवस्तुदिविपत्संधानसंपूजन– ॥

---

सांगितलेले पदार्थ हा विशेष बलि होय. ब्रह्म, दशदिक्पाल, सविंद्रादिकदेवता, पर्जन्यादि देवता व विचारिकादि देवता यांना क्रमानें पूजावें या देवतांच्या मंत्रांचा प्रथम मनामध्यें उच्चार करून यांची पूजा करावी. या प्रमाणें प्रारंभिक निरूपण झालें. यानंतर पुष्पांजलि पुरःसर ब्रह्मादि वास्तु देवतांची वेगळी वेगळी पूजा करावी. श्रीमदिति हा श्लोक म्हणून जिनपूजेमध्यें भव्यांना विघ्न होऊ नये यासाठीं वास्तुदेवपूजनाच्या प्रारंभीं पुष्पांजलिक्षेपण करावें.

प्रस्तावे प्रविकीर्यते जयजयारावेण पुष्पांजलिः ॥

ओं ऱ्हीं श्रीं क्षीं भूः स्वाहा ॥ पुष्पांजलिः॥ १ ॥

ओं—ग्रामक्षेत्रगृहादिभेदविविधोर्वीभागमध्याश्रय—
स्तत्तद्भागपरिच्छिदा बहुविधस्वात्मप्रदेशो विभुः ।
ब्रह्मा दिक्पतिपूर्वदेवनिकरैरात्मोन्मुखैर्वेष्टितो
लाजाज्यान्वितदुग्धभक्तमधुना गृण्हातु रक्तप्रभः ॥

ओं ऱ्हीं ब्रह्म० जलम् ॥ १ ॥

ओं—ऐरावतस्कंधमधिश्रयन्तं वज्रायुधं रुच्यशचीसमेतम् ॥
प्रत्यूहविध्वंसकमर्हदिष्टौ कुष्टप्रसूनैः प्रयजामि शक्रम् ॥

ओं ऱ्हीं इंद्र० ॥ २ ॥

ओं—ज्वालाकलापात्मकशक्तिहस्तो बस्ताधिरूढः सुपरिष्कृतांगः ॥

---

'ग्रामेति' गांव, शेत, घर इत्यादिकांच्या मध्यभागाचा आश्रय करणारा व दिक्पालादि देववेष्टित अशा ब्रह्माला मी लाह्या, तूप यांनीं युक्त असा दुधाचा भात अर्पण करितो.

'ऐरावतेति' इंद्राचें वाहन ऐरावत, आयुध वज्र, शची ही पत्नी आहे. अशा इंद्राला अर्हत्पूजेमध्यें विघ्न नष्ट व्हावें ह्मणून कुष्टाच्या फुलांनीं पूजितो.

'ज्वालेति' अग्नीचें शक्ति हें अस्त्र आहे. बकरा वाहन आहे. स्वाहा पत्नी आहे. या अग्नीचें दूध, तगर व उत्तम तूप यांनीं तर्पण करितो.

स्वाहामाङ्ग्या सममग्निदेवः प्रीणातु दुग्धैस्तगैरैरतराज्यैः ॥

ओं ऱ्हीं अग्ने० ॥ ३ ॥

ओं–छायासमेतं महिषाधिरूढं दंडायुधं दांडितवैरिवर्गम् ॥

वैवस्वतं विघ्नहरं तिलान्नैः सिंबान्ययुक्तैः परितर्पयामि ॥

ओं ऱ्हीं यम० ॥ ४ ॥

ओं--नैऋत्यदेशो निऋतिः सुरुक्षमृक्षांगवाहद्विपदास्यरक्षः ॥

आरूढवानुद्गतमुद्गरास्त्रः पिण्याकमायच्छतु तैलमिश्रम् ॥

ओं ऱ्हीं नैऋत्य ॥ ५ ॥

ओं--करधृतफणिपाशो मंडनोद्योतिताशः करिमकरकमूर्तिर्लोकसंक्रांतकीर्तिः ।

सुरुचिरवरुणानीप्राणनाथः सयूथो वरुण इह समेतो लातु दुग्धान्नधान्यम् ॥

ओं ऱ्हीं वरुण० ॥ ६ ॥

---

'छायेति' यमाला छाया ही पत्नी आहे. रेडा वाहन आहे, दंड नांवाचें शस्त्र आहे. या यमाला निळाम व तिला=शमी नांवाचें धान्य यांनीं तृप्त करावें.

'नैऋत्येति' निऋतिचें अस्वल हें वाहन आहे, मुद्गर हें अस्त्र आहे. याला तैलमिश्रित पेंड अर्पण करावी.

'करेति' नागपाश हें वरुणाचें आयुध आहे. करिमकर हें वाहन आहे. वरुणानी ही पत्नी आहे. या वरुणाला दूधभात देऊन सतुष्ट करितो.



नुानि

ओं- उर्वीरुहोर्वायुधशस्तहस्तमर्वाधिरूढं परिमंडितांगम् ॥
तद्वायुवेगीमुखदत्तदृष्टिं पिष्टैर्निशायाः पवनं यजामि ॥
ओं ऱ्हीं पवन ॥ ७ ॥
सद्रत्नरुक्पुष्पितपुष्पकाभ्रयानाधिरूढस्फुरितोग्रशक्ते: ॥
सजानियूथ्यव्रजयक्षराज प्रत्तं मया स्वीकुरु पायसान्नम् ॥
ओं ऱ्हीं कुबेर । ८ ॥
ओं—उमासमेतो वृषभाधिरूढो जटाकिरीटप्राणिभुषितांग: ॥
त्रिशूलहस्त: प्रमथाधिनाथो गृण्हातु दुग्धान्नमिदं ससर्पि: ॥
ओं ऱ्हीं ईशान० ॥ ९ ॥
ओं—वेध:पुरोदेशमवंतमार्यं ध्वस्तात्मदेशप्रतिरोधिवीर्यम् ॥
सत्पूरिकामोदकपूरिकादिर्भक्ष्यै: प्रहृष्ट विदधे फलैश्च ॥ १० ॥
ओं ऱ्हीं आर्य० ॥ १० ॥

'उर्वीति' वायूचें वृक्ष हें अस्त्र आहे घोडा वाहन आहे वायुवेगी याची स्त्री आहे. याला हळदीच्या चूर्णानीं मी तृप्त करितो.
'सद्रत्नेति' पुष्पकाविमान हें कुबेराचें वाहन आहे. याला मी क्षीरान्न समर्पण करून तृप्त करितो.
'उमासमेतेति' हा श्लोक ह्मणून ईशानाला तूपासहित दूधभात अर्पण करावा.
'वेध इति' हा श्लोक ह्मणून आर्यनांवाच्या देवाला ब्रह्माच्या पुढें पूरी मोदक भक्ष्य पदार्थांनीं व फळांनीं संतुष्ट करावें.

ओं—ब्रह्मापसव्यं पदमावसानो भाभासमानो मुकुटादिभाभिः ॥
स्यामिष्यसंवीतभुजिष्यवर्गो दीव्येत माषान्नतिलैर्विवस्वान् ॥ ११ ॥

ओं ऱ्हीं विवस्वन् ॥ ११ ॥

ओं—शत्रुशक्तिविनिवारणक्षमो मित्ररक्षणविधानदाक्षिणः ॥
प्रत्यगीश इह मित्रनिर्जरः स्वीकरोतु दधिदूर्विकामपि ॥ १२ ॥

ओं ऱ्हीं मित्र० ॥ १२ ॥

ओं—प्रजापतेः सव्यसुधाशिभागे महीमवंतं महिमानमाप्तम् ॥
महीधरं मंडनमंडितांगं महामहस्कं महयामि दुग्धैः ॥ १३ ॥

ओं ऱ्हीं भूधर० ॥ १३ ॥

ओं—सविंद्रदेवाय सविक्रमाय तनूनपात्पक्षमुपाश्रिताय ॥
वनामरानीकपुरःसराय ददामि पुंजीकृतधान्यलाजम् ॥

---

'ब्रह्मेति' हा श्लोक म्हणून ब्रह्माच्या उजव्या भागाला विवस्वत् देवाला उडदाचें अन्न व तिळ यांनीं संतुष्ट करावें.

'शत्रु इति' हा श्लोक म्हणून मित्रनावाच्या देवाला दधिदूर्वांनीं संतुष्ट करावें. हा देव शत्रूंचें निवारण करून मित्रांचें रक्षण करितो.

'प्रजापतेरिति' हा श्लोक म्हणून महीधर देवाला दुधानें तृप्त करावें.

'सविंद्रेति' हा श्लोक म्हणून अग्नीचा पक्ष धारण केलेल्या सविंद्र देवाला साळीच्या लाह्या अर्पण करून तृप्त करावें.

ओं ऱ्हीं सार्विंद्र० ॥ १४ ॥

ओं—वैश्वानरादित्यमुपाश्रिताय सार्विंद्रदेवाय सविक्रमाय ॥
कर्पूरकाश्मीरलवंगकुष्टैरुपस्कृतं पुण्यजलं ददामि ॥

ओं ऱ्हीं सार्विंद्र० ॥ १५ ॥

ओं—इंद्रं वनामर्त्यकदंबकेंद्रं मंद्रारवं पुण्यजनस्य पक्षम् ॥
प्रत्यूहजालं विनिपातयंतं मुद्गस्य चूर्णैः प्रयजे सपूपैः ॥ १६ ॥

ओं ऱ्हीं इंद्र० ॥ १६ ॥

ओं—इंद्रराजगततंद्रनिर्जितारातिवर्ग जिनवर्गपोषक ॥
कासराधिपतिपक्षमाश्रिताऽऽदेहि पूपयुतमुद्गचूर्णकम् ॥ १७ ॥

ओं ऱ्हीं इंद्रराज ॥ १७ ॥

ॐ–समीराग्रभूमौ समुद्रासमानं निजं देशभागं सदा पालयन्तम् ॥

---

'वैश्वानरेति' हा श्लोक ह्मणून आदित्याचा आश्रय घेतलेल्या सार्विंद्र देवाला कापूर, केशर, लवंग व कुष्ट यांनीं सुगंधित असें पवित्र पाणी अर्पण करावें.

'इंद्रेति' हा श्लोक ह्मणून इंद्राला मूगाच्या पिठांनीं व वड्यांनीं पुजावें. हा व्यंतर देवांचा अधिपति आहे.

'इंद्रराजेति' हा श्लोक ह्मणून यमाच्या पक्षाचा आश्रय करणाऱ्या या इंद्रराज नांवाच्या देवाला वड्यासह मुगाचें पीठ अर्पण करून तृप्त करितो.

'समीरेति' हा श्लोक ह्मणून वायुदेवाच्या पुढच्या भूमीवर जो राहतो अशा रुद्र नांवाच्या व्यंतर देवांच्या

यजे रुद्रमक्षुद्रवन्यामरेंद्र गुडापूपवर्गैरुपस्कारयुक्तैः ॥
ओं ऱ्हीं रुद्र० ॥ १८ ॥

ओं-रुद्रजयाख्यं परिमितरौद्रक्षुद्रनिकायं वनसुरमुख्यम् ॥
मारुतनिभं गुडपरिपुष्टैः पिष्टकवर्गैरिह महयामि ॥
ओं ऱ्हीं रुद्रजय० ॥ १९ ॥

ओं--आमोदमाप्नोति गुणाधिकेषु विद्वेषमुद्वृत्तजनेषु यश्च ॥
आपः सदेवो गुडपिष्टयुक्तं सकैरवं शंखमुपैतु दैव ॥
ओं ऱ्हीं आप० ॥ २० ॥

ओं--धर्मानुरक्तानमोदमानं पापानुरक्तानपसारयन्तम् ॥
महेश्वरायत्तमिहापवत्सं संपूजयेयं बलिना तथैव ॥
ओं ऱ्हीं आपवत्स ॥ २१ ॥

---

अधिपतीला मी गुळाच्या वारग्यांनीं पूजितो

'रुद्रेति' हा श्लोक म्हणून व्यंतराधिपति अशा रुद्रजय नावाच्या देवाला गुळाच्या वारग्यांनीं पूजितो.

'आमोदेति' हा श्लोक म्हणून जो गुणाधिकावर प्रीति करितो व उच्छृंखल लोकावर अप्रीति करितो. त्या आप देवाला मी गुळाचे पारगे कमल व शंख अर्पण करितो.

'धर्मान' हा श्लोक म्हणून धर्मप्रेमी लोकावर प्रेम करणारा व पाप्यांचा तिरस्कार करणारा अशा आप देवाला वरच्या पदार्थांनीं पूजितो.

ओं--पर्जन्य पर्जन्यानिनादतुल्यनादेन दूरीकृतवैरिलोक ॥
स्वतर्जनीचालनतर्जितात्मवाचाटभृत्याज्यमुपैहि रौद्र ॥ २२ ॥

ओं ऱ्हीं पर्जन्य० ॥ २२ ॥

ओं--जयं तनोति प्रतिरोधिरोधान्नयं तनोति स्वजनानुवृत्तेः ॥
योऽसौ जयंतो हरिदक्षिणस्थो गृण्हातु पूतं नवनीतमेतत् ॥

ओं ऱ्हीं जयंत० ॥ २३ ॥

ओं -संक्रंदनाखण्डलदेशितारं तापप्रकाशप्रतिभासमानम् ॥
तमोपहं भास्करदेवमेत कुर्वे प्रहृष्टं मधुकंददानात् ॥

ओं ऱ्हीं भास्कर० ॥ २४ ॥

ओं--सत्यामरं नित्यमसत्यदूरं गोत्रद्विषद्वामपदे वसंतम् ॥
सद्धर्मनिध्यानकृतप्रमोदं संपूजये पूर्वसपर्ययैव ॥ २५ ॥

ओं ऱ्हीं सत्यक ॥ २५ ॥

'पर्जन्येति' हा श्लोक ह्मणून मेघाप्रमाणें असलेल्या गर्जनेनें वैरी लोकाना दूर सारणाऱ्या या पर्जन्य देवाला मी तूप अर्पण करितो.

'जयेति' हा श्लोक ह्मणून इंद्राच्या दक्षिणेला असलेल्या जयत देवाला मी लोणी अर्पण करितो.

'संक्रदनेति' हा श्लोक ह्मणून भास्कर नांवाच्या देवाला मी मधुकंद-ज्येष्ठमध अर्पण करितो.

'सत्येति' हा श्लोक ह्मणून इंद्राच्या डावे बाजूला राहणाऱ्या सत्यक नावाच्या देवाला मी ज्येष्ठमध अर्पण करितो.

ॐ–भृशं विवक्षुर्गुणशालिसंघं भृशं दिदृक्षुर्मुनिमुख्यसंगम् ॥
भृशामरः संश्रुतवृत्तशत्रू रातु प्रमोदान्नवनीतपिंडम् ॥
ॐ ह्रीं भृशदेव० ॥ २६ ॥
ॐ–अथातरिक्षो विहरन्विनोदं वनेषु पश्यन्सुजनोपसर्गम् ॥
नुदन्स्पृहद्यानुसखोंतरिक्षश्चूर्णं निशामाषजमाददातु ॥ २७ ॥
ॐ ह्रीं अंतरिक्ष० ॥ २७ ॥
ॐ–पुष्णाति यः सज्जनतोपकारं मुष्णातु चासज्जनदुर्विलासम् ॥
कृपीटयोनेः सुहृदेष पूषा शिवान्नमेतत्सपयः प्रतीच्छेत् ॥
ॐ ह्रीं पूषन्० ॥ २८ ॥
ॐ–वितथाख्यं वितथीकृतारिशक्तिप्रदनं साधुजनोपकारदक्षम् ॥

---

'भृशमिति' हा श्लोक म्हणून जो नेहमीं मुनिसहवासाची इच्छा करितो. व इंद्राचा ज्यानें आश्रय केला आहे त्या भृशदेवाला मी लोणी अर्पण करितो.

'अथेति' हा श्लोक म्हणून अंतरिक्ष नांवाच्या देवाला हळद व उडदाचें पीठ अर्पण करितो.

'पुष्णातीति' हा श्लोक म्हणून जो सज्जनावर उपकार व दुर्जनावर अनुपकार करितो त्या पूषन् देवाला शिवान्न ( साच्याचा भात ) मी अर्पण करितो.

'वितथेति' हा श्लोक म्हणून शत्रुशक्तिचा नाश करणाऱ्या वितथ देवाला कट्टु नांवाच्या धान्याचें अन्न मी समर्पण करितो.

प्रथितं दंडधराख्यं वरकटान्नसमार्चितं करोमि ॥ २९ ॥

ओं ऱ्हीं वितथ० ॥ २९ ॥

ओं–रक्षःपरीवारकसत्वरक्षादक्षे सुमार्गे विहितप्रमोदम् ॥
कलापसव्याश्रयराक्षसेंद्रं मधुप्रदानात्सुखितो भव त्वम् ॥

ओं ऱ्हीं राक्षस० ॥ ३० ॥

ओं–सगंधगंधर्वसुपर्वहस्त--प्रशस्तवीणानुगगानगतिं ॥
गंधर्वदेवं घनसारपूर्वगंधैः समर्चे यममाश्रयन्तम् ॥ ३१ ॥

ओं ऱ्हीं गंधर्व० ॥ ३१ ॥

ओं–यो विक्रमाक्रांतजनप्रसंगरतपोधनाधीशपदाब्जभृंगः ॥
स भृंगराजः श्रितधर्मराजः पवित्रदुग्धान्नमिदं ससर्पिः ॥ ३२ ॥

ओं ऱ्हीं भृंगरा० ॥ ३२ ॥

ओं–मृषीकृताधर्मपरप्रभावं मृषोक्तिदूरं मृषनामधेयम् ॥

---

'रक्ष इति' हा श्लोक म्हणून जिनमार्गावर प्रेम करणाऱ्या राक्षस नांवाच्या देवाला मी ज्येष्ठमध अर्पण करितो.

'सगंधेति' हा श्लोक म्हणून गंधर्व नांवाच्या देवाला मी कापूर वगैरे सुगंधित पदार्थांनीं तृप्त करितो.

'यो विक्रमेति' हा श्लोक म्हणून यमाचा आश्रय घेणाऱ्या भृंगराज देवाला दूधभात अर्पण करितो.

'मृषीति' हा श्लोक म्हणून अधर्माचा प्रभाव दूर करणारा व असत्य न बोलणारा अशा मृषदेव नांवाच्या

रक्षोधिपायात्तमुदारशार्क्के माषान्नसंतर्पितमातनोतु ॥ ३३ ॥

ओं न्हीं मृषदेव० ॥

ओं-तपोधनाजन्यनिवारणार्थं वनाश्रमद्वारि सदा निषण्णम् ॥

दौवारिकं सेवितयातुधानं संतर्पयेऽहं वरशालिपिष्टैः ॥ ३४ ॥

ओं न्हीं दौवारिक० ॥

ओं-सुग्रीव यातानुतवीणया वै गायन्नितांतं गुणिनां गुणौघम् ॥

सुग्रीवदेवः श्रितपाशहस्तः प्रमोदवान्मोदकदानतोऽस्तु ॥

ओं न्हीं सुग्रीव० ॥ ३५ ॥

ओं विभांति पुंसां गुणसंकथायां पुष्पावदाताः खलु यस्य दंताः ॥

स पुष्पदंतो वरुणान्तिकस्थः पुष्पाणि गृण्हातु जलान्वितानि ॥ ३६ ॥

ओं न्हीं पुष्पदंत० ॥ ३६ ॥

---

देवाला मी उडीदाच्या अन्नानें तृप्त करितो.

'तपोधनेति' हा श्लोक म्हणून तपस्व्यांचा उपसर्ग नेहमी दूर करणाऱ्या दौवारिक नांवाच्या देवाला मी उत्कृष्ट साळीच्या चूर्णानीं तृप्त करितो

'सुग्रीवेति' हा श्लोक म्हणून ज्यानें वरुणाचा आश्रय घेतला आहे व जो गुणी लोकांचे गुण वर्णन करितो त्या सुग्रीव देवाला मी मोदक अर्पण करितो.

'विभांतीति' हा श्लोक म्हणून वरुणाश्रित अशा पुष्पदंतास मी पाण्यासहित पुष्पें अर्पण करितो.

संपत्संपादकदयामयमहायागप्रत्यूहव्यूहातिक्रमार्थमावाहनादिपुरःसरसमुचितरापर्याक्रमं यथाक्रमसु-पक्रमामहे । आवाहनादिपुरःसरप्रत्येकपूजाप्रतिज्ञापनाय तृतीयमंडले पुष्पाक्षतं क्षिपेत् ॥

अथ प्रत्येकपूजा ॥

वामान्योर्ध्वकरद्वयेन परशुं धत्तेऽक्षमालामधः ।
सव्यासव्यकरद्वयेन ललित यो बीजपूरं वरम् ॥
तं मूर्ध्ना कृतधर्मचक्रमनिशं गोवक्त्रकं गोमुखम् ॥
श्रीनाभेयजिनेंद्रपादकमलालोलालिमालापये ॥

ओं ह्रीं गोमुखाय ॥ १ ॥

चक्रं त्रिशूलं कमलं सृणिं वै । खड्गं च दंडं परशुं प्रधानं ।
बिभ्राणमिष्टाजितनाथपादं यजे महायक्ष चतुर्मुख त्वां ॥

ओं ह्रीं महाक्षाय ॥ २ ॥

सेवा करितात. ज्यांचें सम्यग्दर्शन दृढ नसतें असे भव्यजीव ऐहिक फलाच्या आशेनें यांची पूजा करितात. अशा या यक्षांची जिनयज्ञामध्यें आलेली विघ्नें यांनीं दूर करावी. म्हणून मी पूजा करितो.

( १ ) 'वामान्योर्ध्वमिति' हा श्लोक म्हणून गोमुख यक्षाची पूजा करावी. हा यक्ष वर केलेल्या डाव्या दोन हातांनीं क्रमानें परशु व अक्षमाला धारण करितो व खालीं केलेल्या दोन हातांनीं बीजपूर नावाचें फळ धारण करितो. याच्या डोक्यावर धर्मचक्र असतें. याचें तोंड गाईच्या तोंडाप्रमाणें आहे. हा आदिनाथजिनाच्या चरणांचा भक्त आहे.

( २ ) 'चक्रमिति' हा श्लोक म्हणून महायक्षाची पूजा करावी. याच्या हातांत क्रमानें चक्र, त्रिशूल, क-

सव्यैः करैश्चक्रमासिं सृणिं यो दंडं त्रिशूलं सितकर्त्रिकां च ॥
अन्यैर्बिभर्ति श्रितसंभवं तं यजे त्रिनेत्रं त्रिमुखाख्ययक्षं ॥

ओं ऱ्हीं त्रिमुखाय ॥ ३ ॥

कोदंडसत्खेटकवामहस्तं वामान्यहस्तोद्धृनबाणखड्गं ॥
यक्षेश्वर त्वामभिनंदनार्हत्पादांब्जभृंगं प्रयजे प्रसीद ॥

ओं ऱ्हीं यक्षेश्वराय ॥ ४ ॥

ऊर्ध्वस्थिताभ्यां फणिनौ कराभ्यां अधःस्थिताभ्यां दधतं प्रदानम् ॥
फलं प्रयक्ष्ये सुमतीशभक्तं श्रीतुंबुरं सर्पमयोपवीतं ॥

ओं ऱ्हीं तुंबुराय ॥ ५ ॥

---

मल, अंकुश, तरवार, दंड व परशु हे पदार्थ आहेत. अजितनाथाचा हा भक्त आहे. याला चार मुखें आहेत.

( ३ ) 'सव्यैः करैः' हा श्लोक ह्मणून त्रिमुखाची पूजा करावी. हा यक्ष उजव्या हातांनीं चक्र, खड्ग, अंकुश, आणि डाव्या हातांत दंड, त्रिशूल, व कातर हे पदार्थ धारण करितो. संभव जिनाचा हा पदभक्त आहे. याला तीन तोंडें आहेत.

( ४ ) 'कोदंडसत्खेटकेति' हा श्लोक ह्मणून यक्षेश्वर नांवाच्या यक्षाची पूजा करावी. हा आपल्या डाव्या हातांत धनुष्य व ढाल धरतो व याच्या उजव्या हातांत बाण आणि तरवार आहे. हा अभिनंदन तीर्थकराचा सेवक आहे.

( ५ ) 'उर्ध्वस्थिताभ्यामिति' हा श्लोक ह्मणून तुंबुर यक्षाची पूजा करावी. हा यक्ष सुमति तीर्थकराचा पदभक्त आहे. हा वर केलेल्या दोन हातामध्यें दोन सर्प धारण करितो खालीं केलेल्या दोन हातामध्ये प्रदान व फल धारण करितो. याच्या गळ्यांत सर्पाच्या आकृतीचें यज्ञोपवीत आहे.

खेटोभयोद्भासितसव्यहस्तं कुंतेष्टदानस्फुरितान्यपाणिम् ॥
पद्मप्रभश्रीपदपद्मभृंगं पुष्पाख्ययक्षेश्वरमर्चयामि ॥

ओं न्हीं पुष्पयक्षाय ॥ ६ ॥

यमोग्रदंडोपमचंडदंडं सव्येन चासव्यकरेण शूलम् ॥
बिभ्राणमर्चामि सुपार्श्वभक्तं मातंगयक्षं कुटिलाननोग्रम् ॥

ओं न्हीं मातंगयक्षाय ॥ ७ ॥

सव्येन धत्ते परशु फलं यस्तथाक्षमालां च वरं परेण ॥
करद्वयेन प्रयजे त्रिनेत्रं श्यामं तमिंदुप्रभभक्तिभारम् ॥

ओं न्हीं श्यामाय ॥ ८ ॥

यजामहे शक्तिफलाक्षमालावरांकवामेतरहस्तयुग्मम् ॥

---

(६) 'खेटोभयोद्भासितमिति' हा श्लोक म्हणून पद्मप्रभ जिनाचा परभक्त अशा पुष्पयक्षाची पूजा करावी. याच्या उजव्या दोन हातांत ढाली व डाव्या दोन हातांत भाला आणि वर हे आहेत.

(७) 'यमोग्रेति' हा श्लोक म्हणून सुपार्श्वभक्त अशा मातंग यक्षाची पूजा करावी. याच्या दोन हातांत दंड व शूल असतात.

(८) 'सव्येनेति' हा श्लोक म्हणून चंद्रप्रभ जिनाच्या श्याम यक्षाची पूजा करावी. हा यक्ष आपल्या उजव्या दोन हातांत परशु, व डाव्या दोन हातांत अक्षमाला व वर असे पदार्थ धारण करितो याला तीन डोळे आहेत.

(९) 'यजामहे इति' हा श्लोक म्हणून पुष्पदंत जिनाच्या अजित यक्षाची पूजा करावी. याच्या डाव्या व

पुष्पेषुनिष्पेषकपुष्पदंतश्रीपादभक्ताजितयक्षनाथम् ॥

ओं ऱ्हीं अजितयक्षाय ॥ ९ ॥

सचापदंडोर्जितखेटवज्रसव्योद्धपाणिं नुतशीतलेशम् ॥
सव्यान्यहस्तेषु परश्वसीष्टदानं यजे ब्रह्मसमाख्ययक्षम् ॥

ओं ऱ्हीं ब्रह्मयक्षाय ॥ १० ॥

सव्यान्यहस्तोद्धृतसात्रिशूलदंडाक्षमालाफलमीश्वराख्यम् ॥
यक्षं त्रिनेत्रं परितर्पयामि श्रेयोजिनश्रीपददत्तचित्तम् ॥

ओं ऱ्हीं ईश्वरयक्षाय ॥ ११ ॥

हस्तैर्धनुर्बभ्रूफलानि सव्यैरन्यैरिषुं चारुगदां वरं च ॥
धरंतमर्चामि कुमारयक्षं त्रिविक्रमाराधितवासुपूज्यम् ॥

ओं ऱ्हीं कुमारयक्षाय ॥ १२ ॥

उजव्या हातांत शक्ति, फल, अक्षमाला व वर असे पदार्थ आहेत.

[ १० ] 'सचापेति' हा श्लोक ह्मणून ब्रह्मयक्षाची पूजा करावी. हा शीतल जिनाचा यक्ष आहे. हा डाव्या हातांनीं धनुष्य, दंड, ढाल, व वज्र धारण करितो उजव्या हातांनी परशु तरवार व वरदान हे धारण करितो.

[ ११ ] 'सव्येति' हा श्लोक ह्मणून ईश्वर नांवाच्या श्रेयान् जिनाच्या यक्षाची पूजा करावी. हा यक्ष डाव्या व उजव्या हातात त्रिशूल. दंड, अक्षमाला व फल हे पदार्थ धारण करितो

( १२ ) 'हस्तैरिति' हा श्लोक ह्मणून वासुपूज्य जिनाच्या कुमारयक्षाची पूजा करावी. हा यक्ष डाव्या हातांनीं धनुष्य, बभ्रू व फल हे पदार्थ व उजव्या हातात बाण, गदा व वर हे पदार्थ धारण करितो.

ऊर्ध्वाष्टहस्तविलसत्परशुं चतुर्भिः खड्गामलाक्षमणिखेटकदंडमुद्राः ॥
शेषैःकरैश्च दधत विमलेशभक्तं नाम्नोर्थतः षण्मुखमर्चयामि ॥

ओं र्‍हीं षण्मुखाय ॥ १३ ॥

सव्यैःकशाहलफलान्यपसव्यहस्तैर्बिभ्राणमंकुशसशूलसरोरुहाणि ॥
पातालक त्रिफणनागशिरस्त्रिवक्त्रमर्चाम्यनंतजिनमादरतोर्चयन्तम् ॥

ओं र्‍हीं पातालयक्षाय ॥ १४ ॥

चक्रं पविं चांकुशमुद्वहन्तं सव्यैःपरैर्मुद्गरमक्षमालाम् ॥
वरं च ससेवितधर्मनाथं त्रिवक्त्रकं किन्नरमर्चयामि ॥ १५ ॥

ओं र्‍हीं किन्नरयक्ष ॥

---

( १३ ) 'ऊर्ध्वाष्टेति' हा श्लोक ह्मणून विमल जिनाच्या षण्मुख यक्षाची पूजा करावी. याला आठ हात आहेत त्यापैकी चार हातात परशु नावाचे शस्त्र आहे व बाकीच्या हातांत, तरवार, अक्षमाला, खेटक व दंड हे पदार्थ आहेत.

( १४ ) 'सव्यैः कशेति' हा श्लोक ह्मणून अनंत जिनाच्या पाताल यक्षाची पूजा करावी. हा यक्ष आपल्या डाव्या हातानी चाबूक, हल नावाचें शस्त्र व फल आणि डाव्या हातांत अंकुश, कमल, व शूल हे पदार्थ धारण करितो.

१५ 'चक्रमिति' हा श्लोक ह्मणून किन्नर यक्षाची पूजा करावी. हा यक्ष धर्मनाथजिनाचा सेवक आहे. याच्या हातांत चक्र, वज्र, अंकुश, मुद्गल, अक्षमाला व वर असे पदार्थ आहेत. याला तीन तोंडें आहेत.

पद्मं फलं संदधतं कराभ्यां अधःस्थिताभ्यामुपरिस्थिताभ्याम् ॥
वज्रं च चक्रं गरुडाव्हयं त्वामर्चामि शांतिश्रित वक्रवक्त्र ॥ १६ ॥
ओं ऱ्हीं गरुडाय ॥
उर्द्धद्विहस्तोद्धृतनागपाशमधोद्विहस्ताश्रितचापबाणम् ।
गंधर्वयक्षेश्वर कुंथुनाथसेवोत्थितानंदथुमर्चये त्वाम् ॥
ओं ऱ्हीं गंधर्वयक्षाय ॥ १७ ॥
सव्यैः करैरिह शरासनवज्रपाशसमुद्गगंकुशवरानपरैर्धरन्तम् ॥
बाणांबुजोरुफलमाल्यमहाक्षमालालीला यजाम्यरमितं त्रिदशं च खेंद्रं ॥
ओं ऱ्हीं खेन्द्राय ॥ १८ ॥

---

१६ ' पद्मं फलमिति ' हा श्लोक म्हणून गरुड नांवाच्या यक्षाची पूजा करावी. हा यक्ष शांतिनाथ तीर्थकराचा पदभक्त आहे. हा आपल्या खाली असलेल्या दोन हातांत कमळ, फळ आणि वर केलेल्या दोन हातांत वज्र व चक्र धारण करितो. याचे तोंड वक्र आहे.

१७ ' उर्ध्वद्विहस्तेति ' हा श्लोक म्हणून कुंथुनाथभक्त अशा गंधर्वयक्षाची पूजा करावी. हा आपल्या वरच्या दोन हातामध्यें नागपाश व खालच्या दोन हातांत धनुष्य व बाण धारण करितो.

१८ ' सव्यैरिति ' हा श्लोक म्हणून खेंद्र नांवाच्या यक्षाची पूजा करावी. हा यक्ष अरजिनाचा भक्त आहे. याने आपल्या डाव्या पाच हातात धनुष्य, वज्रपाश, मुद्गर, अंकुश आणि वर व उजव्या हातांत बाण, कमळ, फल, माळा, व अक्षमाला हे पदार्थ धारण केले आहेत.

सव्यैः करैः फलककार्मुकदंडपद्मानन्यैः कृपाणशरपाशवरान्दधानं ॥
दुर्वारवीर्यचतुराननं पूजये त्वां श्रीमल्लिनाथपदभक्तकुबेरयक्षम् ॥
ओं ऱ्हीं कुबेराय ॥ १९ ॥
यजे जटाजूटतिरीटजुष्टविशिष्टभावाष्टमुखं त्रिनेत्रम् ॥
सखेटखड्गं सफलेष्टदानं श्रीसुव्रतेशो वरुणाख्ययक्षम् ॥
ओं ऱ्हीं वरुणयक्षाय ॥ २० ॥
यः खेटखड्गौ दृढचापबाणौ सृण्यंबुजे चक्रवरौ दधानः ॥
हस्ताष्टकेनोग्रचतुर्मुखं तं नमीशयक्ष भृकुटिं यजामि ॥
ओं ऱ्ही भृकुटियक्षाय ॥ २१ ॥
घनं कुठारं च बिभर्ति दंडं सव्यैः फलैर्वज्रवरौ च योऽन्यैः ॥

---

१९ 'सव्यैः करैरिति' हा श्लोक ह्मणून मल्लिनाथजिनभक्त अशा कुबेर यक्षाची पूजा करावी हा दंड, पद्म, फल, धनुष्य हे डाव्या हातात व उजव्या हातात तरवार, बाण, पाश व वर हे पदार्थ धारण करितो. यास चार तोंडें आहेत.

२० 'यजे इति' हा श्लोक ह्मणून मुनिसुव्रत जिनाच्या वरुण यक्षाची पूजा करावी. याला आठ तोंडें आहेत व तीन डोळे आहेत. याच्या हातांत खेट (ढाल) तरवार, फल व दान हे पदार्थ आहेत

२१ 'यः खेटेति' हा श्लोक ह्मणून नमिजिनभक्त अशा भृकुटि यक्षाची पूजा करावी. हा यक्ष ढाल, तरवार, धनुष्य, बाण, अंकुश, कमल, चक्र व वर हे पदार्थ धारण करितो.

२२ 'घनमिति' हा श्लोक ह्मणून नेमिजिनाचा भक्त अशा गोमेध यक्षाची पूजा करावी. हा यक्ष ढाल

नाम् ॥ यजमानयाजकनपदजनेश्वरादिविघ्नपरिहारद्वारेण सर्वज्ञयज्ञसहकारितां आचरंतीनाम् ॥ परमगंभीरामोघस्यात्कारलांछनजिनशासनविद्वेषिविशसनव्याजृंभणप्रभावचक्रचक्रेश्वरीप्रभृतिशासन देवतानाम् ॥ सकलसंपत्संपादकदयामयमहायागप्रत्यूहव्यूहातिक्रमार्थमावाहनादिपुरःसरसमुचितसपर्याक्रमं यथाक्रमसुपक्रमामहे । आवाहनादिपुरःसरप्रत्येकपूजाप्रतिज्ञापनाय चतुर्थमंडले पुष्पाक्षतं क्षिपेत् ॥

अथ प्रत्येकपूजा ।

या देव्यूर्ध्वकरद्वयेन कुलिशं चक्राण्यधःस्थैः करैः ॥
अष्टाभिश्च फलं वरं करयुगेनाधत्त एवाथवा ॥
धत्ते चक्रयुगं फलं वरमिमां दोर्भिश्चतुर्भिःश्रिताम् ॥

रत्न, सोने, प्रवाल, सोनें, सोनें, सोने, पाचरत्न, सोने, हिरवा, हिरवा, पद्मरागरत्न, नीलरत्न याप्रमाणे यांचा रंग आहे.

या यक्षींची वाहने या प्रमाणें आहेत.:—निळें कमळ, लोहासन, पक्षी, हंस, हत्ती, घोडा, बैल, रेडा, कासव, डुकर हरिण, मगर, अजगर, हंस, वाघ, मोर, डुकर, हंस, अष्टापद, काळा साप, मगर, सिंह, कुकुट सर्प, व हंस. वृषभादि चोवीस तीर्थकरांच्या डाव्या बाजूला यांचें स्थान असतें. त्या त्या तीर्थकराबरोबर यांची पूजा करावी. यजमान, पूजक वगैरेची विघ्ने ह्या दूर करितात व जिनेश्वराच्या पूजेमध्यें या मदत करितात. स्याद्वादाला धारण करणाऱ्या जिनशासनाचा द्वेष करणाऱ्यांचा या नाश करून जैनधर्माची प्रभावना करितात. यास्तव जिनयज्ञविघ्नपरिहार करण्याकरितां चतुर्थ मंडलामध्ये यांची पूजा करण्यासाठी पुष्पाक्षता क्षेपण करावे

१ 'या देव्यूर्ध्वकरेति' हा श्लोक ह्मणून चक्रेश्वरीदेवीची जलादिकांनीं पूजा करावी. ही आदिनाथ जिनाच्या

ओं ऱ्हीं चामुंडि ॥१०

दोर्भिश्चतुर्भिर्द्रुघणं पयोजं त्वां बिभ्रतीं कुंभमभीष्टदानाम् ॥
श्रेयोजिनश्रीपदपद्मभृंगीं गौरीं यजे विघ्नविघातकारीम ॥ ११ ॥

ओं ऱ्हीं गोमेधयक्षि ॥११॥

लीलाबुजांकोपरि हस्तयुग्मामधोद्विहस्ते मुरालेष्टदानाम् ॥
त्वा वासुपूज्यप्रसितान्तरंगां गांधारि मान्ये बहु मानयामि ॥१२॥

ओं ऱ्हीं विद्युन्मालिनि ॥ १२ ॥

ऊर्ध्वेन हस्तद्वितयेन सर्पावधःस्थितेनोर्जितचापबाणौ ॥
यजे वहन्तीं विमलेशयक्षीं वेरोटिकां त्रोटितविघ्नकोटिम् ॥ १३ ॥

ओ ऱ्हीं विद्यादेवि ॥१३॥

---

हिनें धारण केले आहेत.

११ 'दोर्भिरिति' हा श्लोक ह्मणून गोमेधयक्षीचें जी श्रेयान् जिनाची भक्त आहे—पूजा करावी. हिचें दुसरें गौरी असें नांव आहे. ही आपल्या चार हातानीं मुद्गर, कमळ, कुंभ, इष्टदान हे पदार्थ धारण करिते.

१२ 'लीलांबुजेति' हा श्लोक ह्मणून वासुपुज्यजिनाच्या विद्युमालिनी शासनदेवतेची पूजा करावी. ही आपल्या दोन हातांत कमल धारण करिते व खालच्या हातांत मुसळ व इष्टदान धारण करिते.

१३ 'ऊर्ध्वेनेति' हा श्लोक ह्मणून विमलजिनाच्या वैरोटी यक्षीचे पूजन करावें. हिला विद्यादेवी हें ही नांव दिलें आहे ही वरच्या दोन हातांनी सर्प व खालच्या दोन हातांनी धनुष्य व बाण धारण करिते.

ताक्ष्यं तां पुरुतीर्थपालनपरां चक्रेश्वरीं संयजे ॥

ओं ऱ्हीं अप्रतिचक्रे चक्रेश्वरी आगच्छ २ संवौषट्० ॥ जलम् ॥ १ ॥

ऊर्ध्वद्विहस्तोद्धृतचक्रशंखां अधोद्विहस्ताभयदानमुद्राम् ॥

प्रभावयंतीमजितेशतीर्थं यजेऽरिधिक्कारिणि रोहिणि त्वाम् ॥

ओं ऱ्हीं अजिते ॥ २ ॥

धरोर्धचंद्रं परशुं फलं वै कृपाणपिंडीवरमादधानाम् ॥

यजामहे संभवनाथयक्षीं प्रज्ञप्तिसंज्ञां क्षपितारिशक्तिम् ॥

ओं ऱ्हीं नम्रेक्षि ॥ ३ ॥

या नागपाशं फलमक्षसूत्रं वरं बिभर्ति प्रवरप्रभावा ॥

---

तीर्थाचें पालन करिते. आपल्या वर असलेल्या दोन हातांनीं वज्र व खालच्या आठ हातांनीं फल वर, चक्र, वगैरे धारण करिते.

२ ' ऊर्ध्वेमिति ' हा श्लोक म्हणून अजिता देवीची पूजा करावी. ही वरच्या दोन हातांनीं चक्र, शंख आणि खालच्या दोन हातांनीं अभयदान व मुद्रा धारण करिते. अजितजिनाच्या तीर्थाची रक्षा ही करिते हिचें रोहिणी असेंहि नांव आहे.

३ ' धत्ते इति ' हा श्लोक म्हणून नम्रेक्षि देवतेचें पूजन करावें. ही देवी आपल्या हातांत. परशु, फल, तरवार पिंडी वर हे धारण करिते संभवनाथजिनाची ही यक्षी आहे हिचें प्रज्ञप्ति असेंहि नांव आहे.

४ ' या नागपाशेति ' हा श्लोक म्हणून दुरितारि देवीचें पूजन करावें. ही अभिनंदन जिनाची यक्षी आहे

अधिज्यधन्वोत्तममातुलुंगं निशातबाणं दधतीष्टदानम् ॥
समर्चितानंतमति प्रसन्ना भूयादिहानंतजिनेशयक्षी ॥ १४ ॥

ओं ऱ्हीं विजृंभणि ॥ १४ ॥

अभोरुहं कार्मुकमिष्टदानं धत्तेंकुशं मार्गणमुत्पलं च ॥
दधाति वै धर्मजिनेशयक्षी या मानसीमां बहु मानयामि ॥ १५ ॥

ओं ऱ्हीं परभृते ॥१५॥

रथांगपाणिं फलपूरहस्तामीडीशयां दानकरामजेयाम् ॥
शांतीशपादांबुजदत्तचित्तां कांतां महामानसि मानये त्वाम् ॥१६॥

ओं ऱ्हीं कंदर्पादेवि ॥ १६ ॥

चक्र समाक्रांतविरोधिचक्रं शंखं स्वभुकारकृतारिभीतिम् ॥

---

१४ ' अधिज्यधन्वेति ' हा श्लोक ह्मणून विजृंभणी देवीचे पूजन करावे. ही देवी धनुष्य, महाळुंग, तीक्ष्ण बाण, व दान हे धारण करिते. हिचे अनंतमति हेंहि नाव आहे व अनंत जिनाची ही यक्षी आहे.

१५ ' अंभोरुहमिति ' हा श्लोक ह्मणून परभृतायक्षीचे पूजन करावे. हिच्या हातात कमळ, धनुष्य, दान, अंकुश, बाण, निळे कमळ, हे पदार्थ आहेत. ही धर्म जिनाची भक्त आहे. हिचे मानसी असेहि नांव आहे.

१६ ' रथांगपाणिमिति ' हा श्लोक ह्मणून शांतिजिनाच्या कंदर्पादेवीची पूजा करावी. ही देवी चक्र, फलपूर, खड्ग व दान हे पदार्थ धारण करिते. हिचे महामानसी असेहि नाव आहे.

१७ ' चक्रमिति ' हा श्लोक ह्मणून गांधारीची पूजा करावी. ही आपल्या हातांत चक्र, शंख, तरवार, व वर

अत्युग्रखड्गं वरमादधानां यजे जयां कुंथुजिनेन्द्रयक्षीम् ॥१७॥

ओं ऱ्हीं गांधारिणि ॥ १७ ॥

स्वर्णाभां हंसगां सर्पमृगवज्रवरोद्धुराम् ॥

चाये तारावतीं त्रिंशच्चापोच्चप्रभुभाक्तिकाम् ॥१८॥

ओं ऱ्हीं कालिदेवि ॥ १८ ॥

हस्तद्वयेनोपरिमेन खेटं कृपाणमन्येन फलं प्रदानम् ॥

उद्बिभ्रती मल्लिजिनेंद्रयक्षी गृण्हातु पूजामपराजितेयम् ॥१९॥

ओं ऱ्हीं अनातजदेवि ॥

या खेटकं मंगलमातुलुंगं कृपाणमुग्रं वरमादधाति ॥

सा नः प्रसन्ना मुनिसुव्रतार्हद्भक्तास्तु भव्या बहुरूपिणीष्टया ॥

---

हे धारण करिते. कुंथुजिनाची ही भक्त आहे.

१८ ' स्वर्णेति ' हा श्लोक म्हणून तारावतीची पूजा करावी. हिच्या हातांत सर्प, हरिण, वज्र, व वर हे पदार्थ आहेत. अरजिनाची ही भक्त आहे. हिचा सुवर्णाप्रमाणें वर्ण आहे व हिचें हंस वाहन आहे हिचे काली असेंहि नांव आहे.

१९ ' हस्तेति ' हा श्लोक म्हणून अनजातदेवीची पूजा करावी. ही मल्लिजिनांची यक्षी आहे. हिचें अपराजिता असेंहि नांव आहे. ही आपल्या वर केलेल्या दोन हातांनीं ढाल व तलवार धारण करिते आणि खालच्या दोन हातांनी फळ व प्रदान धारण करिते

२० ' या खेटकमिति ' हा श्लोक म्हणून मुनिसुव्रतजिनाच्या सुगंधिनी शासनदेवतेचें पूजन करावें. हिचें

ओं ऱ्हीं सुगंधिनि ॥ २० ॥

इष्टयास्तु तुष्टा धृतयष्टिखेटसव्यद्विहस्तान्यकरद्वयेन ॥
दिव्याक्षमालामसिमादधानांचामुंडिकां श्रीनमिमानमन्तीम् ॥ २१ ॥

ओं ऱ्हीं कुसुममालिनि ॥

धत्ते वामकटौ प्रियंकरसुतं वामे करे मंजरी—
माम्रस्यान्यकरे शुभंकरतुजो हस्तं प्रशस्ते हरौ ॥
आस्ते भर्तृचरे महाम्रविटपिच्छायं श्रिताभीष्टदा ॥
याऽसौ तां नुतनेमिनाथपदयोर्नम्रामिहाम्रां यजे ॥ २२ ॥

ओं ऱ्हीं कुष्मांडिदेवि ॥

पाशाद्यन्वितषड्भुजारिजयदा ध्याता चतुर्विंशतिं ॥

---

बहुरूपिणी असेंहि नांव आहे. हिच्या हातात ढाल, महाळुंग, तरवार व वर असे पदार्थ असतात.

२१ 'इष्टयेति' हा श्लोक म्हणून कुसुममालिनी देवतेचें पूजन करावें. ही नमिजिनाची भक्त आहे. हिचे चामुंडा असेंहि नांव आहे. ही डाव्या हातांत दंड व ढाल आणि उजव्या हातांत अक्षमाला व तरवार धारण करिते.

२२ 'धत्ते इति' हा श्लोक म्हणून नेमिनाथ जिनाच्या शासनदेवतेचें पूजन करावें. हिचें 'आंबा' असेंहि नांव आहे. हिनें आपल्या कडेवर प्रियंकर नावाच्या मुलास व शुभंकर नावाच्या मुलास आपल्या हातीं घेतलें आहे. पूर्वी जो पति होता तोच हिचें या भवामध्यें सिंह वाहन झाला आहे. हिच्या हातांत आंब्याची मंजरी आहे व ही आंब्याच्या झाडाखाली उभी राहिली आहे. हिची कथा पुण्यास्रवपुराणांत पहावी.

अथ पंचममंडलस्थापितदिक्कन्यकार्चनविधानम् ॥

मेरोर्दक्षिणतो महाकुलकुभृत्पद्माकराम्भोरुह—
प्रासादस्थितिकाः शचीपतिवधूः श्रीन्हीधृतीरंबिकाः ॥
तथैवोत्तरतस्तथोत्तरसुरेड्गृह्यां च कीर्तिं धियं
लक्ष्मीं शांतिकरीं च शांतिमिह सत्पुष्टिं च पुष्टिं यजे ॥
श्र्यादिदेवीसमुदायपूजाविधानाय पूर्वविधिं विदध्यात् ॥ १ ॥

ओं विविधमणिविचित्रितोभयपार्श्वहेमादिमयाहिमवदादिकुलाचलाधित्यकानादिसिद्धपद्मादिसरोवरांतरसामानिकपरिषदध्युषितपरिवारवारिजपरीतपुष्करमध्यशारदशशांकविशदप्रासादनिवासिनीनाम् ॥ कांतिलज्जाधैर्यजिनार्यादिकीर्तनलोकोत्तरज्ञानत्रिवर्गसाधनांगव्यापकत्वधर्मानर्हन्मातुरापादयंतीनाम् । श्रीन्हीधृतिकीर्तिबुद्धिलक्ष्मीनामदेवीनाम् । अलक्ष्यशचीप्रत्यक्ष्यान्यलक्ष्यालक्ष्यांगमंगलश्र्यादिदेवी—विहितजिनमातृभोगादिविघ्नोपशमनादिमनोनिर्वृतिनिर्वर्तकशांतिदेवीसहितानाम् ॥ प्रतिफलितेंदुबिंबादर्शसन्निभोदराजितांत्विक्कांग्रभर्तृगुणभोगभक्तादिपुष्टिविधायिपुष्टिदेवीसमन्वितानाम् । पीतारुणपीत-

---

१ 'मेरोरिति' हा श्लोक म्हणून श्र्यादि देवींची पूजा करण्याकरितां, पूर्व विधि करावा. मेरूच्या दक्षिणेकडील जे कुलाचल पर्वत अर्थात् हिमवान्, महाहिमवान्, निषध, यावर जी सरोवरं आहेत त्यांतील कमलामध्यें श्री ऱ्ही, व धृति या देवतांचे महाल आहेत. या तीन देवता सौधर्म इंद्राच्या पत्नी आहेत. मेरु पर्वताच्या उत्तरेला नील, रुक्मि व शिखरी असे कुलाचल पर्वत आहेत. त्यावर असलेल्या सरोवरातील कमलामध्यें कीर्ति, बुद्धि व लक्ष्मी या देवी राहतात. या उत्तरेन्द्राच्या स्त्रिया होत. शांति व पुष्टि अशाही दोन देवी आहेत. या मातेची सेवा करितात,

शातकुंभकांचनकनकतपनीयहिरण्यप्रभापवनानाम् । पुष्पमुखकलशहस्तानामष्टदिक्कुमारीणां । सकलसंपत्संपादकदयामयमहायागप्रत्यूहव्यूहातिक्रमार्थमाव्हानादिपुरःसरसमुचितसपर्याक्रमं यथाक्रमं पंचममंडलेपु पुष्पाक्षतं क्षिपेत् ॥



अथ पृथगिष्टिः ।

श्रियं नरागोचरकांतिरूपश्रियं जगन्मातरि योजयन्तीम् ॥
संफुल्लफुल्लाननशातकुंभकुंभांकहस्तां विधिना धिनोमि ॥ १ ॥
ओं ऱ्हीं सुवर्णवर्णे चतुर्भुजे पुष्पमुखकलशहस्ते श्रीदेवि आगच्छ २ । संवौषट् ॥ जलम् ॥
ऱ्हियं लसद्बोधसहायसौम्यऱ्हियं जिनांबाधृतिपोपयंतीम् ॥
संफुल्ल० ॥ ओं ऱ्हीं रक्तवर्णे० ऱ्हीदेवि ॥ २ ॥

---

मातेला भोगाच्या सामग्री पुरवितात. विघ्न दूर करितात तिचे मन संतुष्ट करितात. या देवतांचा वर्ण पिवळा. तांबडा, पिंवळा, पिवळा, पिंवळा, पिवळा, पिंवळा, पिंवळा असा आहे. ज्याच्या मुखावर पुष्प आहे असा कलश ह्या हातांत धारण करितात. यांचें जिनयज्ञ निर्विघ्न पार पडावा ह्मणून मी आव्हान करितो

'ओं विविधेति' मंत्र ह्मणून पांचव्या मंडलामध्ये पुष्पाक्षताक्षेपण करावें. आतां प्रत्येक पूजा.

१ 'श्रियमिति' हा श्लोक ह्मणून व त्याचा मंत्र ह्मणून श्रीदेवीचें आव्हान वगैरे करून तिला जलादि अर्घ्य द्यावें ही श्रीदेवी जिनेश्वराच्या मातेच्या ठिकाणी मनुष्यामध्यें न आढळून येणारी अशी दिव्यकांति योजित असते. या देवीला चार हात असतात.

२ 'ऱ्हियमिति' हा श्लोक ह्मणून ऱ्ही देवीची पूजा करावी. ही देवता जिनमातेमध्यें ज्ञानानें संयुक्त अशी लाज उत्पन्न करिते.

धृतिं ससामानिकदिक्कुमारीं धृतिं जिनेशो जननीं नयन्तीम् ॥
संफुल्ल० ॥ ओं ऱ्हीं सुवर्णवर्णे धृतिदेवि ॥ ३ ॥
कीर्तिं जिनेंद्रस्तवनादिरूपां कीर्तिं विभोर्मातरि रांजयंतीम् ॥
संफुल्ल० ॥ ओं ऱ्हीं सुवर्णवर्णे कीर्तिदेवि ॥ ४ ॥
बुद्धिं प्रबुद्धाखिललोकयात्रां बुद्धिं नयतीं जननीं जिनानाम् ॥
संफुल्ल० ॥ ओं ऱ्हीं सुवर्णवर्णे बुद्धिदेवि ॥ ५ ॥
लक्ष्मीं त्रिवर्गोचितसाधनार्थां लक्ष्मीं प्रभोर्मातरि साधयन्तीम् ॥
संफुल्ल० ॥ ओं ऱ्हीं सुवर्णवर्णे लक्ष्मीदेवि ॥ ६ ॥
शांति मनोनिर्वृतिमंतरायशांतिं च जैनीं जननीं नयन्तीम् ॥

३ 'धृतिमिति' हा श्लोक ह्मणून या धृतिदेवतेची पूजा करावी ही देवता जिनाच्या मातेच्या ठिकाणी संतोष उत्पन्न करिते.

४ 'कीर्तिमिति' हा श्लोक ह्मणून कीर्तिदेवतेची पूजा करावी. जिनेन्द्रस्तवनादिरूप कीर्तीची योजना ही देवता मातेच्या ठिकाणी करिते.

५ 'बुद्धिमिति' हा श्लोक ह्मणून बुद्धिदेवतेची पूजा करावी. ही देवता सगळ्या जगाचें ज्ञान मातेच्या ठिकाणीं योजित असते.

६ 'लक्ष्मीमिति' हा श्लोक ह्मणून लक्ष्मीदेवतेचें पूजन करावें. ही देवता त्रिवर्गसाधनाला समर्थ अशी लक्ष्मी जिनमातेच्या ठिकाणी योजित असते.

'शांतिमिति' हा श्लोक ह्मणून शांति देवतेची पूजा करावी. ही देवता जिनमातेच्या ठिकाणी मनःसमाधान

संफुल्ल० ॥ ओं ऱ्हीं सुवर्णवर्णे शांतिदेवि ॥ ७ ॥
पुष्टिं जिनांबावपुरादिपूचैः पुष्टिं विशिष्टामुपपादयंतीम् ॥ ८ ॥
संफुल्ल० ॥ ओं ऱ्हीं सुवर्णवर्णे० पुष्टिदेवि ॥ ८ ॥
इत्थं सारसपर्ययाच्च महिना यूयं प्रसन्नाः स्त नः ॥
सांगा स्ताद्धिकलापि मोहनुखतो युष्मत्प्रसादादियम् ॥
सर्वज्ञाध्वरविघ्नसाधन दत्तं सर्वाश्च दिक्कन्यकाः ॥
पूर्णांगा विधिपूर्तिपूर्णफलदा पूर्णाहुतिं वोर्पये ॥ ९ ॥
इष्टप्रार्थनापुरःसरं पूर्णाहुतिः । ९ ॥

इति दिक्कन्यकार्चनम् ॥

अथ तत्रैव मंडले दिक्पालकार्चनविधानम् ॥

एतत्सर्वजनीनजैनसवनप्रत्यूहविध्वंसनप्रोद्भूताप्रतिमप्रभावविहितप्रख्यातपूजांचितान् ॥

---

उत्पन्न करिते.

८ 'पुष्टिमिति' हा श्लोक म्हणून पुष्टिदेवतेची पूजा करावी. ही देवता जिनमातेच्या शरीरांत पुष्टि उत्पन्न करिते.

९ 'इत्थमिति' हा श्लोक म्हणून इष्टप्रार्थनापुरःसर पूर्णाहुति द्यावी.

'एतत्सर्वेति' हा श्लोक म्हणून दिक्पालांची पूजा करण्याकरितां पूर्वविधि करावा. हे दिक्पाल जिनपूजेंतील विघ्न दूर करितात. म्हणून यांचे पूजन करावे. या दिक्पालांची नावें या प्रमाणें— इंद्र, अग्नि, यम, राक्षस, वरुण,

स्वस्वातुच्छपरिच्छदानिहदशामन्याप्रधृष्यामितान्दिक्पालाञ्जगदेकपालकजिनाधीशाध्वरे व्याव्हये ॥१॥ दिक्पालकसमुदायपूजाविधानाय पूर्वविधिं विदध्यात् ॥

ओं विमलकलधौतखचितमणिमयाभरणभूषितैरावतच्छागरक्ताक्षऋक्षकरिमकरतुरगपुष्पकपुष्टांगशाक्राकारवाहनारूढानाम् ॥ ।नितांतचारुचामीकरातिबालभास्करा जनपुंजतमस्तोमसुधाकरसुवर्णस्वर्णशंशांकसंकाशशरीरप्रभाभिरामाणाम् ॥ कुलिशजाज्वलज्ज्वालाजालप्रचंडदंडमुद्गराहिपाशपादपशक्तित्रिशूलाप्रतिहतप्रभावप्रहरणानाम् । कमनीयकामिनीकुलललामशचीस्वाहाछायानैर्ऋतिवरुणानीवायुवेगीधनदेवीपार्वतीनाममहादेवीमुखांबुजदत्तदृष्टीनाम् ॥ पाकशासनपावककृतान्तकौणपपाशपाणिपवनपार्वतीशसखपार्वतीप्रियाभिधानलोकपालानाम् ॥ कूर्मगतासितांगसांकुशपद्मावतीप्रियफणीशकंठीरवारूढपांडुरतनुकुंतकररोहिणीजीवितेश्वरसहितानाम् ॥ सकलसंपत्संपादकदयामयमहायागप्रत्यूहव्यूहातिक्रमार्थ—मावाहनादिपुरःसरसमुचितसपर्याक्रमं यथाक्रममुपक्रमामहे । आवाहनादिपुरःसरप्रत्येकपूजाप्रतिज्ञापनाय पंचममंडले पुष्पाक्षतं क्षिपेत् ॥

---

वायु, कुबेर, महादेव अशी आहेत.यांची वाहनें ऐरावत, मेंढा, रेडा, अस्वल, मगर (हत्तीच्या आकृतीचा) घोडा, पुष्पक व पुष्ट बैल अशी आहेत. यांच्या शरीराचा रंग सोनें, बालसूर्य, काजळ, अंधार, चंद्र, सोनें, सोनें, चद्र या प्रमाणे आहे यांची आयुधें — वज्र, अग्निज्वाला, दंड, मुद्गर, नागपाश, वृक्ष, शक्ति, त्रिशूल, अशीं आहेत हीं आयुधें अतिशय प्रभावशाली आहेत. यांच्या स्त्रियांची नावे. यथाक्रमें-- शची, स्वाहा, छाया, नैर्ऋति, वरुणानी, वायुवेगी, धनदेवी, व पार्वती अशी होत. या सर्व परिवारासहित या दिक्पालकाना मी आवाहनादि पुरःसर बोलावितो हे येऊन जिनेश्वरपूजेंतील सर्व विघ्न नाहींशी करोत. असे म्हणून पांचव्या मंडलावर पुष्पाक्षताचे क्षेपण करावें.

अथ प्रत्येकपूजा ।

देहप्रभाद्विगुणभूपणदिव्यदीप्त्यालिप्तदिग्विवरमंतरितांतरायम् ॥
वज्रायुधं निजवधूवदनाब्जनेत्रं व्याव्हानये नुतजिनेन्द्रमहे महेंद्रम् ॥
ओं ऱ्हीं इंद्र आगच्छ २ संवौपट् इत्यादि ॥ इंद्राय स्वाहा इंद्राय इदमर्घ्यं० ॥

शोणभ्रूश्मश्रुकेशांबकमरुणरुचं जाज्वलज्वालशक्तिं
कुंडीं वामेक्षमालामितरकरतले बिभ्रतं सोपवीतम् ॥
स्वाहायुक्तं नियुक्तं जिनयजनविधेर्दीपधूपादिकारे ।
सद्वेदाघोपिसभ्यावृतमनलमलकारसारं यजेऽहम् ॥

ओं ऱ्हीं अग्ने ॥ २ ॥

भृंगांगासितभूरिभंगुरजटाजूटं शिखाडंबरो--
द्धिदंडोड्डमरं प्रचंडफणिभृत्सन्मंडनैर्मंडितम्
छायातुच्छमुखेन्दुसच्छविकृतानंदं सकालच्छविं ॥

१ 'देहप्रभेति' हा श्लोक ह्मणून इंद्राचे आव्हान करून अर्घ्य अर्पण करावे.

२ 'शोणभूरिति' हा श्लोक ह्मणून अग्नीचे आव्हान वगैरे करावें. आणि त्याला अर्घ्य द्यावें. अग्नीच्या भुवया, दाढी, केश व डोळे हे पिंगट आहेत. याची देहकांति तांबडी आहे. हा उजव्या हातांत कमंडलु व डाव्या हातांत अक्षमाळा धारण करितो. यांच्या गळयामध्ये यज्ञोपवीत आहे.

३ 'भृंगांगेति' हा श्लोक ह्मणून यमाचे आव्हान करून त्यास अर्घ्य द्यावें. यांच्या मस्तकावर जटाजूट आहेत.

कालं कालजकालधर्मरहिताधीशाध्वरे व्याह्वये ॥

ओं ऱ्हीं यम ॥ ३ ॥

कटकमुकुटमुद्राहारकेयूरमुख्याभरणकिरणभारोद्भासिताशांतरालम् ॥
अमितलसितकांतिं मुद्गरास्त्रं च रात्रिंचरपरिवृतमेतं व्याह्वये नैऋतीशम् ॥

ओं ऱ्हीं नैऋत्य ॥ ४ ॥

मुक्ताफलात्युज्ज्वलविद्रुमानुम्यूनप्रभूताभरणाभिरामम् ।
भीमाहिपाशं वरुणान्यधीशं यागेत्र यादःपतिमाह्वयामि ॥

ओं ऱ्हीं वरुण ॥ ५ ॥

चलद्विपुलभूरुहं कलितविस्फुरद्भूषणं ॥ लसन्मधुकरच्छविं चलितगात्रयंलोत्करं ॥
जगत्त्रितयजीवनं विरचिताखिलार्थेतरं ॥ समीरणमिहाह्वये समदवायुवेगीयुतम् ॥

ओं ऱ्हीं पवन ॥ ६ ॥

सर्पाकृति भूषणानी हा सुंदर दिसतो.

४ 'कटकेति' हा श्लोक म्हणून नैऋत्याची पूजा करावी. याच्या अंगावर कडे, मुकुट, अंगठ्या, हार वगैरे अलंकार आहेत व त्याचा प्रकाश सर्वत्र पडतो. या दिक्पालाची कांति कृष्ण आहे.

५ 'मुक्ताफलेति' हा श्लोक म्हणून वरुणाची पूजा करावी. हा दिक्पाल मोत्याचे व पोवळ्याचे अलंकार घालतो. याच्या हातांत नागपाश आहेत. या जिनपूजेत मी याला बोलावतो.

६ 'चलदिति' हा श्लोक म्हणून पवनाची पूजा करावी. याचे वृक्ष हे शस्त्र आहे. याचा वर्ण भुंग्यासारखा आहे. हा त्रैलोक्याचें जीवन आहे. याच्या स्त्रीचें वायुवेगी असे नांव आहे.

निधनरहितमुक्ताभूषणप्रौढवेषं । धनमुखनिजदेवीसन्मुखांभोजभृंगम् ॥
धनदमिह धनद्यैं सेव्यमाऽऽह्वानयेऽह । निधननिपुणशाक्तिं विद्विपामुद्वहन्तम् ॥
ओं ऱ्हीं कुबेर ॥ ७ ॥

कंकलीद्रुमपल्लवच्छविजटाजूटार्धचंद्रप्रभा
सांद्रीभूतभुजंगभूषणफणारत्नप्रभाभासुरम् ॥
भालाभीलविलोचनानलशिखातीक्ष्णत्रिशूलायुधम् ।
पार्वत्या धवमाव्हये गणवृतं दक्षाध्वरेऽध्वंसिनम् ॥

ओं ऱ्हीं ईशान ॥ ८ ॥
स्फटापरिगतारुणद्युमाणेबिंबशुंभन्माणि—
प्रभापटलपाटलीकृतासितांगविभ्राजितम् ॥
धृताकुशमनंकुशं सुगुणराझपद्मायुतम ॥

---

७ ‘ निधनेति ’ हा श्लोक म्हणून कुबेराची पूजा करावी. हा जिनपूजेमध्यें विघ्न करणाऱ्यांचा नाश करितो.

८ ‘ कंकलीति ’ हा श्लोक म्हणून ईशानाला अर्घ्य द्यावे. याच्या जटा अशोक वृक्षाच्या पानाप्रमाणे आहेत. याच्या मस्तकावर अर्धचंद्र आहे. सर्पभूषणे हा धारण करितो. याच्या तिसऱ्या डोळ्यातून अग्नीची ज्वाला निघते. याच्या हातात त्रिशूल आहे. याची पार्वती ही स्त्री आहे.

९ ‘ स्फटेति ’ हा श्लोक म्हणून धरणेन्द्राची पूजा करावी हा दिक्पाल नागदेवांनी युक्त आहे. याच्या फणावर मणि असल्यामुळें ते सुर्याप्रमाणे चकाकतात. याच्या हातांत अकुश आहे व याची पत्नी पद्मा आहे. तिच्या

फणाधरगणावृतं फणिमहींद्रमाव्हानये ॥ ओं ऱ्हीं धरणेन्द्र ॥९॥
जिनगुणमणिमालां मौक्तिकानां च मालां
कुमुदकुसुममालां रोहिणीदृष्टिमालाम् ॥
चिरमुरसि धरंतं कुंदभासं सकुंतं
कविनुतगुणरुंद्रं चंद्रमाव्हानयेऽहम् ॥ ओं ऱ्हीं सोम ॥ १० ॥
दिक्पालकानिति समर्च्य यवान्विता ये
गोधूममुद्गचणकाढकशालिमाषाः ॥
तत्सप्तधान्यकृतमुष्टिभिरंबुकुंडे ।
सप्ताहुतीरिह दधे पृथगेव तेभ्यः ॥ ११ ॥

ओं ऑ क्रों ऱ्हीं इंद्राय स्वाहा । ओं ऑ अग्नये स्वाहा । ओं ऑ यमाय स्वाहा । ओं ऑ नैऋत्याय स्वाहा । ओं ऑ वरुणाय स्वाहा । ओं ऑ पवनाय स्वाहा । ओं ऑ धनदाय स्वाहा । ओं ऑ ईशानाय स्वाहा । ओं ऑ धरणेन्द्राय स्वाहा ॥ ओं ऑ सोमाय स्वाहा ॥ इत्याहुतयः ॥

---

हातांत कमल आहे.

(१०) 'जिनगुणेति' हा श्लोक म्हणून चंद्राचें आव्हान वगैरे करावें. हा दिक्पाल आपल्या गळयांत जिनगुणांची माळा घालतो. मोत्यांची व कमलांची माळा घालतो. याच्या हातांत माला आहे. कवि याच्या गुणांची प्रशंसा करितात.

(११) 'दिक्पालकानिति' हा श्लोक म्हणून या दश दिक्पालकांना सप्तधान्यांच्या मुठींनी जलहोमामध्यें सात सात आहुती घाव्यात. सात धान्यें जव, गहूं, मूग, हरभरे, तुरी, साळी, व उडीद अशीं आहेत.

इत्थ सारसपर्ययाद्य महिता यूयं प्रसन्नाः स्त नः ॥
सांगा स्ताद्विकलापि मोहमुखतो युष्मत्प्रसादादियम् ॥
सर्वज्ञाध्वरविघ्नमाघ्नत हतं सर्वेपि दिक्पालकाः ॥
पूर्णांगां विधिपूर्तिपूर्णफलदां पूर्णाहुतिं वोर्पये ॥ १२ ॥

इति दिक्पालकार्चनम् ॥

अथ द्वारपालानुकूलनं ॥

सोमं जिनेंद्राध्वरवार्धिसोमं यमं यमाभीलमसज्जनानाम् ॥
निवारणोत्कं वरुणं विपत्तेर्यजामि वीरैकवर कुबेरम् ॥
सोमादिद्वारपालसांमुख्यविधानाय द्वारेषु पुष्पाक्षतं क्षिपेत् ॥ १ ॥

ओं सर्वाभीष्टफलदाविशिष्टेष्टजिनेष्टियष्टृयाजकराजराष्ट्रचतुःसंघविघ्नविघातनाखंडितचंडि-

---

(१२) 'इत्थमिति' हा श्लोक म्हणून इष्टप्रार्थना करून आहुति द्याव्यात.

आतां द्वारपालानुकूलनविधि ॥

(१) 'सोममिति' हा श्लोक म्हणून पूर्वादि दिशाच्या द्वारपालांना अनुकूल करून घ्यावें. सोम, यम, वरुण, व कुबेर अशीं याचीं नांवें आहेत जिनेश्वराच्या पूजारूपी समुद्राला हा सोम चंद्रासारखा आहे. यम हा दुष्टांना यमासारखा आहे. वरुण हा सज्जनांचीं संकटें दूर करितो. व कुबेर हा अतिशूर आहे या सर्वांची मी पूजा करितो असें म्हणून द्वारावर पुष्पाक्षतांचें क्षेपण करावें.

'ओं सर्वाभीष्ट' हा मंत्र म्हणून सोम, यम, वरुण, कुबेर या चार द्वारपालाचें आवाहन स्थापन वगैरे करावें. व

माडंबरकोदंडदंडधरदंडायमानदंडकुंडलीशपाशप्रचंडगदामांडितभुजादंडपूजामंडलपूर्वादिद्वारपालनप्रयुक्तद्वारपालकानाम् ॥ सकलसंपत्संपादकदयामयमहायागप्रत्यूहव्यूहातिक्रमार्थमावाहनादिपुरःसर समुचितसपर्याक्रमं यथाक्रमं उपक्रमामहे ॥ आवाहनादिपुरःसरप्रत्येकपूजाप्रतिज्ञापनाय द्वारेषु पुष्पाक्षतं क्षिपेत् ॥ अथ पृथागिष्टिः ॥

प्राग्द्वारमस्या जिनयज्ञवेद्या रक्षंतमेनं प्रयजामि सोमम् ॥

ओं ऱ्हीं धनुर्धराय अर २ त्वर २ हूं सोम आगच्छ २ संवौपट् ।

ओं ऱ्हीं सोमाय इदमर्घ्यम् ॥ १ ॥

यो दंडितारातिसमस्तदंडं दंडं धरॅश्चंडसुरैः परीतः ॥

रक्षत्यपाच्यं जिनयज्ञवेद्या द्वारं तमेनं यममर्चयामि ॥ २ ॥

ओं ऱ्हीं दंडधराय २ अर २ त्वर हूं यम आगच्छागच्छ २ संवौषट् ।

ओं ऱ्हीं यमाय इदमर्घ्यम् ॥

हालाहलज्वालजटालभालाभीलाहिपाशं सुरवीरसैन्यम् ॥

---

हें सूचित करण्याकरितां चार द्वारावर पुष्पाक्षताक्षेपण करावे.

१ ' कोदंडेति ' हा श्लोक ह्मणून सोम द्वारपालाला पूर्वद्वारी अर्घ्य द्यावें. या द्वारपालानें आपल्या हातांत धनुष्य घेतलेलें आहे.

२ ' यो दंडितारानिति ' हा श्लोक ह्मणून यमाचें आवाहन वगैरे करावे. यमाच्या हातांत दंड आहे. हा दक्षिण दिशेचा द्वारपाल आहे.

३ ' हालाहलेति ' हा श्लोक म्हणून वरुणाला आव्हान वगैरे विधि करावा. याच्या हातांत पाश आहेत. व

अथ वेद्याः पूर्वादिमहादिक्षु यक्षचतुष्टयार्चनम् ॥

विजयं वैजयन्तं च जयंतमपराजितं
यक्षं यक्ष्येत्र पूर्वादिमहादिक्षु यथाक्रमम् ॥ १ ॥

आवाहनादिपुरःसरप्रत्येकपूजाप्रतिज्ञापनाय वेद्याः पूर्वादिमहादिक्षु पुष्पाक्षतं क्षिपेत् ॥ १ ॥

अथ प्रत्येकपूजा ।

मोहारिविजयोद्भूतत्रैलोक्यविजयं विभुम् ॥
भजंतं विजयं यक्षं यक्ष्ये प्राग्दिग्वधूवरम् ॥

ओं ह्म्ल्व्र्यूं विं विजययक्ष बलिं गृहाण २ स्वाहा ॥ १ ॥

भजंतं त्रिजगन्नाथं दशोच्चैर्वैजयंतिकम् ।
वैजयन्तं यजे यक्षं अपाचीदिग्वधूवरम् ॥ २ ॥

---

वेदीच्या पूर्वादि चार दिशेमध्यें चार यक्षांचे अर्चन करावें. त्याचा विधि याप्रमाणेः—

'विजयेति' हा श्लोक म्हणून विजय, वैजयंत, जयंत व अपराजित या चार यक्षांची पूजा करण्याचें सूचन करण्याकरिता वेदीच्या पूर्वादिदिशांत पुष्पाक्षताक्षेपण करावें.

१ 'मोहारीति' हा श्लोक म्हणून विजय यक्षाचें पूजन करून पूर्व दिशेस बलि अर्पण करावा. मोहावर विजय मिळविणाऱ्या जिनेश्वराची हा उपासना करितो म्हणून याचें विजय हें नांव योग्य आहे.

२ 'भजंतमिति' हा श्लोक म्हणून दक्षिण दिशेचा अधिपति अशा वैजयंत यक्षाची पूजा करावी. हा यक्ष

ओं ह्म्ल्व्र्यूं वं वज्रयंत० ॥ २ ॥

जयंतं जितमंहांसि जयंतं जिनविद्विषः ॥
जयंतं प्रयजे यक्षं प्रतीचीदिग्वधूवरम् ॥ ३ ॥

ओं ह्म्ल्व्र्यूं जं जयत० ॥

आराधयन्तमाराध्यं जगतामपराजितम् ॥
यजेऽपराजितं यक्षं उदीचीदिग्वधूवरम् ॥ ४ ॥

ओं ह्म्ल्व्र्यूं अं अपराजित० ॥

इत्थं सारसपर्ययाद्य महिता यूयं प्रसन्नाः स्त नः ॥
सांगा स्ताह्निकलापि मोहमुखतो युष्मत्प्रसादादियम् ॥
सर्वज्ञाध्वरविघ्नमाघ्नत द्रुतं दिग्वासियक्षेश्वराः

---

माला, सिंह, गरुड वगैरे आकृति ज्यांवर काढल्या आहेत अशा ध्वजांनी अर्थात् ध्वजांना जो अधिपति आहे अशा जिनाची आराधना करितो

३ 'जयंतमिति' हा श्लोक म्हणून पश्चिमदिशाकडील लोकपाल जयंत यक्षाची पूजा करावी. ज्याने पापे जिंकली आहेत अशा जिनाचा हा आश्रय आहे.

४ 'आराधयन्तमिति' हा श्लोक म्हणून अपराजित यक्षाची पूजा करावी. इतरांकडून जो अजिंक्य आहे अशा जिनाची हा यक्ष आराधना करितो म्हणून त्यास अपराजित म्हणतात.

पूर्णांगां विधिपूर्तिपूर्णफलदां पूर्णाहुतिं वोर्पये ॥ ५ ॥

इति विजयादियक्षानुकूलनविधानम् ॥

अथैशान्यां दिश्यनावृत्तार्चनम् ॥

मेरोरीशानभागे कुरुषु मणिमयस्योत्तरेषु स्थितस्य ॥
श्रीजंबूभूरुहस्य स्थितिजुषमनिशं पूर्वशाखास्थसौधे ॥
शंख चक्रं च कुंडिं दधतमुरुकैररक्षमालां च कृष्णं
पक्षीन्द्रारूढमस्यां भवदिशि विधिनानावृतेन्द्रं यजामि ॥

ओं दशदिशाधिनाथं त्रैलोक्यदंडनायक जंबूद्वीपाधिपतिं गरुडपृष्ठमारूढं स्निग्धभृंगांजनाभमक्षसूत्रकमंडलुव्यग्रहस्तं चतुर्भुजं शंखचक्रविधृतभुजादंडं यक्षिणीरहितं सपरिजनसपरिवारमनावृतं देवमाव्हानयामहे स्वाहा ॥ हे अनावृत आगच्छ २ संवौषट्० ॥ अनावृताय स्वाहा । अ-

---

५ ' इत्थमिति ' हा श्लोक म्हणून यांना अर्घ्य द्यावें.

इति विजयादियक्षानुकूलनविधानम् ॥

' मेरोरिति ' हा श्लोक म्हणून व त्याचा मंत्र म्हणून अनावृत यक्षाचें आव्हान वगैरे करावें. हा यक्ष जंबुद्वीपांत मेरूपर्वताच्या ईशान्य दिशेला उत्तर कुरूमध्यें जंबु नांवाच्या वृक्षावर राहतो. या वृक्षाच्या पूर्वशाखेवरील महालामध्यें याचें निवास स्थान आहे. हा यक्ष आपल्या चार हातांत क्रमानें शंख, चक्र, कमंडलु, व अक्षमाला

नावृतपरिजनाय स्वाहा इत्यादि । इत्यनावृतार्चनम् ॥ १ ॥

अथ ब्रह्मेन्द्रोपरि देवर्षिसत्कारः ॥

जिनेंद्रवैराग्यविवर्धनोत्काश्चतुर्दशाभ्यर्हितपूर्वबोधाः ।
ये ब्रह्मलोकस्थितयो यजे तांल्लौकान्तिकान्ब्रह्मसुरेश्वराग्रे ॥ १ ॥

ओं ऱ्हीं लौकांतिकदेवेभ्यः पुष्पांजलिं निर्वपामि स्वाहा ॥ इति ब्रह्मेंद्रोपरि देवर्षिपुष्पांजलिः ॥

अथ अच्युतेन्द्रोपरि अहमिन्द्रसत्कारः ॥

इंद्रोऽस्म्यहं नैव परोस्ति चेन्द्रो मदित्थमुद्भूतविकत्थनाढ्यान् ॥
यजेऽच्युतेंद्रोपरि सौख्यसांद्राञ्जिनेंद्रभक्तानहमिंद्रदेवान् ॥

ओं ऱ्हीं अहमिंद्रदेवेभ्यः पुष्पांजलिं निर्वपामि स्वाहा । इत्यच्युतेंद्रोपरि अहमिन्द्रपुष्पांजलिः ॥१॥

---

धारण करितो. हा गरुडावर आरूढ झाला आहे. जंबुवृक्ष रत्नमय आहे.

ब्रम्हेन्द्रावर देवर्षींचा सत्कार करावा.

'जिनेंद्रेति' हा श्लोक म्हणून ब्रम्हेंद्रावर लौकांतिक देवाकरितां पुष्पांजलिक्षेपण करावी. लौकांतिक देव हे तीर्थकरांचे वैराग्य वाढवितात. यांना चौदापूर्वांचे ज्ञान असते. हे ब्रम्हस्वर्गाच्या शेवटच्या पटलांत असतात.

अच्युतेंद्रावर अहमिंद्राचा सत्कार

'इंद्रोरम्यहमिति' हा श्लोक म्हणून अच्युतेंद्रावर अहमिन्द्राकरितां पुष्पांजलिक्षेपण करावी. मीच इंद्र आहे दुसरा कोणी इंद्र नाही असें याना वाटत. याना विपुलसौख्यांची प्राप्ति झालेली असते. हे जिनेन्द्राचे परमभक्त असतात. नवग्रैवेयक, नव अनुदिश व पंचानुत्तर या ठिकाणी राहणाऱ्या देवांना अहमिंद्र म्हणतात.

अथ पृथ्वीमंडले मंगलाष्टकस्थापनम् ॥

श्वेतच्छत्राब्दौ ध्वजं चामरे द्वे । मंत्रैर्वेद्यां तोरणं तालवृंतम् ॥
नंद्यावर्तं दीपमष्टासु दिक्षु । न्यस्याम्याप्तुं मंगलं मंगलानि ॥

ओं श्वेतच्छत्रश्रियै स्वाहा । ओ अद्भश्रियै स्वाहा । ओं ध्वजश्रियै स्वाहा ।
ओं चामराश्रियै स्वाहा ॥ ओं तोरणाश्रियै स्वाहा । ओं तालवृंताश्रियै स्वाहा ।
ओं नंद्यावर्तश्रियै स्वाहा । ओं दीपश्रियै स्वाहा ।

इति मंगलाष्टकस्थापनम् ॥

अथ तत्रैवायुधाष्टकस्थापनम् ॥

उत्तुंगमत्तद्विरदेन्द्ररूढा रूढोग्रवज्रायुधमुद्वहन्ती ॥
ऐन्द्री वसत्विंद्रदिशीह वेद्यां हेमप्रभा विघ्नविघातनाय ॥ १ ॥

ओं इंद्राण्यै स्वाहा ॥

या वैष्णवी विष्णुरथांगयाना जिष्णोर्जिनेशः सवने सुनीला ॥
प्रत्यर्थिचक्रप्रतिघातचक्रं धृत्वेयमास्तां दिशि सा यमस्य ॥ २ ॥

ओं वैष्णव्यै स्वाहा ॥

---

'श्वेतच्छत्रेति' हा श्लोक व मंत्र म्हणून पृथ्वीमंडलांत आठ मंगलाची स्थापना करावी. आठ मगलपदार्थ याप्रमाणें—१ श्वेतच्छत्र २ दर्पण ३ ध्वज ४ चामर ५ तोरणमाला ६ पत्ता ७ नंद्यावर्त ८ दीप.

कौमारिका कोमलविद्रुमाभा शिखंडियाना धृतमंडलाग्रा ॥
प्रचंडमूर्तिर्वसतात्प्रतीच्यां वेद्यां जिनेन्द्राध्वरविघ्नशान्त्यै ॥ ३ ॥
ओं कौमार्यै स्वाहा ॥
वाराहिका वन्यवराहयाना श्यामप्रभा भीकरसीरपाणिः ॥
अत्रोत्तरस्यां दिशि वेदिकायामास्तां समस्ताध्वरविघ्नशान्त्यै ॥ ४ ॥
ओं वाराहिकायै स्वाहा ॥
पद्मप्रभांगा श्रितपद्मयाना विद्वेषिसंत्रासकमुद्गरास्त्रा ॥
ब्रह्माणिसंज्ञा जिनयज्ञवेद्यां हुताशनाशां समलंकरोतु ॥ ५ ॥
ओं ब्रह्माण्यै स्वाहा ॥
श्वेतच्छदाभोंदुरुवाहनस्था । लक्ष्मीर्गदालक्षितशस्त्रहस्ता ॥
विघ्नापनोदाय दिशीह वेद्याः प्रवर्तना दाक्षिणपश्चिमायाम् ॥ ६ ॥
ओं लक्ष्म्यै स्वाहा ॥ ६ ॥
चामुंडिका प्रेतगता समध्यमार्तंडदीप्तिर्धृतदंडशक्तिः ।
प्रत्यूहशान्त्यै दिशि वेदिकायाः प्रवर्ततामुत्तरपश्चिमायाः ॥७॥

---

याच पृथ्वीमंडलामध्ये श्रीजिनेश्वराच्या पूजेमध्ये विघ्न उपस्थित होऊं नये ह्मणून आठ आयुधाची स्थापना करावी. आयुधांची नांवे याप्रमाणे—वज्र, चक्र, तलवार, नागर, मुद्गर, गदा, दंड, भिंडिमाल. ही आयुधें क्रमाने इंद्राणी वैष्णवी, कौमारी, वाराही, ब्रह्माणी, लक्ष्मी, चामुंडा व रुद्राणी ह्या देवी धारण करितात. वेदीच्या आठ दिशांना या

ओं चामुंड्यै स्वाहा ॥

उच्चंडशाकरगते धृतभिंडिमाले रुद्राणि रुद्रामलचंद्रकान्ते ॥

पूर्वोत्तरस्यां दिशि तिष्ठ वेद्या विद्यानिधेरध्वरविघ्नशान्त्यै ॥८॥

ओं रुद्राण्यै स्वाहा ।

इत्यायुधाष्टकस्थापनम् ॥

अथ वेद्याः पूर्वादिदिक्षु पताकाष्टकस्थापनम् ॥

पीतप्रभाव्हया देवी पीतवर्णमिदं ध्वजं ॥

धृत्वा जयाय श्रीवेद्यां पूर्वस्यां दिशि तिष्ठतु ॥ १ ॥

ओं प्रभावत्य स्वाहा ।

पद्माख्यदेवी पद्माभा पद्मवर्णमिदं ध्वजम् ॥

धृत्वा जयाय श्रीवेद्यामाग्नेयां दिशि तिष्ठतु ॥ २ ॥

ओं पद्मायै स्वाहा ॥

सा मेघमालिनी कृष्णा कृष्णवर्णमिद ध्वजम् ॥

---

क्रमाने उभ्या राहतात या देवीची वाहने याप्रमाणे--ऐरावतहत्ती, गरुड, मोर, रानडुकर, कमल, उंदीर, राक्षस व रेडा, या देवींचा वर्ण सोनें, निळा रंग, पोवळे, काळा रंग, कमल, हंस, सूर्य, चंद्र याप्रमाणे आहे. 'उत्तुंगेति' इत्यादि आठ श्लोक म्हणून या आठ आयुधांची स्थापना करावी.

वेदीच्या पूर्वादिदिशामध्यें आठ पताका स्थापन कराव्यात. या ध्वजांचा रंग पिंवळा, पांढरा, काळा हिरवा,

धृत्वा जयाय श्रीवेद्यामपाच्यां दिशि तिष्ठतु ॥ ३ ॥

ओं मेघमालिन्यै स्वाहा ॥

हरिन्मनोहरादेवी हरिद्वर्णमिदं ध्वजम् ॥

धृत्वा जयाय श्रीवेद्यां नैऋत्यां दिशि तिष्ठतु ॥ ४ ॥

ओं मनोहरायै स्वाहा ॥

श्वेताभा चंद्रमालेयं श्वेतवर्णमिदं ध्वजम् ॥

धृत्वा जयाय श्रीवेद्यां प्रतीच्यां दिशि तिष्ठतु ॥ ५ ॥

ओं चंद्रमालायै स्वाहा ॥

नीलाभा सुप्रभा देवी नीलवर्णमिदं ध्वजम् ॥

धृत्वा जयाय श्रीवेद्यां वायव्यां दिशि तिष्ठतु ॥ ६ ॥

ओं सुप्रभायै स्वाहा ॥

श्यामप्रभा जयादेवी श्यामवर्णमिदं ध्वजम् ॥

धृत्वा जयाय श्रीवेद्यामुदीच्यां दिशि तिष्ठतु ॥ ७ ॥

ओं जयायै स्वाहा ॥

---

पांढरा, निळा, काळा, पचरंगी असे आहेत. ज्या देवींना हे ध्वज हातांत धरलेले आहेत त्यांचे ही वर्ण ध्वजांच्या वर्णाप्रमाणेच आहेत देवींची नावें क्रमानें प्रभावती, पद्मा, मेघमाला, मनोहरा, चंद्रमाला, सुप्रभा, जया, व विजया अशी आहेत.

विजया पंचवर्णाभा पंचवर्णमिदं ध्वजम् ॥
धृत्वा जयाय श्रीवेद्यामैशान्यां दिशि तिष्ठतु ॥ ८ ॥
ओं विजयायै ॥

अथ वेद्याः पूर्वादिदिक्षु कलशाष्टकस्थापनम् ॥

तीर्थाम्बुपूर्णशरणोत्तममंगलार्थसंकल्पनाष्टसमलंकृतशुभ्रकुंभान् ॥
वेद्यष्टदिक्षु विनिवेश्य सपंचवर्णसूत्रेण तांस्त्रिगुणमेव वृणोमि सिद्ध्यै ॥
ओं इति कलशाष्टकस्थापनम् ॥

अथ वेद्या दिक्षु बाणचतुष्टयस्थापनम् ॥

बाणैश्चतुर्भिर्निशितैर्जयाय सिद्धार्थपुञ्जैश्च निजेष्टसिध्यै ॥
सन्तानवृध्यै च यवारकैः श्रीवेद्याश्च कोणान्परिभूषयामि ॥
बाणचतुष्टयादिस्थापनाय वेदीकोणेषु पुष्पाक्षतं क्षिपेत् ॥ १ ॥

---

वेदीच्या पूर्वादि आठ दिशामध्ये आठ कलश स्थापावेत. हे कलश तीर्थजलानें भरलेले असावेत. शरण, उत्तम व मंगल अशा पंचपरमेष्टि व धर्म याचा संकल्प करावा. या आठ कलशाच्या सभोंवती पाचरंगी सूत तीनवेळा गुंडाळावे.

या प्रमाणें कलशाष्टकस्थापन विधि आहे.

वेदीच्या चार दिशाना बाण, पांढऱ्या मोहऱ्यांचे पुंज व यवारक हे पदार्थ स्थापन करावेत.
( १ ) ' बाणैरिति ' हा श्लोक म्हणून या पदार्थांवर पुष्पाक्षता टाकाव्यात

जय जय जिनधीर प्राप्तजन्माब्धिपार । प्रथितविभवसार प्रौढतीर्थावतार ॥
प्रहतहतकमार प्रोद्गतानंदपूर । प्रहसितशतसूर प्रप्रकृष्टांशुभार ॥ २ ॥
जय जय जिनमित्र ध्वांतविध्वंसमित्र । स्वातिशयगुणगात्र ज्ञानविस्फूर्तिपात्र ॥
परमपदपवित्र प्रोल्लसद्देवयात्र । प्रवरशरण चात्र प्राणिनामप्यमुत्र ॥ ३ ॥
जय जय जिनजैत्र क्ष्मात्रयारामचैत्र । त्रिदशविधृतवेत्र श्वेतचित्रातपत्र ॥
निरतिशयचरित्र श्रीमदर्थोक्तसूत्र । स्वदुरघतरुदात्र श्रायसश्रीकलत्र ॥ ४ ॥
जय जय जिनतात त्रातरत्नत्रयंतपूत । स्थिरतरसुखदात कर्मसंघातघात ॥
कुमतजलदवात ज्ञेयजातप्रमात । प्रवचनरथसूत ख्यातदेवाभिनूत ॥ ५ ॥
जय जय जिनचंद्र छिन्नदुर्मोहतंद्र । प्रणतनरसुरेंद्र स्वात्मलक्ष्मीन्मुनींद्र ॥
स्वतिशय णरुंद्र प्रीणितप्राणिमंद्र । प्रवचनसरिदिन्द्र स्फीतभासांद्रचंद्र ॥ ६ ॥
जय जय जिनसेव्य त्रातसुप्रीतभव्य । त्रिभुवनमहितव्य स्वाप्तिसंभावितव्य ॥
वरद नमसितव्य प्रत्यह कीर्तितव्य । स्मृतिपथनिहितव्य श्रेयसे भावितव्य ॥ ७ ॥

याप्रमाणें पूर्वोक्त विधि झाल्यानतर श्रीजिनेश्वराची स्तुति करावी. स्तुतीचा सारांश)—हे जिनराज आपला सदा विजय होवो. आपण मोहराजाचा नाश केला आहे. मदनाला जिंकिले आहे व आपणास इंद्र नमस्कार करितात. आपली स्तुति करण्याम नागराजही असमर्थ आहे. जिनेश्वरा? आपण अनंत सद्गुणांनी शोभत आहां. हे जिनेशा आपला नेहमी विजय होवो. हे जिनेशा? आपण संसारसमुद्र तरून गेले आहांत. आपले ऐश्वर्य सर्व जगत्प्रसिद्ध आहे आपण जैनधर्माचे संस्थापक आहात. आपण आनंदाचे पूर आहात. व आपल्या कांतीने आपण शेकडो सूर्याच्या

जय जय जिननाथ ज्ञातसंपत्सनाथ । प्रतिहतरतिनाथ प्राप्तमोहापनाथ ॥
नतसुरनरनाथ श्रीद लोकाधिनाथ । श्रुतिकजादिननाथ श्रीवधूप्राणनाथ ॥ ८ ॥
नसदनिमिषखंडं खंडितानंगकांडं । हासितलासिततुंडं ध्यानधीराग्निकुंडम् ॥
सुगुणमणिकरंडं जन्मवार्द्धौ तरंडं । विनमिताचिद्खंडं श्रायसानंदपिंडम् ॥ ९ ॥
इत्यानंदस्तवनेन वेद्यास्त्रिवारप्रदक्षिणं कृत्वा पंचांगप्रणामं कुर्यात् ॥

विभूष्य सद्‌धुपघटैः सुधूपैर्विभूषणाढ्यांश्चतुरोष्ट वार्यान् ॥
वेद्यावृतान्मंत्रमनादिसिद्धं शुभ्रैः प्रसूनैरथ जापयामि ॥

ओं णमो अरिहंताणं० ॥ चत्तारिमंगलं चत्तारि लोगुत्तमा । चत्तारि सरणं पव्वज्जामि ॥

---

कांतीला तुच्छ केलें आहे. आपण चौतीस अतिशयांनी युक्त आहात. आपल्या ठिकाणीं ज्ञानाचा पूर्ण विकास झाला आहे. आपण इहलोकीं व परलोकीं ही शरण आलेल्या प्राण्यांचें रक्षण करिता. आपण कर्मसमूहाचा नाश केला आहे, कुमतरूपी मेघांचा नाश करण्यास आपण वायुप्रमाणें आहांत. शास्त्ररूपी रथाचे आपण सूत आहांत. त्रैलोक्यांत आपण सर्व जनपूज्य आहांत. आह्मी आपली दररोज आठवण केली पाहिजे. आपली सेवा केली पाहिजे आपणास नमस्कार केला पाहिजे ह्मणजे आह्माला मोक्ष मिळेल. आपण अनंतगुणमण्यांना करंड्यासारखे आहांत संसार समुद्रांत आपण नावेसारखे आहांत. आपण आनंदपिंड आहांत. इत्यादि स्तुति करून वेदीला तीन वेळा प्रदक्षिणा द्याव्यात. व पंचांग नमस्कार करावा.

'विभूष्येति' हा श्लोक ह्मणून वेदीच्या सभोवती धूपघट स्थापन करावेत. व अनादि सिद्धमंत्राचा 'णमो अरहंताणं, चत्तारि मंगलं' वगैरेचा जप करण्यासाठीं चार अथवा आठ सभ्य आर्यांना नियुक्त करावें. जपासाठीं पांढऱ्या फुलांचा उपयोग करावा.

ऱ्हौं शांतिं कुरु २ स्वाहा । अनादिसिद्धमंत्रः ॥ इति वेदीभूषणपुरःसरजप्तृविनियोजनम् ॥

इत्थं यस्तु समस्तशास्तदिविजस्तोमस्य तत्संवृत—
त्रैलोक्यार्चितपादपद्मयुग्लश्रीमज्जिनानानामपि ॥
भक्त्याराधनमातनोति विधिना द्रव्यादिशुध्यन्वितः ॥
सोयं धर्मरथस्य नेमिररहन्भूत्वैति सिद्धिश्रियम् ॥

इत्यर्हत्प्रतिष्ठासारसंग्रहे नेमिचंद्रदेवविरचिते प्रतिष्ठातिलकनाम्नि यागमंडलाविधानार्यो नाम सप्तमः परिच्छेदः ॥ ७ ॥

'इत्थमित्यादि' याप्रमाणे द्रव्य, क्षेत्र, काल, वगैरे शुद्धींनी युक्त असलेला जो पूजक भक्तीनें सर्वदेवसमूहांचे व यांनी वेष्टिलेल्या आणि त्रैलोक्य वंद्य ज्यांचे पाय आहेत अशा श्रीजिनेश्वराचे आराधन करितो तो धर्मरथाची धाव होतो अर्थात् तीर्थंकर पदवीस प्राप्त होतो व मोक्षलक्ष्मीची प्राप्ति करून घेतो. ।

या प्रमाणे नेमिचंद्रविरचित प्रतिष्ठासारसंग्रह अथवा प्रतिष्ठातिलक ग्रंथांतील यागमंडळाच्या विधीचे वर्णन करणारा सातवा परिच्छेद समाप्त झाला. ॥

# अथ अष्टमः परिच्छेदः ।



अथ गर्भावतरणकल्याणम् ।

अथांकुरार्पणदिनात् षष्ठे तु दिवसे निशि ॥
गर्भावतारकल्याणं विदधीत यथाविधि ॥ १ ॥
तत्रादौ पूजकाचार्यकुंजरेण विधीयते ॥
पुरस्तान्नवबिंबस्य प्रतिष्ठेयनिरूपणम् ॥ २ ॥
सकलीकरणं कार्यं हस्तशुद्ध्यादिपूर्वकम् ॥
मूलवेदीपुरोदेशे कल्पिते पुष्पमंडिते ॥ ३ ॥
संकल्पपूर्वकं पुष्पांजलिस्तद्भूमिशोधनम् ॥

१ अकुरार्पणाच्या दिवसापासून सहाव्या दिवशीं रात्रीं प्रतिष्ठाशास्त्रोक्तविधिला अनुसरून गर्भावतारकल्याण-विधि करावा.

२ हा विधि करण्याच्या प्रारंभीं प्रतिष्ठाचार्यांनीं ज्या बिंबाची प्रतिष्ठा करावयाची असेल त्याची माहिती द्यावी.

३–५ तदनंतर हात पाय वगैरे अवयवांची शुद्धि करून सकलीकरण विधि करावा. मूलवेदीच्या पुढें जो पुष्पमंडप रचिलेला असतो त्यामध्ये संकल्पपूर्वक पुष्पांजली समर्पण करावी. तदनंतर वायु, मेघ, व अग्नि या देवाकडून

वायुमेघाग्निभिर्देवैर्दर्भन्यासोर्चना क्षितेः ॥ ४ ॥
गंधांबुसेकः पुष्पोपहारः पीठनिवेशनम् ।
तद्भद्रपीठे निःशेषजिनमातृसमर्चनम् ॥ ५ ॥
तत्पीठस्थमहापात्रे विवक्षितजिनप्रभोः ॥
मातुराव्हानादिः स्यात्कौबेरं रत्नवर्षणम् ॥ ६ ॥
भोगोपभोगद्रव्योपनयन धनदेन वै ॥
ततः प्राक्कल्पिते पद्माके साष्टदलांबुजे ॥ ७ ॥
कर्णिकायां जिनस्येष्टिः श्र्यादीनां तद्दलाष्टके ॥
तत्र सर्वौषधीवारिपूर्णकुंभनिवेशनम् ॥ ८ ॥
श्र्यादिसंकल्पनेनाष्टकन्यानां विनिवेशनम् ॥

---

भूमिशोधन हा विधि करावा; दर्भस्थापना करावी आणि भूमिचे पूजन करावें. तिच्यावर गंधजल शिंपडावें, पुष्पें अर्पण करावींत व तेथे पीठस्थापन करावे. त्या उत्तम पीठावर सपूर्ण जिनमातांचे पूजन करावे.

६–९ पीठावरील महापात्रामध्यें ज्या जिनेश्वराचा गर्भकल्याणविधि करावयाचा असेल त्याच्या मातेचें आ आव्हान, स्थापन हा विधि करावा. व कुबेरानें केलेली रत्नवृष्टि ती दाखवावी. कुबेरानें भोगोपभोगाचे पदार्थ मातेसाठीं आणिले आहेत हें दाखवावें. तदनंतर पूर्वीच निर्माण केलेल्या कमलसमूहांत आठ पाकळ्यांच्या प्रथम कमलांतील कर्णिकेमध्ये क्रमाने श्री ऱ्ही वगैरे आठ देवींची पूजा करावी. या आठ पाकळ्यामध्यें सर्वौषधिजलानें भरलेले आठ कुंभ स्थापावेत व त्यामध्यें श्री ऱ्ही वगैरे आठ देवतांचा संकल्प करावा व त्यांची स्थापना

गर्भशोधनमंबायाः श्र्यादिभिस्तदुपासनम् ॥ ९ ॥
फलवत्षोडशस्वप्नस्थापनं मातुरानने ॥
प्रवेशनस्य संकल्पादुचिताकारतः प्रभोः ॥ १० ॥
जलाधिवासनं सर्वबिंबानां तु तथोचितम् ॥
तदर्चनं च दिक्पालपूजा यवनिकार्पणम् ॥ ११ ॥
धामसंप्रोक्षणं होमः शांतिशुध्यभिधानकः ॥
भूमिशुध्यादिकं गर्भगृहे पीठनिवेशनम् ॥ १२ ॥
सर्वौषधीपंचमृद्भिः पीठाग्रस्य विलेपनम् ॥
पंचतीर्थांबुभिस्तस्य क्षालन विशदाक्षतैः ॥ १३ ॥
अष्टच्छदाब्जरचना तन्मध्ये विनिवेशनम् ॥
जलाधिवासितार्चायाःततो गर्भाभिवर्द्धनम् ॥ १४ ॥

---

करावी. तदनंतर जिनमातेचा गर्भशोधनविधि करावा व श्री आदि देवता तिची उपासना करितात हा विधि करावा.

१०–११ मातेला पडलेल्या सोळा स्वप्नांची स्थापना करावी. व मातेच्या मुखामध्ये भगवंतांनी शुभ्रहत्तीचे स्वरूप धारण करून प्रवेश केला आहे असा संकल्प करावा. भगवान गर्भांत आले आहेत असें दाखविण्याकरितां सर्वबिंबांची यथोचित जलाधिवासन ही क्रिया करावी. व बिंबांचें अष्टद्रव्यांनीं पूजन करावें. दिक्पालकांचें पूजन करून त्या वेदीच्या सभोवती वस्त्रांचें वेष्टन करावें.

१२–१५ तदनंतर धामसंप्रोक्षणविधि करावा व शांतिशुद्धि हा होम करावा. त्यावेळी भूमिशुद्धि वगैरे करून गर्भ-गृहांत पीठस्थापन करावें. सर्वौषधि व पांच प्रकारच्या मातींनीं पीठाचा अग्रभाग चर्चावा. पांच प्रकारच्या

सांगसर्गक्रमारोपाद्दर्भशय्याविधिर्विभोः ॥
क्षीरैर्लेव्वभिषेकोऽथ गव्यैरष्टविधार्चनम् ॥१५॥
वस्त्रांतरावृतिर्दिक्षु दिक्पालानां समर्चनम् ॥
वालुकास्थंडिले हस्तव्यासायामेंऽगुलोच्छ्रये ॥ १६ ॥
दर्भैर्होमो यवनिकादीपद्वयनिवेशनम् ॥
इष्टिः स्तुतिर्जिनांबायास्तदग्रे शक्रनर्तनम् ॥ १७ ॥
जिनतातस्य गमनाप्रच्छनं स्तुतिपूर्वकम् ॥
गर्भावतारकल्याणक्रियाशान्तिबलिस्तथा ॥ १८ ॥
इष्टार्थप्रार्थना चेति तत्कल्याणक्रियाक्रमः ॥

---

तीर्थजलांनी त्याला धुवावे. तदनंतर त्या पीठावर स्वच्छ अशा तांदुळांनी आठ पाकळ्याचे कमळ काढावें. व त्यावर जिनप्रतिमा बसवावी. तद्-नंतर मातेचा गर्भ वाढत आहे असे दाखवावें. सर्व अवयवांची रचना होत आहे व गर्भ शय्येमध्यें भगवंत निजलेले आहेत हा विधि करावा. तदनंतर गाईच्या दुधानें अभिषेक करून अष्टद्रव्यांनी त्याचे पूजन करावें.

१६–१९ पूर्ववस्त्र काढून दुसऱ्या वस्त्राचें आच्छादन घालावें. दिक्पालकांचे पूजन करावें. तद्-नंतर वाळूचे एक हाताच्या व्यासाचे व एक अंगुळ उंचीचे असे स्थंडिल–उंचवटा बसवावें. तेथे दर्भांनी होम करावा. दोन दीप तेथे स्थापावेत. व पुढे पडदा सोडावा. मग जिनमातेचे पूजन व स्तुति करून जिनमातेच्या पुढे इंद्राचे नर्तन हा विधि दाखवावा. जिनेश्वराच्या पित्याची परवानगी घेऊन जाण्याविषयी विचारावें.

तत्तत्क्रियाविशेषस्तु प्रयोगे प्रतिपाद्यते ॥ १९ ॥

तद्यथा:—

पूर्वं प्रतिष्ठाविधितो विविक्ते देशे प्रतिष्ठेयमिदं सुरम्याम् ॥
सप्रातिहार्यां ससुखप्रचारां अर्चां पुरोधाय निरूपयामि ॥ २० ॥

शुद्धात्मानुभवैकतानमनसोऽशुद्धोपयोगाच्च ये ॥
मत्वानंतचतुष्टयात्मकजिनं ये स्थापनान्यासतः ॥
अर्चां प्रार्च्य शुभोपयोगनिरताः पुण्यं तु सच्चिन्वते ॥
तेभ्योर्हत्परमागमोक्तमहिमा बिंबे मया स्थाप्यते ॥ २१ ॥

त्याची स्तुति करून तदनंतर गर्भावतारकल्याण क्रियेचा शांतिबलि करावा. इष्टप्रार्थना करावी. अशा रीतीचा हा गर्भावतार कल्याणाचा विधि आहे. या गर्भावतारकल्याणाच्या क्रियाची माहिती त्या त्या क्रिया करितांना सांगतो.

२१–२१ प्रतिष्ठाविधि करण्याच्या पूर्वी प्रतिष्ठाचार्यांनीं प्रतिमेचें परीक्षण करावें. प्रतिमा आठ प्रातिहार्यांनी युक्त असावी व ती सुखाने रथात पालखीत बसऊन तिचा विहार करविता येईल अशी असावी. प्रतिष्ठाशास्त्रांत प्रतिमेची जीं लक्षणे सांगितली आहेत त्या लक्षणांनी ती युक्त असावी. शुद्धात्म्याच्या अनुभवामध्ये जे गढून गेले आहेत व अशुद्धोपयोगापासून जे दूर झाले आहेत ते जिनबिंबामध्ये अनंतचतुष्टय धारक अशा जिनाची स्थापना करितात. अशा जिनबिंबाचे शुभोपयोगामध्ये लीन असलेले पुरुष पूजन करून पुण्यसंचय करितात. यास्तव त्यांच्यासाठी परमागमामध्ये जो जिनेश्वराचा महिमा सांगितला आहे त्याची मी स्थापना करितो.

अथ सकलीकरणम् ॥

हस्तशुद्धिं विधायादौ शुचीकरणमन्वतः
सकलीकरण सांग करिष्ये प्रकृतोचितम् ॥
अत्रादावनेन मंत्रेण स्वहस्तौ पवित्रयेत् ॥

ओं णमो अरहंताणं णमो केवलिणे सुअंगदेवि पसत्थहत्थे हूं फट् स्वाहा ॥ हस्तद्वयपवित्रीकरणमंत्रः ॥ ततः सुरभिमुद्रां धृत्वा इमां शुचिविद्यां सप्तवारान्न्यसेत् ॥

णमो अरहंताणं । णमो सिद्धाणं । णमो आगासगामीणं । णमो विज्जाहराणं । णमो सव्वोसहिपत्ताणं । णमो सयंबुद्धाणं । णमो केवलिणे स्वाहा ॥ इमां च । ओं अर्हन्मुखकमलवासिनि पापात्मक्षयंकरि श्रुतज्वालासहस्रप्रज्वलिते सरस्वति मम पापं हन २ क्षां क्षीं क्षूं क्षें क्षीरधवले अमृतसंभवे वं २ हूं स्वाहा ॥ शुचीकरणमंत्रौ ॥ ततः सकलीं कुर्यात् ॥ ओं अं नमः हृदये ॥ ओं सिं स्वाहा शिरसि ॥ ओ आं वषट् शिखायां ॥ ओं उं घे २ कवचं ॥ ओं सां हूं फट् स्वाहा अस्त्रं ॥ ओं ऱ्हौं

---

## सकलीकरण विधि

'हस्तशुद्धिं' हा श्लोक व मंत्र म्हणून प्रथमतः आपले दोन हात शुद्ध करावेत. तदनंतर सुरभिमुद्रा करून ॐ णमो अरहंताणं वगैरे हा शुचिविधेचा मंत्र सातवेळां सुरभिमुद्रेंत स्थापन करावा.

'णमो अरहंताणं' वगैरे व 'ॐ अर्हन्मुखकमलवासिनि' वगैरे असे दोन मंत्र शुचिकरणाचे आहेत. यानंतर सकलीकरण विधि करावा. 'ओं अं नमः हृदये' हा मंत्र म्हणून हृदयन्यास करावा. याचप्रमाणें ओं स्वाहा ललाटे । इत्यादि मंत्र म्हणून क्रमानें मस्तकाच्या दक्षिण बाजु, वाम बाजु, पश्चिम बाजु या ठिकाणीं न्यास करावा.

वषट् नयनयोः ॥ पुनश्च ॥ ओं ह्रां णमो अरहंताणं स्वाहा हृदये ॥ ओं णमो सिद्धाणं स्वाहा ललाटे । ओं ह्रं णमो आइरियाणं स्वाहा शिरोदक्षिणे ॥ ओं ह्रौं णमो उवज्झायाणं स्वाहा पश्चिमे ॥ ओं ह्रः णमो लोए सव्वसाहूणं स्वाहा वामे ॥ पुनस्तान्येव मंत्रानि ललाटे मूर्ध्नि दक्षिणे पश्चिमे वामे चेति न्यसेत् ॥

इति सकलीकरणमंत्रः ॥ ततः ॥

ओ उसहाइ जिणं पणमामि सया । अम्लो विरजो वरकप्पतरू ॥
सअ कामदुहा मम रक्ख मया पुरुविज्जुणुही पुरुविज्जुणुही ॥ २ ॥
अट्ठेव य अट्ठसया अट्ठसहस्सा य अट्ठकोडीओ ॥
रक्खंतु मे सरीरं देवासुरपणमिया सिद्धा ॥ ३ ॥

अनेन स्वस्यांगप्रत्यंगपरामर्शः कार्यः ॥ ३ ॥ ततः ॥ ओं धणु २ महाधणु २ स्वाहा ॥ इमां धनुर्विद्यां वामकरांगुलिपर्वसु विन्यस्य प्रतिमाग्रे वामपादांगुष्ठेन रेफाग्रं पुंखं शर धनुरालिख्य वामपादेनाक्रम्य कायोत्सर्गेण स्थितः सन् ॥ ओं णमो अरहंताणं । णमो सिद्धाणं । णमो

---

पुनः हाच प्रकार मंत्र म्हणून करावा. अर्थात् हा प्रकार दोन वेळा करावा. तदनन्तर 'ओं उसहाइ' हा मंत्र व 'अट्ठेव' मंत्र म्हणून स्वतःच्या सर्व अंग व प्रत्यंगाना स्पर्श करावा. या मंत्राचा अभिप्रायः—मी ऋषभादि जिनेश्वरास नमस्कार करितो. हे जिनेश्वर निर्मल, पापरहित, व कल्पतरूप्रमाणे आहेत. हे जिनेश माझे रक्षण करोत. आठ कोटि, आठ हजार, आठशें, आठ सिद्ध ज्याना देवदैत्य वगैरे नमन करितात माझें शरीर रक्षण करोत. तदनंतर 'ओं धणु २ महाधणु २ स्वाहा' हा मंत्र म्हणून उजव्या पायाच्या अंगुष्ठानें रेफाग्राने सहित अशा

आइरियाणं ॥ णमो उवज्झायाणं । णमो लोए सव्वसाहूणं ॥

छब्भेइ जलज्जलणं चिंतितमंतेण पंचणमकारो ॥

अरिमारिचोरराउलघोरुवसग्गं विणासेइ ॥

ओं ऱ्हां ऱ्हीं ऱ्हूं ऱ्हौं ऱ्हः विणासेह स्वाहा । इदं सप्तवारान्हृद्युच्चार्य अष्टोत्तरशतं धनुर्विद्यामावर्तयेत् ॥

इति सकलीकरणविधानम् ॥

अथ मूलवेद्याः पूर्वस्यां दिशि भूमिशोधनविधानम् ॥

ओ भूर्भुवःस्वरधिराजतिरीटकोटिरत्नप्रभापटलपाटलितांघ्रियुग्मम् ॥

नत्वा जिनेंद्रमथ तत्प्रतिमाप्रतिष्ठाप्रस्तावनाय कुसुमांजलिमुत्क्षिपामि ॥

ओं ऱ्हीं क्षी भूः स्वाहा इति पुष्पांजलिं क्षिपेत् ॥ १ ॥

पूर्ववद्भूमिशोधनविधानं दर्भन्यासविधानं भूम्यर्चनविधानं च विदध्यात् ॥

श्रीमूलवेदीपुरतः प्रयुक्ते दीप्रप्रदीपे प्रसरत्सुधूपे ॥

---

अग्रभागाने युक्त असलेला बाण व धनुष्य लिहून उजव्या पायाने आक्रमण करून कायोत्सर्ग धारण करावा. 'णमो अहिरताणं' हा पूर्ण मंत्र हृदयात सातवेळा उच्चारून १०८ वेळा धनुर्विद्या ह्मणावी. याप्रमाणे सकलीकरणाचा विधि आहे. तदनंतर मूलवेदीच्या पूर्वदिशेला भूमिशोधनविधि करावा.

१ 'ॐ भूर्भुव' हा श्लोक व 'ओ ऱ्ही श्री' हा मंत्र ह्मणून पुष्पाजलि क्षेपण करावी. या प्रमाणे भूमिशोधन विधि करून दर्भन्यास विधि व भूमिपूजन विधि ही करावा.

सत्पुष्पनिष्पादितमंडपे क्ष्मा विशोध्य सिंचामि च गंधवार्भिः ॥
पुण्याहमंत्रेण गंधोदकसेचनम् ॥ २ ॥

कमलबकुलवालोत्फुल्लकल्हारमल्लि ।
कुमुदकुरवकोद्यद्यूथिकाकेतकीनाम् ॥
मरुवदवनाना मालतीचंपकाना ।
यजनभुवि समंतादंजलिं प्रोत्क्षिपामः ॥
ओं ऱ्हीं श्रीं क्ष्रीं भूः पुष्पोपहारः ॥ ३ ॥

दर्भस्रगंकुरवितानविराजमानश्रीपुष्पमंडपमहीतलमध्यभागे ॥
सद्विश्वकर्मपुरतो विनिवेशयामि क्षीरद्रुमादिपरिकल्पितभद्रपीठम् ॥
ओं ऱ्हीं भद्रासनं विनिवेशयामि स्वाहा ॥ भद्रासननिवेशनम् ॥
प्रस्तीर्य शालीनिह भद्रपीठे कृत्वाक्षतैरष्टदलं च पद्मम् ॥

२ ' श्रीमूलवेदी ' हा श्लोक म्हणून पुण्याहमंत्रानें गंधोदक सेचन करावें.

३ ' कमलबकुलेति ' हा श्लोक म्हणून कमल, बकुल, जाई, मालती, चंपक वगैरे पुष्पांचा वेदीपुढें नजराणा अर्पण करावा.

४ ' दर्भस्रगेति ' हा श्लोक म्हणून वेदीच्या पुष्पमंडपाच्या मध्यभागीं ' ओं ऱ्हीं भद्रासन ' हा मंत्र म्हणून भद्रासन स्थापन करावें.

५ ' प्रस्तीर्येति ' हा श्लोक म्हणून भद्रासनावर साळी पसरून त्याचें अष्टदल कमल काढावें व त्या आसना-

तत्कर्णिकायां कुशरत्नगर्भं संस्थापयेऽलंकृतभद्रकुंभम् ॥

ओं मूलवेद्याः पूर्वस्यां दिशि भद्रकुंभं निवेशयामीति स्वाहा ॥

भद्रासनोपरि भद्रकुंभनिवेशनम् ॥ ५ ॥

मन्विक्षाकुकुरूग्रनाथहरिसंज्ञापूर्ववंशोद्भवाः ।
धीरोदात्तमहीक्षितः क्षितिनुता यज्जीवितेशाश्च याः
देवेंद्राः प्रणमंति देवयुवतिव्रातश्चिरं सेवते ॥
दासीवत्सकलाश्च तास्त्रिजगतामंबा जिनांबा यजे ॥ ६ ॥

ओं निरतिशयभक्तिभरानतपुरंदरपरिचोदितविविधसेवाविधायिश्रीप्रभृतिदिक्कुमारीकृतसंस्कारातिपूतगर्भागारपरिकल्पितदिव्यारविंदाविष्टरोपविष्टपरमोत्कृष्टशक्तिजुष्टसत्पन्ननिःकलविश्वेश्वरवृषभादितीर्थकराभिख्यपुत्रप्रसवपवित्रीकृतसर्वलोकानाम् ॥

निजतनूजजगच्चूडामणिजिनगुणानुरागावनम्रसुरेंद्रमुकुटतटघटितहटन्माणिक्यमयूखमालाबालातपोल्लासितसमसमानतसुरकामिनीजनकुटिलकुंतलकलापचंचरीकचुंबितपादारविंदानाम् । विश्वेश्व-

---

वर पूर्वदिशेला कुंभ स्थापावा.

६ 'मन्विक्षाकु' हा श्लोक ह्मणून चोवीस जिनमातांची पूजा करावी. ह्या माता इक्ष्वाकु, कुरु, नाथ, उग्र वगैरे उत्तम वंशामध्यें जन्मलेल्या आहेत. यांचे पति ही उत्तम वंशांत जन्मलेले होते. या मातांना देवेंद्र नमस्कार करितात. देवांगना दासीप्रमाणें यांची सेवा करितात. ना लोकमाता आहेत. यांची मी पूजा करितो.

'निरतिशयेति' हा मंत्र ह्मणून चोविस जिनमातांची जिनयज्ञामध्यें सर्व विघ्नें नाहींशी व्हावीत ह्मणून आव्हान

सर्वाशाः पूरयंतो बलिमनुमुखराः सर्वधान्यैश्च लाजैः ॥
सत्पुष्पैरक्षतौघैर्जिननिलयमिमे त्रिः परीयाम शान्त्यै ॥ ६ ॥

ओं अर्हद्भ्यो नमः ।

प्रमादाज्ञानदर्पाद्यैर्विहितं विहितं न यत् ॥
जिनेंद्रास्तु प्रसादात्ते सकलं सकलं च तत् ॥

क्षमापणपूर्वकं पंचांगप्रणामः ॥ ७ ॥

मोहध्वातविदारणं० । भूयात्पुनर्दर्शनम् ॥ इति गमनाप्रच्छनम् ॥ ८ ॥

इत्थं सौधर्मशक्रप्रभृतिसुरवरा यां जिनेंद्रस्य साक्षात् ॥
चक्रुर्दीक्षाग्रहाख्योत्सवविषयमहाश्चर्यकल्याणपूजाम् ॥
तामारोप्यात्र बिंबे विधिवदिहकृता शक्तितो भूरिभक्त्या ॥
भुक्त्यै मुक्त्यै च यष्टृप्रभृतितनुभृतामस्तु कल्याणपूजा ॥

आदरानें त्या प्रतिमेच्या मागून सर्व भव्यानी जावें. सर्वांच्या इच्छा पूर्ण करून फुलें व अक्षतासहित जिनमंदिरास भव्यानीं तीन प्रदक्षिणा घाव्यात.

७ 'प्रमादेति' श्लोक म्हणून क्षमा मागून पंचांग नमस्कार करावा.

८ 'इत्थमिति', या प्रमाणे इंद्रानें दीक्षाग्रहण विधि जिनेश्वराचा केला होता. तो विधि या जिनप्रतिमेमध्यें आरोपून त्याचा सर्व प्रकार आम्ही येथें केला. हा दीक्षाकल्याणविधि इंद्र, यजमान वगैरेना नानाप्रकारचे भोग देणारा व मोक्ष देणारा होवो

इष्टप्रार्थनाय पुष्पांजलिः ॥

इत्थं निधत्ते जिनपुंगवस्य निष्क्रांतिकर्मोत्सवसंविधिं यः ॥
निष्कान्तिकर्मोत्सवमाशु यास्यत्यमुत्र नूनं स हि धर्मनेमिः ॥

इत्यर्हत्प्रतिष्ठासारसंग्रहे नेमिचंद्रदेवविरचिते प्रतिष्ठातिलकनाम्नि
निष्क्रमणकल्याणविधिर्नाम दशमः परिच्छेदः ॥ श्रीः ॥ श्रीः ॥ श्रीः ॥

९ 'इत्थमिति, या प्रमाणें जो दीक्षाकल्याणिकाचा हा विधि करितो तो परलोकीं धर्मरूपी रथाची धाव बनून दीक्षाकल्याणिकाच्या विधीस प्राप्त होतो.

या प्रमाणें नेमिचद्र देवांनी रचिलेल्या प्रतिष्ठातिलक नांवाच्या ग्रंथांतील निष्क्रमण कल्याणिक विधिवर्णनाचा दहावा अधिकार संपला.

# एकादशः परिच्छेदः ।

अथ केवलज्ञानकल्याणम् ।

अथांकुरार्पणादिनान्नवमे दिवसे दिवा ॥
केवलज्ञानकल्याणं विदधीत यथाविधि ॥ १ ॥
तत्रादौ व्यासतो यागमंडलस्य समर्चनम् ॥
तदग्रस्थापिते पीठे प्रतिमास्थापनं ततः ॥ २ ॥
आव्हानादिविधिः स्वर्णशलाकाविनिवेशनम ॥
कल्याणपंचकारोपः संस्कारारोपणं ततः ॥ ३ ॥
मंत्रन्यासविधिः पश्चात्प्रतिष्ठाहोमसविधिः ॥

१ अंकुरारोपण दिवसापासून नवव्या दिवशी दिवसा प्रतिष्ठाशास्त्रोक्तविधीनें केवलज्ञानकल्याणाचा विधि करावा.

२ प्रथमतः या मंडलाचें विस्तारानें पूजन करावें. तदनंतर यागमंडळाच्या पुढें स्थापिलेल्या सिंहासनावर प्रतिमास्थापन करावें.

३ आव्हान वगैरे करून पादपीठ व सिंहासन या दोहोंच्या मध्यभागीं सोन्याच्या सळईची स्थापना करावी. यानंतर पंचकल्याणिकाचें व संस्कारांचें आरोपण करावें.

४ तदनंतर मंत्राक्षरें लिहिण्याचा विधि आणि प्रतिष्ठाहोमविधि करावा. या वेळीं गंधयंत्राचें आराधन

तत्काले गंधयंत्रस्याराधनं कुसुमैर्जपः ॥ ४ ॥
प्रतिष्ठातिलकन्यासस्ततः स्यादधिवासना ॥
अथ स्वस्त्ययनं चाशीर्दानं वृक्षनिवेशनम् ॥ ५ ॥
नयनोन्मीलनं गंधलेपनं गुणरोपणम् ॥
न्यासो दशातिशीतीनां समवादिसृतेरपि ॥ ६ ॥
दिव्यातिशयसंकल्पः प्रातिहार्यप्रकल्पनम् ॥
लांछनस्थापनं यक्षयक्षीस्थापनमन्वतः ॥ ७ ॥
कल्याणपंचकारोपः कंकणस्य विमोचनम् ॥
साक्षात्कृतिर्जिनेंद्रस्य श्रीमुखोद्घाटनं ततः ॥ ८ ॥

आणि फुलानी जप करावा.

५ तदनंतर प्रतिष्ठातिलक लावण्याचा विधि व अधिवासन विधि हे करावेत. स्वस्त्ययनविधि, आशीर्वाददान विधि, व वृक्षस्थापन हे विधि करावेत.

६ डोळे उघडणें, [ नयनोन्मीलन विधि ] गंधलेपन, गुणांचें आरोपण व दहा अतिशयांचें स्थापन व समवसरणरचना हा विधि करावा.

७ दिव्य अतिशयांचा संकल्प, आठ प्रातिहार्यांची रचना, लांछनस्थापन, यक्ष व यक्षी स्थापन हा विधि करावा.

८ कल्याण पचकाचें आरोपण, कंकणमोचन, जिंनेंद्राचा साक्षात्कार, व श्रीमुखोद्घाटन हे विधि करावेत

अर्घ्यपुष्पांजलिश्चाशीः शांतिधारास्तुतिर्मुदा ॥
अर्थन्यासादिकं यष्ट्रा सहस्राख्यादिभिः स्तुतिः ॥ ९ ॥
संगीतं केवलज्ञानकल्याणस्योचितक्रिया ॥
पूजा मुनीनां गंधाद्यैर्भव्यसंघस्य तर्पणम् ॥ १० ॥
रामासविधिना यागमंडलस्य समर्चनम् ॥
द्वारपालबलिर्ब्रह्मबलिर्दिक्पालसद्बलिः ॥ ११ ॥
ग्रामसंबंधिनां ब्रह्मादिक्पालाना बलिस्ततः ॥
विहारघोषणापूर्वं विहारस्त्रिजगत्प्रभोः ॥ १२ ॥
कुंभैरष्टशतेनाभिषेकश्चैकादशार्चनम् ॥
विसर्जनं निर्जराणामध्यात्माध्यासनं विभोः ॥ १३ ॥

९ अर्घ्य, पुष्पांजलि आशीर्वाद, शांतिधारा, स्तुति, इंद्र करून सहस्र नामस्तुति हे करावेत.

१० तदनंतर संगीत म्हणजे गायन वाद्य व नृत्य हे करावें. केवलज्ञान कल्याणाला योग्य अशी क्रिया करावी. मुनींचे पूजन करून गंध, अक्षता, फळें, तांबूल इत्यादिकांनीं भव्यसंघांचें तर्पण करावें.

११—१३ संक्षेपानें यागमंडलाचें पूजन करून द्वारपालबलि, ब्रह्मबलि, व दिक्पालबलि हे करावेत. तदनंतर ग्रामसंबंधी ब्रह्मबलि व दिक्पालबलि हा विधि करावा. तदनंतर विहारघोषणा करून तीर्थंकराचा विहार करावा. ८०० कुंभांनीं अभिषेक व एकादशार्चन विधि करावा देवांचें विसर्जन व प्रभूला हृदयामध्यें

शांतिधारा ततः शान्तिबलिकर्म क्षमापणम् ॥
गमनाप्रच्छनं पश्चात्कृतकर्मफलार्थना ॥ १४ ॥
इति प्रातिष्ठादिवसाक्रियाक्रम उदीरितः
तत्तत्कर्मविशेषस्तु प्रयोगे प्रतिपाद्यते ॥ १५ ॥

अथ केवलज्ञानकल्याणविधानमनुवर्णयिष्यामः ॥

तत्रादौ पूर्ववन्मूलवेद्यां प्रतिष्ठायंत्राराधनां निष्ठाप्य तत्कल्याणमेवं विदध्यात् ॥

पीठत्रयाग्रविलसद्धरिपीठकल्पं सद्वेदिकोपरि तटे निदधामि पीठं ॥
प्रक्षालयामि शुचिभिः सलिलैः पटेन प्रच्छादितेत्र निदधेक्षतपुष्पदर्भान् ॥

ओं ह्रीं अर्हं क्ष्मं ठ ठ श्रीपीठस्थापनं करोमि स्वाहा ॥ श्रीपीठस्थापनं ॥ ओं ह्रां ह्रीं ह्रूं ह्रौं ह्रः नमोर्हते भगवते श्रीमते पवित्रतरजलेन पीठप्रक्षालनं करोमि स्वाहा पीठप्रक्षालनम् ॥ तत्पीठोपरि प्रागग्रवस्त्राच्छादनम् ॥ ओं ह्रीं दर्पमथनाय नमः सकुसुमाक्षतरत्नहेमदर्भ-

---

१४–१५ तदनंतर शांतिधारा, शांति, बलिक्रिया, व क्षमा मागणें हे विधि करावे. जाण्याविषयीं विचारणें व केलेल्या क्रियाचें फल मागणें हे विधि करावे याप्रमाणें या प्रतिष्ठादिवसांच्या क्रियेचा क्रम दाखविला. आतां या सर्व विधींचा प्रयोग दाखवितो.

( १ ) 'तत्रादौ इति' आतां केवलज्ञानकल्याणाचा विधि सांगण्यापूर्वीं प्रथम मूलवेदीवर प्रतिष्ठायंत्राराधनविधि समाप्त करून केवलज्ञानकल्याणिक विधि या प्रमाणें करावा :—

'पीठयंत्रेति' वेदिकेवर सिंहासन ठेऊन तें पवित्र पाण्यानें धुवावें तदनंतर त्याच्यावर नवीन वस्त्र आच्छादावें.

स्थापनम् ॥ १ ॥ स्वच्छैस्तीर्थ० ॥ पीठं समभ्यर्चये ॥ ओं ऱ्हीं सम्यग्दर्शनज्ञानचारित्राय स्वाहा ॥ पीठार्चनम् ॥

अथ जिनपतिबिंबे कर्म निष्क्रांतियोग्यं
विधिवदिह विधायाशेषमानयि भुयः ॥
तमितरजिनबिंबैराचितां मूलवेदीं
तदुपरि निहितेऽस्मिन्विष्टरे स्थापयामः ॥

इदमुक्त्वा दीक्षाग्रहणमंडपास्थितजिनबिंबाग्रे पुष्पांजलिं विकीर्य तान्बिंबान्नीत्वा मूलवेदीयंत्रोपरिस्थापितपीठे स्थापयेत् ॥ २ ॥

इमं मंत्रं पठेत् ॥

ओं यस्य भाक्तिवशतास्त्रिदशैः समस्तकल्याणपूजनविधिर्विदधे समस्तैः ॥
तं वेदिकोपारिमपीठतले सुवस्त्रप्रच्छादिते जिनपतिं विनिवेशयामि ॥ ३ ॥

---

'ओं ऱ्हीं दर्पमथनाय' हा मंत्र म्हणून फुलें, अक्षता रत्नदर्भ यांची त्याच्यावर स्थापना करावी. 'स्वच्छै' हा श्लोक व मंत्र म्हणून पीठाचें पूजन करावें

२ 'अथेति' हा श्लोक म्हणून दीक्षाग्रहणमंडपांत असलेल्या जिनबिंबान्या पुढें पुष्पांजलि क्षेपण करून त्या जिनप्रतिमा नेऊन मूल वेदीच्या यंत्रावर स्थापलेल्या पीठावर ठेवाव्यात. तदनंतर.

३ 'ओं यस्येति' हा श्लोक व आव्हान स्थापन आणि सन्निधीकरणाचे मंत्र म्हणावे. या श्लोकाचा अभिप्रायः—भक्तिनें सर्व देवांनीं ज्याचीं सर्व कल्याणिकें केलीं त्या जिनपतिला वस्त्राच्छादित सिंहासनावर मी स्थापितो.

श्रीमुख्यदेवीषु जगत्रयांबामुपासमानासु सदा द्विरष्ट—॥
स्वप्नावसानेऽत्र दिवोवतीर्णः स एव देवो जिनबिंब एषः ॥ ४ ॥
गर्भावतरणकल्याणस्थापनाय प्रतिमोपरि पुष्पांजलिं क्षिपेत् ॥

अथ जन्माभिषेककल्याणमालारोपणम् ॥
ज्ञात्वा घटादिनादैर्मुदितममराः कल्पजाद्याः समीयुः ॥
शच्यानीयार्पितं यं सुररदनिगतः स्वांकमारोप्य नीत्वा ॥
मेरौ संस्नाप्य दुग्धांबुधिविमलजलैर्भूषयित्वा जनन्याः ॥

लिक्षेपण करावें.

'स्वप्ना' श्लोकांचा सारांशः—सोळा भावनांच्या चिंतनानें तीर्थंकरनामकर्माचा बंध झाल्यानंतर जो स्वर्गांत इंद्रपदाच्या सुखांचा अनुभव घेऊन भूतलावर अवतरण्यास उन्मुख झाल्यावर पंधरा महिने इंद्राच्या आज्ञेनें कुबेरानें तीर्थंकराच्या पित्याच्या घरीं रत्नांची वृष्टि केली. गुह्यक नांवाच्या देवांनीं सुंदर मंदार पुष्पांची वृष्टि केली. सुगंध वारा वाहूं लागला. देवांनीं नाना वाद्यें वाजविलीं श्री ह्री वगैरे देवींनीं मातेची येऊन उपासना केली. मातेला सोळा स्वप्नें पडल्यावर जो गर्भांत आला तो हा जिन आहे. असा संकल्प करून प्रतिमेवर पुष्पांजलिक्षेपण करावें.

९ 'ज्ञात्वेति' हा श्लोक ह्मणून जन्माभिषेक कल्याणाची स्थापना करण्याकरितां प्रतिमेवर पुष्पांजलिक्षेपण करावें स्वर्गवासी ज्योतिर्वासी इत्यादि देवांच्या विमानामध्यें घंटानाद, सिंहनाद वगैरे झाल्यावर देव पितृगृहीं आले. इंद्राणीनें जिनबालकास इंद्राजवळ दिलें. त्यानें जिनाला ऐरावत हत्तीवर आपल्या मांडीवर घेऊन मेरुप-

संयोज्येंद्रः सिषेवे सुरजनविनियोगोपभोग्यः स एषः ॥
जन्माभिषेककल्याणस्थापनाय प्रतिमोपरि पुष्पांजलिं क्षिपेत् ॥ ५ ॥

अथ निष्क्रमणकल्याणमालारोपणम् ॥

स्वर्भूगोचरयोग्यभोग्यसुलभ संत्यज्य राज्यं वशी ॥
यो लौकांतिकसंस्तुतः सुरकृतस्नानोत्मवालंक्रियः ॥
आरुढः शिबिकां नरांबरचरामर्त्यैश्वगेढां वनं ॥ ६ ॥
गत्वादाय तपस्तदा स्म लभते तुर्यां धियं सोस्त्वयं ॥
निष्क्रमणकल्याणस्थापनाय प्रतिमोपरि पुष्पांजलिं क्षिपेत् ॥

अथ केवलज्ञानकल्याणमालारोपणम् ॥ ६

---

वंतावर नेले. तेथें क्षीरसमुद्राच्या पाण्याने त्याचा अभिषेक करून देवाना जिनाच्या सेवेमध्ये ठेविलें. जिनाला अलंकृत करून मातेजवळ आणून दिले. तोच हा जिन आहे असा संकल्प प्रतिमेवर करावा.

दीक्षाकल्याणमालारोपण

६ 'स्वर्भूगोचरेति' हा श्लोक ह्मणून दीक्षाकल्याणाची स्थापना करण्याकरितां प्रतिमेवर पुष्पांजलिक्षेपण करावे या श्लोकाचा सारांशः— स्वर्गीय व भूतलावरील योग्य भोग्य पदार्थांना उपभोग घेऊन ज्यानें राज्यत्याग केला. ज्याची लौकांतिकानीं स्तुति केली. देवांनीं ज्याचा अभिषेक करून वस्त्रालंकारांनी भूषित केले. जो पालखींत बसून वनांत गेला व ज्यानें दीक्षा घेऊन चतुर्थ ज्ञानाची प्राप्ति करून घेतली तोच हा जिनेश्वर आहे. असा प्रतिमेत संकल्प करावा.

तिष्ठन्गुणस्थानचतुष्टये संदृष्ट्यादिकेतोऽपि च धर्म्ययोगात् ॥
अयत्नवीतामनुजत्रयायुर्यो मोहसप्तप्रकृतीर्निहन्ति ॥ ७ ॥
ततः क्षायिकसद्दृष्टिः क्षपकश्रेणिमाश्रयन् ॥
गुणस्थाने सप्तमेऽधः प्रवृत्तकरणं भजन् ॥ ८ ॥
अष्टमेऽपूर्वकरणं अनिवृत्यादिकं पुनः ॥
नवमे लभते स्थाने स्थानेऽ त्रैवाद्यभागके ॥ ९ ॥
साधारणस्थावरसूक्ष्मतिर्यगायुर्द्वयोद्योतननारकायुः ॥
द्व्यातपानादिमशुक्लकेन निद्रात्रयं जातिचतुष्टयं च ॥ १० ॥
अष्टौ कषायानथ तद्द्वितीये तृतीयके क्लैब्यमथो तुरीये ॥
स्त्रीवेदमग्रे तु हसादिषट्कं प्रक्षिप्य पुंवेद उदीच्रि तद्वत् ॥ ११ ॥
क्रोधं च मानं निकृतिं च लोभं षष्ठादिके संज्वलनस्वरूपम् ॥

'तिष्ठन्निति' इत्यादि सहापासून अठरा श्लोक ह्मणून केवलज्ञानरूपाची स्थापना करण्याकरितां प्रतिमे वर पुष्पांजलिक्षेपण करावें. या श्लोकाचा सारांशः— अविरतसम्यग्दष्ट्यादि चार गुणस्थानापैकीं कोणत्याही गुणस्थानांत सम्यग्दर्शनघातक अशा सात प्रकृतिंचा–अनंतानुबंधि क्रोध, मान, माया व लोभ आणि मिथ्यात्व, सम्यग्मिथ्यात्व व सम्यक्त्व यांचा नाश झाल्यानें क्षायिक सम्यग्दर्शन प्राप्त होतें. तीर्थंकराच्या देवायु, नरकायु व तिर्यंचायूंचा प्रयत्नावांचून नाश झालेला असतो. क्षायिकसम्यग्दृष्टि असे तीर्थंकर क्षपणश्रेणीचा आश्रय करून सातव्या गुणस्थानात अधःकरणाची प्राप्ति करून घेतात. आठव्या गुणस्थानाचें अपूर्वकरण हे नांव आहे. यात

लोभंच तं बादरकिट्टिक्लृप्त्या स्थाने तु सूक्ष्मादिकसांपराये ॥ १२ ॥
लोभं ततः क्षीणकषायसंज्ञे पदे सनिद्रा प्रचलामुपान्ते ॥
अंते तु घातित्रितयं परेण शुक्लेन योर्हन्क्षपयेत्स एषः ॥ १३ ॥

द्रव्याणां निजमर्थपर्ययमय भावाणुकं वा नयैः ।
ध्यायन्नेव चिराद्वितर्कबलतो स्थितया पृथक्त्वेन यः ॥
अर्थव्यंजनयोगसंक्रमवता चित्तेन मोह क्षिपे-
द्वालः कुंठकुठारकेन कुटमुच्छिंदन्निवैषोऽस्तु सः ॥ १४ ॥
निर्जित्याजेयमोहं समधिगतयथाख्यातचारित्रराज्यः ॥
स्वात्मैकालंबिपूर्वश्रुतमयगतवीचारमद्ध्याननिष्ठः ॥

---

अपूर्व करणांची प्राप्ती होते. नवव्या गुणस्थानाचे अनिवृत्तिकरण हे नाव आहे. या गुणस्थानाच्या पहिल्या विभागामध्यें साधारण, स्थावर, सूक्ष्म, तिर्यगायु, तिर्यग्गति, उद्योत, नरकायु, नरकगति, आताप, निद्रानिद्रा, प्रचलाप्रचला, स्त्यानगृद्धि, एकेन्द्रियजाति, द्वीन्द्रियजाति, त्रीन्द्रियजाति, चतुरिन्द्रियजाति, या सोळा कर्मांचा शुक्लध्यानाने नाश होतो. याच गुणस्थानच्या दुसऱ्या भागांत प्रत्याख्यान व अप्रत्याख्यान क्रोध, मान, माया, लोभ या आठ प्रकृति, तिसऱ्या भागात नपुसक वेद, चौथ्या भागात स्त्रीवद याचा नाश होतो व हास्य, रति, अरति, शोक, जुगुप्सा, भय हे सहा नोकपाय, पुंवद स्वरूपाचे वनऊन पुंवेदाला संज्वलन क्रोधरूप करणें, क्रोधाला मानरूप करणे मानाला माया रूपकरणें व मायेला लोभरूप करणे अशी स्थिति या ९ व्या गुणस्थानाच्या शेवटच्या भागात होते. दहाव्या गुणस्थानात लोभ सज्वलन अगदी सूक्ष्म होतो म्हणून या गुणस्थानाला सूक्ष्मलोभ किंवा सूक्ष्मसांपराय

शुद्धस्यात्मानुभूतिप्रभवबहुनगनंदमांद्रः स साक्षात ॥
ज्ञानावृत्त्यादिघातित्रितयचलहगेऽत्रास्तु निर्ग्रंथराजः ॥ २५ ॥
प्रक्षीणे घातिजाते निरवधिकमहाबोधदृग्वीर्यसौख्याम् ॥
जीवन्मुक्ति प्रपन्नो नृसुरमुनिमहास्थानसिंहासनस्थः ॥
यश्चाष्टप्रातिहार्यो निरतिशयचतुस्त्रिंशदुद्यातिशेषः ॥
कुर्वाणो धर्मतीर्थं विहरति स भवान् योगवत्केवलींद्रः ॥ २६ ॥

हे नांव आहे. या गुणस्थानाच्या शेवटी या लोभ [illegible] नाश होतो. पुढे बाराव्या गुणस्थानी उपान्त्य समयीं निद्रा व प्रचला यांचा नाश होतो. व शेवटच्या समयीं [illegible] गुणस्थानांत ज्ञानावरणीय, दर्शनावरणीय, व वीर्यांतराय या तीन घातिकर्मांचा नाश जिनेश्वर करितात. असा संकल्प प्रति [illegible] करावा. द्रव्याचे पर्याय व आत्मपर्याय यांचा पृथक्त्ववितर्क विचार या शुक्ल ध्यानाने आठ [illegible] गुणस्थानांत करिता येतो. या विचाराच्या वेळी अर्थ—पदार्थ शब्द व [illegible] बदल होत असतो. या हळु हळु केलेल्या विचाराने बोथट कुऱ्हाडीने लाकड तोडण्यास जसा उशीर लागतो तसा हळु हळु मोहनीय कर्माचा नाश केला जातो. याप्रमाणे मोहनीय कर्माचा नाश केल्याने यथाख्यात चारित्र प्राप्त होत [illegible] आत्मानुभवाच्या आनंदाने हा जिन युक्त होतो. व ज्ञानावरणादि तीन घाति कर्मांची शक्ति [illegible] अर्थात् या बाराव्या गुणस्थानात सर्व नाहीशी होते. घातिकर्मांचा नाश झाला असतां जिनेश्वरास अनंतज्ञान, दर्शन, वीर्य व सुख प्राप्त होते. या तेराव्या गुणस्थानात जिनेश्वरास जीवन्मुक्त म्हणतात. देव मनुष्य, मुनि यांच्या सभेत भगवान सिंहासनावर विराजमान होतात. यांना आठ प्रातिहार्य व चौतीस अतिशय प्राप्त होतात, व धर्मतीर्थाचा प्रसार करीत भगवान् विहार करितात.

तीर्थंकरव्यक्तिविशेषसंवित्प्रवृत्तिमुख्यव्यवहारसिद्ध्यै ॥

यल्लक्षणं ते मतमिंद्रमुख्यैस्त्वद्गौरवात्सादरमर्च्यते तत् ॥ १७ ॥

निःश्रेयसार्थैकनिदानभूत त्वत्पादसेवासु सदा नियुक्ते ॥

यदोशयक्षीषु कृतेन येन शक्रादयस्तद्बहु मानयंति ॥

केवलज्ञानकल्याणस्थापनाथ प्रतिमोपरि पुष्पांजलिं क्षिपेत् ॥ १८ ॥

अथ निर्वाणकल्याणमालारोपणम् ॥

अंतर्मुहूर्तायुषि चावशिष्टे सूक्ष्मक्रियाद्यप्रतिपातियोगात् ॥

सूक्ष्मीकरोतु स्वशरीरयोगं यः केवली योगयुतः स एषः ॥ १९ ॥

संघातबंधनरसास्तनवश्च वर्णाः । पंचाथ सुस्वरशुभस्थिरगंधवद्वै ॥

द्वेधाभ्रयानममरायुरिहानुपूर्व्यं संस्थानसंहननकानि तु षट् षडेव ॥ २० ॥

---

१७. प्रत्येक तीर्थकराचें पृथक् पृथक् ज्ञान व्हावें व त्यांचा वेगळेपणा ध्यानांत यावा म्हणून इंद्रांनीं लांछनें ठरविलीं आहेत. त्या लांछनांचीं आम्हाकडून आदरानें पूजा केली जाते.

१८ हे जिनेश्वरा, मोक्षप्राप्तीस असाधारण कारण अशा तुझ्या चरणाची सेवा करण्यासाठीं यक्ष व यक्षी यांची इंद्र योजना करीत असतात व त्यांचा ते बहुमान करितात.

१९ ' अंतर्मुहूर्तेति ' वगैरे श्लोक म्हणून निर्वाणकल्याणाची स्थापना करण्याकरितां प्रतिमेवर पुष्पांजलि क्षेपण करावी. जेव्हां अंतर्मुहूर्त आयुष्य उरतें त्यावेळीं भगवान सूक्ष्मक्रियाप्रतिपाति ध्यानाचा आश्रय करून काययोग सूक्ष्म करितात. हें कृत्य सयोग केवलिगुणस्थानांत होतें.

२०–२२ ' संघातेति ' या श्लोकाचा अभिप्राय–संघात, ५ बंधन, ५ रस, ५ शरीरें ५ वर्ण, ५ सुस्वर, शुभ, स्थिर,

स्पर्शाष्टकागुरुलघुच्छ्वसितोपघातानादेयनिर्मितिविनिंद्ययशोन्यघाताः ॥

प्रत्येकनीचकुलयुग्ममपूर्णमंगोपांगत्रयान्यतरवेद्यकदुर्भगानि ॥ २१ ॥

एतद्द्विसप्ततिविधाः प्रकृतीरयोगकेवल्युपांतसमये चरमेण शुक्ल—

ध्यानेन संक्षपयाति क्षपकाधिपो यः साक्षात्स एव भगवानयमस्तु बिबः ॥ २२ ॥

मर्त्यायुः सुभगं मनुष्यगतिमानुष्यानुपूर्वायशः—

कीर्तीः पंचखजातिरन्यतरवेद्यं च त्रसं बादरम् ॥

पर्याप्तोच्चकुले च तीर्थकरतादेयं च तिस्रो दश ॥

क्षिप्त्वैताः प्रकृतीस्तदन्तसमये यः सिद्ध्यतीहास्तु सः ॥ २३ ॥

चित्कायं निरपायमाप्य सहजानंदं च येनोज्झितं ॥

विद्युद्दामवदस्तसंहतिवपुस्तल्लज्जयैव स्वयम् ॥

---

दोन गंध, २ विहायोगति, देवायु, देवगत्यानुप्रायोग्य, ६ संस्थान, ६ संहनन, ८ स्पर्श, अगुरुलघु, उच्छ्वास, उपघात, अनादेय, निर्माण, अयशस्कीर्ति, परघात, प्रत्येक, नीचकुल, अपर्याप्त, अंगोपांग तीन, सातावेदनीय व असातावेदनीय यापैकीं एक, दुर्भग या बाहात्तर प्रकृतिंचा अयोग केवली गुणस्थानाच्या उपांत्य समयांत भगवान नाश करितात.

२३ 'मर्त्यायुरिति' मनुष्यायु, सुभग, मनुष्यगति, मनुष्यानुपूर्व्य, यशःकीर्ति, पंचेंद्रियजाति, साता असातावेदनीयापैकीं एक वेदनीय कर्म, त्रस, बादर, पर्याप्त, उच्चकुल, तीर्थकरत्व, या तेरा प्रकृतींचा अयोगकेवली गुणस्थानाच्या शेवटच्या समयांत भगवान् नाश करितात.

२४ 'चित्कायमिति' अविनाशी ज्ञानरूपी शरीराचा लाभ करून घेऊन भगवंताने आपलें परमौदारिक शरीर

कृत्वा निक्रिययोद्धचंदनमुखैर्म्नीन्द्रमौल्याग्निना ॥
संस्कृत्यानुधगंति भस्म भवनामर्त्याः स जीयाज्जिनः ।। २४ ॥
विजितसकलकर्मा निर्मलध्यानयोगात् ॥
अधिगतजगदग्रः सोर्ध्वयानः स्वभावात् ॥
गुणनिधिरथ लब्ध्वा लोकचूडामणित्वं ॥
सहजसुखसुतृप्तो भाति योऽयं स नोऽव्यात ॥ २५ ॥
निर्वाणकल्याणस्थापनाय प्रतिमोपरि पुष्पांजलिं क्षिपेत् ॥

इति कल्याणपंचकस्थापनम ॥

अथ संस्कारमालारोपणम् ॥

सद्दृष्टिलाभाद्यपवर्गलक्ष्मीपर्यंततत्तत्पदसंभवंताम् ॥

---

सोडून दिले. त्यावेळी विक्रियेनें देव नवे शरीर निर्माण करून ते अग्नीद्रांच्या मुकुटाग्नीनें जाळतात व त्याचें भस्म आपल्या अंगाला लावतात. असा तो जिनेश्वर विजयी होवो.

२५ 'विजितेति' ज्यानें निर्मल ध्यानानें सर्व कर्मे जिंकिली. जो गुणसंपन्न होऊन स्वाभाविक ऊर्ध्वगतीने लोकाग्रीं विराजमान झाला व स्वाभाविक सुखानें जो तृप्त झाला तो हा जिन आमचें रक्षण करो. हे सर्व श्लोक ह्मणून निर्वाणकल्याणाची स्थापना करण्याकरितां प्रतिमेवर पुष्पांजलि क्षेपण करावी.

याप्रमाणें पंचकल्याणिकांची स्थापना झाली.

आतां संस्कारमालांचें आरोपण.

१ 'सद्दृष्टिरिति' सम्यग्दर्शनाच्या लाभापासून मोक्षलक्ष्मीच्या प्राप्तीपर्यंत जीं जी पदें मिळतात त्या त्या

संस्कारमाला निदधेऽष्टचत्वारिंशन्मितामत्र जिनेंद्रबिंबे ॥ १ ॥

संस्कारमालारोपणप्रातिज्ञापनाय प्रतिमोपरि पुष्पांजलिं क्षिपेत् ॥

प्रवर्द्धमानामलदर्शनस्य निर्बाधबोधस्य सदा सवीचः ॥

पवित्रचारित्रविधेः क्रमेण संस्कार एषोऽत्र चकास्तु बिंबे ॥ २ ॥

ओं ह्रीं अयं सम्यग्दर्शनसंस्कार इहार्हति स्फुरतु स्वाहा ॥ १ ॥

एतदर्थारोपणपरायणांतःकरणः पठित्वा प्रतिमोपरि पुष्पांजलिं क्षिपेत् । एवमुत्तरत्र सर्वत्र संस्कारारोपणमंत्रांते पृथक् पृथक् पुष्पांजलिं कुर्यात् ॥ ओं ह्रीं सम्यग्ज्ञानसंस्कार इहार्हति स्फुरतु स्वाहा ॥ २ ॥ ओं ह्रीं सम्यक्चारित्रसंस्कार इहार्हति स्फुरतु स्वाहा ॥ ३ ॥

द्विषट्प्रकारोग्रतपोभरस्य चतुर्विधाराधनगोचरत्वात् ॥

विशिष्टवीर्यस्य चतुर्विधस्य संस्कार एषोऽत्र• ॥ ३ ॥

ओं ह्रीं अयं बाह्याभ्यंततपःसंस्कार इहार्हति स्फुरतु स्वाहा ॥ ४ ॥

---

पदामध्यें होणाऱ्या ४८ संस्कारांची स्थापना करण्याची प्रतिज्ञा करण्याकरितां जिनबिंबावर पुष्पांजलि टाकावी.

२-३ 'प्रवर्धेति' हा श्लोक म्हणून निर्मल सम्यग्दर्शन, निर्बाध ज्ञान व पवित्र आणि निर्दोष चारित्र या रत्नत्रयांचा जिनबिंबावर संस्कार 'ओं ह्रीं अयं सम्यग्दर्शनसंस्कार' वगैरे तीन मंत्र म्हणून करावा.

४ 'द्विषडिति' हा श्लोक म्हणून चार प्रकारच्या आराधनांना विषय असलेल्या अभ्यंतर तप व बाह्य तप यांचा व चार प्रकारच्या विशिष्ट वीर्यांना संस्कार जिनबिंबावर करावा.

ओं ऱ्हीं चतुरंगवीर्यसंस्कार इहार्हति स्फुरतु स्वाहा ॥ ५ ॥

गुप्तित्रयस्याथ सपंचभेदसमित्युपेतस्य विशुद्धिहेतोः ॥

मतेत्र मात्राष्टकसंज्ञितस्य सस्कार० ॥ ६ ॥

ओं ऱ्हीं अयं अष्टमातृमंडलप्रवेशसंस्कार : इह र्हति स्फुरतु स्वाहा ॥

भैक्षेर्यकावान् शयनासनागव्युत्सर्गचेतोविनयेषु सम्यक् ॥

शुद्धे विशुद्ध्यष्टकसंचितायाः ॥ संस्कार० ॥

ओं ऱ्हीं अयं शुद्ध्यष्टकावष्टंभसंस्कार इहार्हति स्फुरतु स्वाहा ॥ ७ ॥

परीषहाघोर्जितनिर्जयस्य त्रियोगजासंयमवर्जनस्य ॥

कृतादिजा संयमसंहतेश्च संस्कार० ॥

ओं ऱ्हीं अयं अशेषपरीषहजयसंस्कार इहार्हति स्फुरतु स्वाहा ॥ ८ ॥

ओं ऱ्हीं अयं त्रियोगासंयमानिवृत्तिशीलतासंस्कार इहार्हति० ॥ ९ ॥

ओं ऱ्हीं अयं त्रिकरणासंयमनिवृत्तिशीलतासंस्कार इहार्हति० ॥ १० ॥

---

५ 'गुप्तित्रयस्येति' हा श्लोक म्हणून चारित्रविशुद्धीला कारण [illegible] पांच समिति व तीन गुप्ति यांचा जिनबिंबावर संस्कार करावा. गुप्ति व समिति यांना अष्टमातृका असें नांव आहे.

७ 'भैक्षेति' हा श्लोक म्हणून जिनबिंबावर भिक्षाशुद्धि, ईर्याशुद्धि, [illegible]नासनशुद्धि, अंगशुद्धि, व्युत्सर्गशुद्धि, चेतःशुद्धि, विनयशुद्धि व वाक्यशुद्धि या आठ शुद्धींचा संस्कार करावा.

८–१० 'परीषहेति' हा श्लोक म्हणून परीषहजयसंस्कार, त्रियोगापासून अर्थात मन वचन शरीर यापासून असंयम दूर करणें हा संस्कार व कृत, कारित आणि अनुमोदनांनीं असंयमापासून दूर राहणें असे तीन सं-

प्राणेंद्रियाः संयमशीलनस्य दशप्रकारस्य तु शीलनस्य ॥
पंचेंद्रियाणां दृढनिश्चयस्य संस्कार० ।
ओं ऱ्हीं अर्यं दशसंयमत्रिशीलतासंस्कार इहार्हति ॥ ११ ॥
ओं ऱ्हीं पंचेंद्रियजयशीलतासंस्कार इहार्हति ॥ १२ ॥
अनादिसंवृत्तदुरंतसंज्ञाचतुष्टयस्यातिविनिग्रहस्य ॥
दशप्रभेदोत्तमधर्मवृत्त्या संस्कार० ॥
ओं ऱ्हीं अर्यं चतुःसंज्ञानिग्रहशीलनासंस्कार इहार्हति ॥ १३ ॥
ओं ऱ्हीं अर्यं दशधर्मधारणसंस्कार इहार्हति स्फुरतु स्वाहा ॥ १४ ॥
अष्टादशाश्लिष्टसहस्रमानशीलावलेर्लक्षचतुष्कभाजाम् ॥
अशीतिलक्षामितसद्गुणानां संस्कार एषोत्र चकास्तु बिंबे ॥
ओं ऱ्हीं अर्यं अष्टादशशीलसहस्रसंस्कार इहार्हति ॥ १५ ॥

---

स्कार जिनबिंबावर करावेत.

११–१२ ' प्राणेंद्रियेति ' हा श्लोक म्हणून सहा प्राणेंद्रियासंयमाचा व पांच इंद्रियांचा पराभव करणे असे दोन संस्कार जिनबिंबावर करावे.

१३–१४ ' अनादि ' हा श्लोक म्हणून आहारसंज्ञा, भयसंज्ञा, परिग्रहसंज्ञा व मैथुनसंज्ञा यांचा निग्रह करणे व दशधर्म धारण करणे हे दोन संस्कार करावेत.

१५–१६ ' अष्टादशेति ' हा श्लोक म्हणून अठरा हजार शील व ८४ लाख उत्तरगुण याचा संस्कार श्रीजिन-

ओं ऱ्हीं अयं चतुरशीतिलक्षगुणसंस्कार इहार्हति ॥ १६ ॥

ध्यानस्य धर्म्यस्य मतोऽप्रमत्तवृत्तस्य नैकांततया युतस्य ॥
श्रुतोपयोगस्य दृढस्य बाढं संस्कार० ॥

ओं ऱ्हीं अयं विशिष्टधर्म्यध्यानसंस्कार इहार्हति० ॥ १७ ॥
ओं ऱ्हीं अयं एकांताप्रमत्तचारित्रसंस्कार इहार्हति ॥ १८ ॥
ओं ऱ्हीं अयं अतिदृढश्रुतोपयोगसंस्कार इहार्हति ॥ १९ ॥

अथास्खलत्सत्परिणामजालमसुल्कमच्छ्रेण्यधिरोहणस्य ॥
शुद्धेस्तथानंतगुणात्मिकाया: संस्कार० ॥

ओं ऱ्हीं अयं अस्खलितपरिणामश्रेणिसमधिरोहणसंस्कार इहार्हति ॥ २० ॥
ओं ऱ्हीं अयं अनंतगुणशुद्धिसंस्कार ॥ २१ ॥

अथाप्रवृत्तादिकृते: पृथक्त्ववितर्कवीचारमहासमाधे: ॥
अपूर्वसम्यक्करणस्य तस्य संस्कार० ॥

---

बिंबावर करावा.

१७–१९ 'ध्यानस्येति' हा श्लोक ह्मणून विशिष्ट धर्म्यध्यानाचा, एकांताप्रमत्तचारित्राचा व अतिशय दृढ अशा ज्ञानोपयोगाचा असे तीन संस्कार जिनबिंबावर करावेत.

२०–२१ 'अथेति' हा श्लोक ह्मणून न ढळणाऱ्या अशा परिणामांनी क्षपकश्रेणीवर आरोहण करणें हा संस्कार व अनंतगुणित परिणामशुद्धि होणें हा असे दोन संस्कार जिनबिंबावर करावे.

ओं ह्रीं अयं अथाप्रवृत्तकरणसंस्कार इहार्हति ॥ २२ ॥
ओं ह्रीं अयं पृथक्त्ववितर्कवीचारध्यानसंस्कार इहार्हति ॥ २३ ॥
ओं ह्रीं अपूर्वकरणसंस्कार इहार्हति ॥ २४ ॥

ततोऽनिवृत्त्याधिकृतेश्च तस्याः कषायकाणामथ बादराणां ॥
निःसारिताकिट्टिकृतेश्च तस्याः संस्कार० ॥

ओं ह्रीं अयं अनिवृत्तिकरणसंस्कार इहार्हति ॥ २५ ॥
ओं ह्रीं अयं बादरकषायकिट्टिकारणसंस्कार इहार्हति ॥ २६ ॥

ततः परं सूक्ष्मकषायकिट्टिकृतेश्च तेषामथ बादराणा ॥
तत्किट्टिनिर्लेपनसंविधेश्च संस्कार० ॥

ओं ह्रीं अयं सूक्ष्मकषायकिट्टिकारणसंस्कार इहार्हति ॥ २७ ॥
ओं ह्रीं अयं बादरकषायकिट्टिकानिर्लेपनसंस्कार इहार्हति ॥ २८ ॥

---

२२–२४ 'अथाप्रवृत्तेति' हा श्लोक ह्मणून अथाप्रवृत्तकरण संस्कार, पृथक्त्ववितर्क वीचार ध्यानसंस्कार व अपूर्वकरणसंस्कार करावे

२५–२६ 'तत इति' हा श्लोक ह्मणून अनिवृत्तिकरण नांवाचा संस्कार व मोठ्या कषायांचें सूक्ष्मत्व करीत जाणें हा संस्कार असे दोन संस्कार जिनबिंबावर करावेत.

२७–२८ 'ततः परमिति' हा श्लोक ह्मणून सूक्ष्मकषायाकिट्टिकारण हा व बादरकषाय किट्टिकानिर्लेपन असे दोन संस्कार श्री जिनबिंबावर करावेत.

ततः क्रमात्सूक्ष्मकषायाकिट्टिनिर्लेपनं सूक्ष्मकषायवृत्तम् ॥
इत्येतयोः क्षीणकषायतायाः संस्कार० ॥

ओं ऱ्हीं अयं सूक्ष्मकषायाकिट्टिकानिर्लेपनसंस्कार इहार्हति ॥ २९ ॥
ओं ऱ्हीं अयं सूक्ष्मकषायचारित्रसंस्कार इहार्हेति ॥ ३० ॥
ओं ऱ्हीं अयं क्षीणकषायसंस्कार इहार्हति ॥ ३१ ॥

क्रमाद्यथाख्यातचरित्रमैक्यश्रुताद्यवीचारकशुक्लयोगः ॥
निःशेषघातिक्षय इत्यमीषां संस्कार० ॥

ओं ऱ्हीं अयं यथाख्यातचारित्रसंस्कार इहार्हति ॥ ३२ ॥
ओं ऱ्हीं अयं एकत्वावितर्कवीचारध्यानसंस्कार इहार्हति ॥ ३३ ॥
ओं ऱ्हीं अयं घातिकर्मनिर्मूलनसंस्कार इहार्हेति ॥ ३४ ॥

श्रीकेवलज्ञानदृगुद्भवस्य तीर्थप्रवृत्याख्याविधेः समाधेः ॥
सूक्ष्माक्रियाद्यप्रतिपातिनश्च संस्कार एषोत्र चकास्तु बिंबे ॥

---

२९–३१ ‘ ततः क्रमादिति ’ हा श्लोक ह्मणून सूक्ष्मकषायनिर्लेपन, सूक्ष्मकषायचारित्र व क्षीणकषायचारित्र हे संस्कार जिनबिंबावर करावेत.

३२–३४ ‘ क्रमादिति ’ हा श्लोक ह्मणून यथाख्यात चारित्र, एकत्ववितर्क, घातिकर्मविनाश हे तीन संस्कार श्रीजिनबिंबाचें ठिकाणीं करावेत.

ओं ऱ्हीं अयं केवलज्ञानदर्शनोद्भवसंस्कार इहार्हति ॥ ३५ ॥
ओं ऱ्हीं अयं धर्मतीर्थप्रवर्तनसंस्कार इहार्हति ॥ ३६ ॥
ओं ऱ्हीं अय सूक्ष्मक्रियाप्रतिपातिध्यानसंस्कार इहार्हति ॥ ३७ ॥

शैलेश्यनुख्यातकृतेः प्रकर्षकृत्संवरस्यापि च योगकिट्टेः ॥
कृतेश्च निर्लेपनसद्विधेश्च संस्कार० ॥

ओं ऱ्हीं अयं शैलेशीकरणसंस्कार इहार्हति ॥ ३८ ॥
ओं ऱ्हीं अयं परमसंवरसंस्कार इहार्हति ॥ ३९ ॥
ओं ऱ्हीं अयं योगाकिट्टिकाकरणसंस्कार इहार्हति ॥ ४० ॥
ओं ऱ्हीं अयं योगकिट्टिकानिर्लेपनसंस्कार इहार्हति ॥ ४१ ॥

ततः समुच्छिन्नमुखक्रियानिवृत्याख्ययोगस्य सुनिर्जरायाः ॥
निःशेषकर्मप्रकरक्षयस्य संस्कार ॥

ओं ऱ्हीं अयं समुच्छिन्नक्रियानिवृत्तिध्यानसंस्कार इहार्हति ॥ ४२ ॥

---

३५–३७ 'श्रीकेवलेति' हा श्लोक म्हणून केवलज्ञानदर्शनोत्पत्ति, धर्मतीर्थप्रवृत्ति, व सूक्ष्मक्रियाप्रतिपातिध्यान असे तीन संस्कार जिनबिंबावर करावेत.

३८–४१ 'शैलेश्येति' हा श्लोक म्हणून सर्व शीलांची प्राप्ति, उत्कृष्टसंवराची प्राप्ति, योगकिट्टिकाकरण व योगकिट्टिकानिर्लेपन या चार संस्कारांची श्रीजिनबिंबावर स्थापना करावी

४२—४४ 'ततः इति' हा श्लोक म्हणून समुच्छिन्नक्रिया ध्यानाचा, परमनिर्जरेचा, व संपूर्णकर्मविना-

ओं ऱ्हीं अयं परमनिर्जरासंस्कार इहार्हति ॥ ४३ ॥

ओं ऱ्हीं अयं सकलकर्मनिर्मूलनसंस्कार इहार्हति ॥ ४४ ॥

अनंतदुर्वारदुरंतदुःखसंसारपर्यायपरक्षयस्य

अनंतसिद्धत्वसुपर्ययाप्तेः संस्कार ॥

ओं ऱ्हीं अयं अनादिसंसारपर्यायाविनाशसंस्कार इहार्हति ॥ ४५ ॥

ओं ऱ्हीं अयं अनंतसिद्धपर्यायोपलब्धिसंस्कार इहार्हति ॥ ४६ ॥

अदेहसम्यक्सहजाद्वितीयज्ञानोपयोगैश्वर्योपलब्धेः ॥

तद्वत्सुदृष्टैश्वर्यस्य साक्षात् ॥ संस्कार ॥

ओं ऱ्हीं अयं अशररसहजज्ञानोपयोगैश्वर्यसंस्कार इहार्हति ॥ ४७ ॥

ओं ऱ्हीं अयं अशरीरसहजदर्शनोपयोगैश्वर्यसंस्कार इहार्हति ॥ ४८ ॥

सुदृष्टिलाभादपवर्गलक्ष्मीपर्यंततत्तत्पदसंभवंतीम् ॥

---

शाचा असे तीन संस्कार जिनबिंबावर करावेत

४५—४६ ‘ अनंतेति ’ हा श्लोक ह्मणून अनादिकालच्या संसारपर्यायाचा नाश झाला अशा अभिप्रायाचा व अनंत सिद्धपर्याय प्राप्त झाला याचा अशा दोन संस्काराचे प्रतिमेवर आरोपण करावे.

४७—४८ ‘ अदेहेति ’ हा श्लोक ह्मणून शरीररहित असे ज्ञान व दर्शन या उपयोगाची प्राप्ति झाली याचे सूचक असे दोन संस्कार जिनबिंबावर करावेत.

‘ सुदृष्टिमालेति ’ हा श्लोक ह्मणून ह्या अठ्ठेचाळीस संस्कारमालाची मलाही प्राप्ति व्हावी अशी जिनेश्वराला

संस्कारमालां त्वमितोऽष्टचत्वारिंशन्मितां देव विदेहि नरताम् ॥
इष्टप्रार्थनाय प्रतिमाग्रे पुष्पांजलिं क्षिपेत् ॥
इत्यष्टचत्वारिंशत्संस्कारमालारोपणविधानम् ॥

——:०:——

अथ मंत्रन्यासविधानम् ॥

सालोकलोकत्रितयैकनित्यज्योतिः परब्रह्ममहोदयस्य ॥
साक्षादभिव्यंजनमेव शब्दब्रह्मेति मंत्रानिह तान्न्यसामि ॥
मंत्रन्यासप्रतिज्ञापनाय प्रतिमोपरि पुष्पांजलि क्षिपेत् ॥
अआ इति ¬ वर्णौ द्वौ भाले बिंबे न्यसाम्यह ॥
ध्यात्वा शशांकविशदावों मायार्हं रमादिकौ ॥
ओं ऱ्हीं अर्हं श्रीललाटे ॥ २ ॥ दक्षिणतः प्रभृति करेण न्यसेत् ॥

---

प्रार्थना करावी व पुष्पांजलि क्षेपण करावें.

मंत्रन्यास विधि ॥

'सालोकेति' अलोकासहित त्रैलोक्याम प्रगट करणाऱ्या नित्यज्ञानरूपी ज्योतिला धारण करणाऱ्या परमात्म्याचें वैभव स्पष्ट प्रगट करणारें शब्दब्रह्म आहे. यास्तव त्या शब्दब्रह्माच्या मंत्राचा जिनप्रतिमेच्या अवयवावर मी न्यास करितो. अआ हे दोन वर्ण ओं ऱ्हीं अर्हं या मंत्रासहित श्री जिनेश्वराच्या कपाळावर लिहितो. हे मंत्र हातानें उजवीकडे लिहीत जावें.

इई च दक्षिणे वामे नेत्रे बिंबे न्यसाम्यहं ॥
ध्यात्वा० ॥ ओं ऱ्हीं हं श्रीं इई दक्षिणेतरनेत्रयोः ॥ ३ ॥ एवं सर्वत्र ॥
उऊ च दक्षिणे वामे कर्णे बिंबे न्यसाम्यहं ॥
ध्यात्वा० ॥ ओं ऱ्हीं० उउ कर्णयोः ॥ ४ ॥
ऋ ॠ च दक्षिणे वामे बिंबे घ्राणे न्यासाम्यहं ॥
ध्यात्वा शशांकविशदा वों मायार्हं रमादिकौ
ओं ऱ्हीं हं श्रीं ऋ ॠ च नासापुटयोः ॥ ५ ॥
ऌ ॡ च दक्षिणे वामे गंडदेशे न्यसाम्यहं ॥
ध्यात्वा० ॥ ओं ऱ्हीं ऌॡ गंडयोः ॥ ६ ॥
ए ऐ इति द्वावूर्ध्वाधो दंतपंक्त्योर्न्यसाम्यहं ॥
ध्यात्वा० ॥ ओं ऱ्हीं ए ऐ ऊर्ध्वाधोदंतपंक्त्योः ॥ ७ ॥

३ 'इई चेति' हा श्लोक ह्मणून प्रतिमेच्या उजव्या व डाव्या नेत्रामध्यें ओं ऱ्हीं हं श्रीं इई असा मंत्र लिहावा याच प्रमाणें प्रतिमेच्या अवयवावर ओं ऱ्हीं हं श्रीं ह्रीं अक्षरें प्रथम लिहून मग त्यांच्या पुढचे मंत्र लिहिण्याचा क्रम करावा.

४ 'उऊ चेति' हा श्लोक ह्मणून उजव्या व डाव्या कानांत ओं ऱ्हीं उऊ हा मंत्र लिहावा.

५ 'ऋॠ चे' हा श्लोक ह्मणून उजव्या व डाव्या नाकपुड्यावर ओं ऱ्हीं हं श्रीं ऋॠ हा मंत्र लिहावा.

६ 'ऌॡ च' हा श्लोक ह्मणून उजव्या व डाव्या गालावर ओं ऱ्हीं ऌॡ हा मंत्र लिहावा.

७ 'एऐ इति' हा श्लोक ह्मणून खालच्या व वरच्या दंतपंक्तीवर ओं ऱ्हीं ए ऐ हा मंत्र लि०

ओ औ च दक्षिणे वामे स्कंधे बिंबे न्यसाम्यहं ॥
ध्यात्वा० ॥ ओं ऱ्हीं० ओ औ स्कंधयोः ॥ ८ ॥
अं अश्च मस्तके बिंबे जिह्वाग्रे विन्यसाम्यहम् ॥
ध्यात्वा० ॥ ओं ऱ्हीं अं मस्तके अः जिह्वाग्रे ॥ ९ ॥
कचवर्गौ दक्षिणेथ वामे बाहौ न्यसाम्यहं ॥
ध्यात्वा० ॥ ओं ऱ्हीं कखगघङ चछजझञ वामभुजे ॥ १० ॥
टतवर्गौ दक्षिणेऽथ वामे कुक्षौ न्यसाम्यहं ॥
ध्यात्वा० ॥ ओं ऱ्हीं टठडढण तथदधन क्रमेण दक्षिणवामकुक्ष्योः ॥ ११ ॥
पफौ च दक्षिणे वामेप्यूरौ बिंबे न्यसाम्यहं ॥
ध्यात्वा० ॥ ओं ऱ्हीं० प दक्षिणोरौ फ वामोरौ ॥ १२ ॥

---

८ 'ओ औ इति' हा श्लोक म्हणून उजव्या व डाव्या खांद्यावर ओं ऱ्हीं ओ औ हा मंत्र लि०

९ 'अं अश्चेति' हा श्लोक म्हणून प्रतिमेच्या मस्तकावर व जीभीच्या अग्रभागी ओं ऱ्हीं अं अः हा मंत्र लि०

१० 'कचवर्गाविति' हा श्लोक म्हणून उजव्या व डाव्या भुजावर क्रमानें ओं ऱ्हीं कखगघङ, ओं ऱ्हीं चछजझञ असे मंत्र लिहावेत.

११ 'टतवर्गौ इति' हा श्लोक म्हणून उजव्या व डाव्या पोटाच्या भागावर ओं ऱ्हीं टठडढण, ओं ऱ्हीं तथदधन हे मंत्र लिहावेत.

१२ 'प फाविति' हा श्लोक म्हणून उजव्या व डाव्या मांडीवर क्रमानें ओं ऱ्हीं प व ओं ऱ्हीं फ ही अक्षरें लिहावींत.

बभौ च गुह्ये नाभौ च बिंबस्यास्य न्यस्याम्यहं ॥
ध्यात्वा ॥ ओं ऱ्हीं ब गुह्ये भ नाभिमंडले ॥ १३ ॥
मकारौ दक्षिणे वामे स्फिक्प्रदेशे न्यसाम्यहं ॥
ध्यात्वा ॥ ओं ऱ्हीं मस्फिचोः ॥ १४ ॥
यरौ कुक्षे क्रमादूर्ध्वरोमांचे च न्यसाम्यहम् ॥
ध्यात्वा ॥ ओं ऱ्हीं य शरीरस्थाने र ऊर्ध्वरोमांचे ॥ १५ ॥
लवौ पृष्ठे च कक्षादिसंधिदेशे न्यसाम्यहं ॥
ध्यात्वा ॥ ओं ऱ्हीं ल पृष्ठे व ग्रीवाकक्षादिसंधिषु ॥ १६ ॥
शकारो दक्षिणे वामे जानुनीह न्यसाम्यहं ॥
ध्यात्वा० ॥ ओं ऱ्हीं श जानुयुग्मे ॥ १७ ॥

---

१३ ‘ बभौ चेति ’ हा श्लोक ह्मणून ‘ ओं ऱ्हीं ब ’ हा मंत्र गुह्य भागी व ‘भ’ हा मंत्र नाभिमंडलांत लिहावा.

१४ ‘ मकाराविति ’ हा श्लोक ह्मणून ‘ ओं ऱ्हीं म ’ हा मंत्र दोन्हीं ढुंगणावर लिहावा.

१५ ‘ यरौ ’ हा श्लोक ह्मणून ‘ ओं ऱ्ही य ’ व ‘ ओं ऱ्ही र ’ हे मंत्र क्रमाने पोट व मस्तक वगैरे ठिकाणच्या केशामध्ये लिहावे.

१६ ‘ लवौ ’ हा श्लोक ह्मणून ‘ ओं ऱ्ही ल ’ व ‘ ओं ऱ्ही व ’ हे मंत्र क्रमानें पोट व गळा, कारव वगैरेच्या संधिभागामध्ये लिहावेत.

१७ ‘ शकारौ हा श्लोक ह्मणून ‘ ओं ऱ्ही श ’ हा मंत्र दोन्ही गुडघ्यावर लिहावा.

एवं चत्वारः प्रतीन्द्राः वेद्याश्चतुर्दिक्षु होमविधिं पूर्ववत्सर्वं विदध्युः ॥

अथ प्रतिष्ठाहोमकाल एव गंधयंत्राराधनमेकः प्रतींद्रः कुर्यात् ॥ तद्यथा —

मध्ये तत्तदनाहतं परिवृतं झं ठं स्वैः क्लींयुतम् ॥
क्ष्वीं क्ष्वीं हं स सुबीजकैर्बहिरता-वार्मंडलेनावृतम् ॥
श्रीखंडादिविलिप्तहेममयसत्पात्रे लिखित्वादरा- ।
द्दत्ताढ्यैः करवीररक्तकुसुमैराराधये मंत्रतः ॥ पुष्पांजलिः ॥ ७ ॥

ओं श्रीं ह्रीं र्हं श्रीं नमः । इत्यनेन मंत्रेण प्रतिष्ठाहोमकाल एव अष्टोत्तरशतवारं संजप्य निक्षिप्य तद्यंत्रगंधं सर्वगंधसंमिश्रं स्वर्णपात्राग्रे निक्षिप्य तद्गंधद्रव्यैर्वक्ष्यमाणमंत्रेण श्रीनयनोन्मीलनं

---

५ 'ओं नमोर्हते भगवते' हा पश्चिम कुंडात समिधा टाकण्याचा होममंत्र आहे.

६ 'ओं नमोर्हते भगवते वृषभेति' हा उत्तरकुंडांत समिधा टाकण्याचा मंत्र आहे या प्रमाणें वेदीच्या चारी दिशेला प्रतीन्द्रांनी पूर्वीप्रमाणे सर्व होमविधि करावा. तदनंतर प्रतिष्ठाहोमकालीच एका प्रतींद्रानें गंधयंत्राराधन करावें. तें याप्रमाणें:—

७ 'मध्ये इति' केशर वगैरेंनें लेपलेल्या सुवर्णपात्रामध्यें आदरानें हें गंधयंत्र लिहावें व कण्हेरीच्या तांबड्या पुष्पांनी मंत्र म्हणून त्याची आराधना करावी. हें गंधयंत्र त्या त्या तीर्थंकराच्या अनाहतानें युक्त असावें अनाहताच्या मध्यभागीं 'झं ठं' हीं अक्षरें लिहावीं, सभोंवती स्वर लिहावेत. व 'क्लीं' अक्षर लिहावें 'क्ष्वीं क्ष्वीं हं सः' हीं बीजाक्षरें या स्वराचे बाहेर लिहावीत व या सर्वांना जलमंडलानें वेढा घालावा.

'ॐ ह्रीं र्हं नमः' या मंत्रानें प्रतिष्ठाहोमकालीं १०८ वेळां जप करावा. व गंधयंत्रांतील सुगंध केशर वगैरे पदार्थांनीं पुढील मंत्र म्हणून चल व अचल या प्रतिमांना नयनोन्मीलनविधि व सर्वांगलेपनविधि एकदम

सर्वांगविलेपनं च चलाचलप्रतिमयोर्युगपदेव कुर्यात् ॥ इति गंधयंत्रमंत्राराधनाविधिः ॥

शुभप्रसूनैर्मणिभिर्विशुद्धैस्तथा समंत्रैरथवांगुलीभिः ॥
आराधयाम्यष्टशतं सुरेन्द्रैराराध्यपादं भगवज्जिनेंद्रम् ॥

ओं श्रीं ऱ्हीं र्हं श्रीं मम सन्निहितो भव भव वषट् नमः इत्यनेन मंत्रेण सितरक्तसुगंधपुष्पैरामुहूर्तं तत्पुष्पजपं स्वयमिंद्रः कुर्यात् ॥

अथ प्रतिष्ठातिलकविधानम् ॥

वितानमाल्यांबरपूर्णकुंभरंगावलीचारुचतुष्कमध्ये ॥
संस्थापयाम्यत्र शिला विशाला जिनप्रतिष्ठातिलकार्थपिष्ट्यै ॥
ओं ऱ्हीं र्हं क्ष्मं ठठ शिलास्थापन करोमि स्वाहा ॥ १ ॥
कोणोज्ज्वलद्दीपचतुष्कदीप्रां चतुष्कमध्यस्थाशिलां विशालाम् ॥

---

करावे. याप्रमाणे गंधयंत्राराधन विधि आहे.

'शुभप्रसूनैरिति' हा श्लोक ह्मणून व ॐ श्री ऱ्ही र्हं श्री मम सन्निहितो भव २ वषट् नमः या मंत्रानें पांढऱ्या व तांबड्या पुष्पांनी मुहूर्तपर्यंत इंद्रानें १०८ वेळा जप करावा. अशा रीतीने भगवंताची आराधना करावी.

प्रतिष्ठातिलकविधि.

१ 'वितानेति' हा श्लोक व मंत्र ह्मणून जिनेश्वराला प्रतिष्ठातिलक करण्यासाठी शिलास्थापन करावे. तिलक करण्याची द्रव्यें वाटण्यासाठी या शिलेचें स्थापन करावें लागते.

२ 'कोणेति' हा श्लोक ह्मणून शिला धुवावी अक्षतांनी चौक रचून तिच्या चारी कोनावर चार दीप ठेवा

जांबूनदोच्चैः कलशप्रपूर्णैः प्रक्षालयाम्युत्तमतीर्थवार्भिः ॥

शिलाप्रक्षालनम् ॥ २ ॥

स्वच्छैस्तीर्थ० रेनां शिलामर्चये ॥ शिलार्चनम् ॥

प्रीतिं प्रियंगूरजनीत्यथैलाककोलजात्यादिफलं सुगंधि ॥

सद्यः फलौघं दधि मंगलार्थं सिद्धार्थसार्थोऽभिमतार्थसिद्धिम् ॥ ३ ॥

जात्यादिपुष्प मनसः प्रसादं वृद्धिः समृद्धिं स्वममृद्धिवृद्धिः ॥

ददाति सीतीभवनं तुषागे दूर्वा चिरायुः सुयशोऽक्षतौघः ॥ ४ ॥

श्रीखंडकालागरुजातिपत्रसद्ग्रंथिपर्णोत्तमपद्मकादिः ॥

सौरभ्यमर्थः सुरभिः सुखाय भूयासुरेते तिलकोचितार्थाः ॥

इदमुक्त्वा शिलास्थापिततिलकार्थपुंजे पुष्पाक्षत क्षिपेत् ॥ ५ ॥

स्वभर्तृवस्त्रांचलबंधितान्कौसुंभवस्त्रान्वितयष्टृपत्न्या ॥

---

चेत. व कलशातील तीर्थजलाने शिला स्वच्छ धुवावी 'स्वच्छैस्तीर्थैरिति' हा श्लोक म्हणून शिलेची पूजा करावी.

३-५ 'सद्यः फलौघेति' व 'श्रीखंडेति' हे दोन श्लोक म्हणून तिलक करण्याच्या नंतर पुष्पाक्षता क्षेपण कराव्यात. वाघाटे हे आनंद देतात हळद, वेलदोडे, ककोळ, जायफळ हे फलदायक आहेत. दही मंगलाकरिता मानलें आहे. पांढऱ्या मोहऱ्या इच्छितकार्यसिद्धि करितात. जाईची वगैरे फुलें मनाला प्रसन्न करितात. कापूर शांतता उत्पन्न करितो. दूर्वा दीर्घायुष्य करितात आणि अक्षता कीर्ति वाढवितात. चंदन, कृष्णागुरु, जायपत्री, गठाना, पद्मकाष्ठ वगैरे पदार्थांचा तिलक करितात.

६ 'स्वभर्तृ इति' हा श्लोक म्हणून इंद्राच्या वस्त्राची गाठ इंद्राणीच्या वस्त्राशी बांधावी. व तिलकाची द्रव्यें

शोणागरागाभरणास्रजैतान् सपेषयामस्तिलकोन्नितार्थान् ॥

तिलकार्थपेषणनियुक्तयष्टमिथुने कुंकुमरंजिताक्षतं क्षिपेत ॥ ६ ॥

स्वाहातकोमादिकमंगलादिमत्रेण जप्त्वा तिलकार्थकल्कम् ॥

सौवर्णपात्रे विनिधाय तेन लग्नोदयेऽस्मिंस्तिलक विधास्ये ॥ ७ ॥

ओं चत्तारि मंगल स्वाहेति मंत्रेणैकविंशतिवारान् तिलकार्थकल्कम-

भिमंत्रयेत ॥ तिलकद्रव्यसज्जीकरणम् ॥

स्त्रीभ्यः पुरा कंकणबंधनाभ्यो नियोजिताभ्यः कुलकामिनीभ्यः ॥

धानागुडाढ्यलवणानि पृथग्दधेऽहं जिनप्रतिष्ठातिलकोत्सवेऽस्मिन् ॥

गुडादिव्यायनकदानम् ॥ ८ ॥

आहूता भवनामरैरनुगता य सर्वदेवास्तथा ॥

तस्थौ यस्त्रिजगत्सभांतरमहापीठाग्रसिंहासने ॥

यं हृद्यं हृदि सान्निधाप्य सततं ध्यायंति योगीश्वराः ॥

---

त्या उभयताकडून वाटून द्यावीत. उभयतांवर पुष्पाक्षता टाकाव्यात.

७ ‘स्वाहांतकेति’ हा श्लोक ह्मणून ‘ॐ चत्तारि मंगलं स्वाहेति’ हा मंत्र एकवीस वेळा ह्मणावा व तें तिलकगंध आमंत्रित करावें.

८ ‘धानागुडेति’ हा श्लोक ह्मणून ज्यांच्या हातात कंकण बांधलें आहे अशा स्त्रियांना लाह्या, गूळ व मीठ हे पदार्थ द्यावेत.

तं देवं जिनमर्चितं कृतधियामावाहनाद्यैर्भजे ॥

अत्र स्थापनानिक्षेपनयमाश्रित्याव्हानादिमंत्राः कथ्यंते ॥

ओं ऱ्हां ऱ्हीं ऱ्हूं ऱ्हौं ऱ्हः असि आ उसा एहि २ संवौषट् आव्हानम् ॥

ओं ऱ्हां ऱ्हीं ममात्र सन्निहितो भव २ वषट् सन्निधापनम् ॥ ९ ॥

इत्थं पूर्वविधिं विधाय विधिनाव्हानादिकं स्थापना—

न्यासात्कुंभनियोगतः प्रतिकृतौ कृत्वा जिनेंद्रं स्मरन् ॥

लग्नादौ सति रेचकेण विधिवन्नाभौ प्रियंग्वादिना ॥

तन्मत्रं निदधामि वाद्यनिनदे दिक्षु प्रसर्पत्यलम् ॥

तिलकविधिप्रतिज्ञापनाय प्रतिमोपरि पुष्पांजलिं क्षिपेत् ॥ १० ॥

तेजस्त्रिमूर्तीश्वरदेशकानुजनिप्रियास्नातकबीजपूर्वम् ॥

सास्यादिको सार्हतनामनाममंत्रेण बिंबे तिलकं न्यसामि ॥

मंत्रोद्धारः—ओं ऱ्हीं श्रीं र्हं अ सि आ उ सार्हता वृषभनाथस्य नाभौ तिलकं न्यसामि

---

९ 'आहूतेति' हा श्लोक ह्मणून स्थापना निक्षेपाच्या आश्रयानें आव्हानादि मंत्र ह्मणावेत.

१० 'इत्थमिति' हा श्लोक ह्मणून आव्हानादि पूर्वोक्त विधि करावा व जिनेश्वराची प्रतिमेमध्यें स्थापना करावी व वाद्ये वाजत असतांना उत्तम मुहूर्तावर प्रतिमेच्या बेंबीमध्यें मी पुढील मंत्र लिहितो अशी प्रतिज्ञा करावी. व जिनमूर्तीवर पुष्पांजलि क्षेपण करावी.

११ 'तेज इति' हा श्लोक ह्मणून व 'ॐ ऱ्हीं श्रीं र्हं वगैरे मंत्र ह्मणून वृषभनाथ जिनेश्वराच्या नाभिमध्यें

जगदेकरंजनार्थं वषट् अनेन तिलकन्यासं विदध्यात् ॥ ११ ॥ इति तिलकविधानम् ॥

अथाधिवासनविधानम् ।

जिनमतामिव सूक्ष्मं यत्सुखस्पर्शदक्षं ॥
क्षपितविविधबाधं साध्वलंकारमुख्यम् ॥
शुचितरमपदोषं सद्गुणं तद्दधेऽहं ॥
जिनपतिवदनाग्रे विस्तृतं कांडवस्त्रं ॥

ओं श्रीं ऱ्हीं हैं श्रीं णमो अरहंताणं झौं नमः स्वाहा ॥ मुखवस्त्रमंत्रः । मुखवस्त्रमेवं कुर्यात्। वेदिकायामंतर्गृहे च ॥

यवमालारोपणमंत्रः ।

मदनफललसन्त्या मालयैषां यवानां ॥
सुखफलगुणमालामार्हतीं सूचयन्त्या ॥

---

सर्व जगाचे रंजन करण्याकरिता तिलक करितो असे ह्मणून तिलकन्यास करितो. याप्रमाणें तिलकविधान संपलें.

अधिवासनविधि.

'जिनमतमिवेति' हा श्लोक ह्मणून जिनमूर्तीच्या वदनापुढें विस्तृत असें वस्त्र धरावें. हें वस्त्र जिनमताप्रमाणें सूक्ष्म आहे व जिनमताप्रमाणे सुख देण्यामध्यें दक्ष आहे. हें जिनमताप्रमाणें नाना प्रकारच्या शीतोष्णादि पीडा दूर करणारें आहे व हें उत्तम अलंकाराप्रमाणें आहे. हें जिनमताप्रमाणें निर्मल, निर्दोष, उत्तम गुणांनी युक्त व उत्तम दोऱ्यानें युक्त असें आहे, असें हें वस्त्र जिनबिंबाच्या वदनापुढें मी धारण करितो.

त्रिगलदखिलदोषं प्रार्चयामो जिनेंद्रं ॥
जनयतु जनतानां क्षेमवृद्धिं सुभिक्षम् ॥
यवमालारोपणम् ॥ २ ॥
जिनेश्वरश्रीचरणांबुजाग्रे सप्तोद्धधान्यानि समुच्चितानि ॥
अनंतधर्मेष्वपि संभवन्तीं अर्हन्तु दिव्यध्वनिसप्तभंगीम् ॥
मुखवस्त्रप्रदानपूर्वकं यवमालामारोप्य जिनपदाग्रतः सप्तधान्यान्युपाहरतु ॥ ३ ॥
उन्मादनं मोहनतापने च यः शोषणं मारणमुच्छिनत्ति ॥
स्मारानिपूनस्य सुयोगकल्पान् क्षिपामि कांडान्मुखवस्त्रपार्श्वे ॥
ओं ऱ्हीं काडस्थापनम् ॥ ४ ॥ अगाष्टकम् ॥

---

२ यवमालारोपण विधि करतांना प्रथम 'मदनेति' हा श्लोक म्हणावा. व प्रतिमेच्या कंठामध्ये यवमाला (जवाची माळा) घालावी. या माळेंत एक गेळफळ असावें. सुखरूपी फलाची व विपुल गुणांची प्राप्ति भगवंताला झाली याचे हे सूचक आहे. हा विधि करून नंतर जिनेश्वराच्या चरणाजवळ—

३ 'जिनेति' हा श्लोक म्हणून सप्त धान्यें ठेवावीत. ही ठेवण्याचा उद्देश वस्तूमध्यें अनंत धर्म आहेत व त्या प्रत्येक धर्मामध्यें स्यादस्ति, स्यान्नास्ति वगैरे सात प्रकार संभवतात व जिनेश्वराच्या दिव्यध्वनीमध्येंही हे प्रकार संभवतात हें दाखविणें हा होय

४ 'उन्मादनेति' उन्मादन, मोहन, तापन, शोषण, व मारण असे मदनाचे पांच बाण आहेत. या पांच बाणाचा नाश भगवंतानी केला आहे म्हणून पांच बाणाची मुखवस्त्राच्या जवळ स्थापना करावी.

सुगंधिशीतलैः स्वच्छैः माधुभिर्विमलैर्जलैः ॥
अनंतज्ञानदृग्वीर्यसुखरूपं जिनं यजे ॥ १ ॥
ओं ऱ्हीं श्रीं नमः परमेष्ठिभ्यः स्वाहा ॥ जलम् ॥
कंकोलकैलागरुसात्प्रियंगूलवंगकर्पूरकरांजितेन ॥
श्रीखंडपंकेन निरस्तपंकं जिनक्रमाब्जं परिलेपयामि ॥
ओं नमोर्हते सर्वशरीरावस्थिताय पृथु २ गंधं गृहाण २ स्वाहा ॥ २ ॥ गंधं ॥
जिनेंद्रपादौ नखचन्द्रबिंबे सेवार्थमभ्यागततारकाणां ॥
पुंजायमानैर्विशदाक्षतानां पुंजैर्जिनांघ्रिं परिपूजयामि ॥ ३ ॥
ओं नमोर्हते सर्वशरीरावस्थिताय पृथु २ अक्षतान् गृहाण २ ॥ अक्षतान् ॥
यत्सौरभास्थास्तिमितालिमाला नीलोत्पलानामिव भाति माला ॥
सा पंचकल्याणविमर्शपंचसरात्ममालास्तु जिनेश्वरांघ्रौ ॥ ४ ॥

---

१ ' सुगंधी ' हा श्लोक समंत्र ह्मणून अनंत ज्ञान, दर्शन, शक्ति व सुख यांना धारण करणाऱ्या जिनाला मी जलाने पूजितो.

२ ' कर्कोलेति ' हा श्लोक ह्मणून व त्याचा मंत्र ह्मणून गंधानें जिनचरणाची पूजा करावी.

३ ' जिनेंद्रेति ' हा श्लोक ह्मणून व मंत्र ह्मणून अक्षता जिनचरणीं अर्पण कराव्यात.

४ ' यदिति ' हा श्लोक ह्मणून व त्याचा मंत्र ह्मणून पंचकल्याणाचें सूचन करण्याकरितां मंदार, मोगरी, कमल वगैरे फुलें जिनेश्वरचरणीं अर्पण करावीत.

ओं नमोऽर्हते यययं सर्वतो मेदिनीपुष्पवरपुष्पाणि गृहाण २ स्वाहा ॥ पुष्पं ॥ इति पंचसरमालारोपणम् ॥

क्षैरेयं बहुशः राज्यकलितं पक्वान्नमुच्चावचं ॥
भक्ष्यानिंदुवलक्षतानपि खराज्ञानोपदर्शं पयः ॥
पूर्वं पेयमपूर्वपाकसुरस सद्दधशाल्योदनं ॥
सान्नाय्य निजानित्यसारसुखसंतृप्ताय तेऽर्हन्ददे ॥ ५ ॥

ओं नमोऽर्हते सह भूतायानतसुखसंतृप्तायाग्रे चरुं विस्तारयामि स्वाहा ॥ चरुं ॥

स्वान्यप्रकाशनगुणाल्पतरोऽस्मदीयो ॥
जैनस्त्रिकालविपयोयमितीव हर्षात् ॥
ये कंपयंति बहुशः स्वशिरांसिदीपा ॥
स्तैर्दीपिताखिलजगज्जिनमर्चयामि ॥ ६ ॥

ओं नमोऽर्हते सर्वतः प्रज्ज्वल २ अमिततेजसे नमः दीपं गृहाण २ स्वाहा ॥ दीपं ॥

५ 'क्षैरेयमिति' हा श्लोक व त्याचा मंत्र म्हणून साखर व तूप मिश्रित अशी दूधखीर व इतर पुष्कळ भात वगैरे पदार्थ नित्य व उत्कृष्ट सुखानें तृप्त झालेल्या जिनाला अर्पण करितो.

६ 'स्वान्येति' हा श्लोक व त्याचा मंत्र म्हणून दीपानें अरहंताची पूजा करावी. माझ्या ठिकाणी स्वपर प्रकाशक गुण थोडा आहे व श्रीजिनेशाच्या ठिकाणी त्रैलोक्याला प्रकाशित करणारा गुण आहे म्हणून हर्षानें जे आपलें मस्तक कांपवितात अशा दिव्यांनीं मी जिनाची पूजा करितो.

गंधार्थयोगबहुसौरभधूपधूमलेखाशतातिसुरभीकृतसर्वकाष्ठान् ॥

अष्टौ त्रिविष्टपपतेः परितोष्टदिक्षु निष्टसहेममयधूपघटान्न्यसामि ॥

ओं नमोर्हते सर्वतो दह २ तेजोधिपतये सहभूताय धूपं गृहाण २ स्वाहा ॥ धूपं ॥ अष्टसु दिक्षु धूपघटाष्टकनिवेशनम् ॥ ७ ॥

जंबीरजंबूकदलीकपित्थफलोत्तमाम्रादिफलोत्तमौघैः ॥

समर्चये नित्यफलं जिनेंद्रं नित्यामृतानंदफलोपलब्ध्यै ॥ ८ ॥

ओं नमोर्हते सहभुताय फलानि गृहाण २ स्वाहा ॥

स्वध्यानतीव्रानलकांदिशीककामेन निर्मुक्तमिवेक्षुचापम् ॥

पुंड्रेक्षुदंडप्रकरं क्षिपामि पीठोपकंठे तव देवदेव ॥ ९ ॥

इक्षुस्थापनम् ॥

---

७ ''गंधार्थेति' हा श्लोक समंत्र ह्मणून श्रीजिनचरणीं धूप अर्पण करावा. अनेक सुगंधि पदार्थांच्या मिश्रणामुळें ज्या धूपाचा धूर सर्व दिशांना सुगंधित करितो अशा धूपाचें घडे जिनांच्या आठी दिशेस मी ठेवितो.

८ 'जबीरेति' हा श्लोक व मंत्र ह्मणून निंबू, जांभूळ, केळीं. कंवठ आंबे वगैरे फळांनीं मी श्रीजिनाची मोक्षांतील आनंदरुपी फलाची प्राप्ति व्हावी ह्मणून पूजा करितो.

९ 'स्वध्यानेति' हा श्लोक समंत्र ह्मणून जिनेश्वराच्या सिंहासनाजवळ ऊस स्थापन करावेत. हे ऊस स्थापन करण्याचें कारण हें आहे. श्रीजिनेश्वराच्या ध्यानरूपी तीव्र अग्नीपासून मदनाला भीति वाटल्यामुळें तो पळू लागला त्यावेळीं त्याचे हातातलें ऊसरूपी धनुष्य गळून पडलेलें आहे तेंच हें आहे अशी शंका उत्पन्न करणारे हे ऊस जिनामी आपल्या सिंहासनाजवळ अर्पण करितो.

प्रक्षीणे स्वमले समुद्भवति यः स्वार्थप्रकाशोल्पकः ॥
गो[illegible]सासु त्रि [illegible]श्चिकालविषयः साक्षान्महानर्हति ॥
मत्वैवं मणिभिर्जितैः प्राहितसद्वर्णोत्करप्राभृता— ॥
शंकापादकवर्णपूरमर्हत्पादाग्रतः स्थापये ॥

इति वर्णपूरस्थापनम् ॥ १० ॥

मुद्गादिरूढद्विदलप्ररूढैर्विरूढकौघैः सुकृतांकुराभैः ॥
प्रौढावबोधस्य तव प्रगाढदृष्टेर्जिन श्रीचरणौ यजामि ॥

विरुढक[illegible]थापनम् ॥ ११ ॥

त्रैलोक्यसाम्राज्यसमग्रलक्ष्मीविवाहवेदीं भवतो जिनेंद्र ॥
यवादिधान्यप्रभवाकुरौघैर्यवारकाख्यैः समलंक[illegible]मि ॥

यवारक[illegible]थापनम् ॥ १२ ॥

---

१० 'प्रक्षीणे इति' हा श्लोक म्हणून वर्णपू[illegible]नी अर्थात् निरनिराळ्या [illegible] प्रभूपुढें स्थापना करावीं. मळ नाहींसा झाल्यानें [illegible] जिनेश्वराच्या ठिकाणचे रागादि दोष नाश पावल्यामुळें त्यांच्या ठिकाणीं त्रैलोक्यप्रकाशक असा प्रकाश अर्थात् पूर्णज्ञान प्राप्त झालें आहे. तेव्हां जिनेश्वराने आम्हाला जिंकिलें म्हणून त्यानी वर्णपूर पाठविला आहे काय?

११ 'मुद्गादि' हा श्लोक म्हणून मूग, उडीद, हरभरे यांचे अंकुर ज्याना विरूढक म्हणतात ते जिनाच्या चरणीं जणु पुण्याचे अंकुर आहेत काय असें मानून त्यांची स्थापना करावी.

१२ 'त्रैलोक्येति' हा श्लोक म्हणून यवारकांची स्थापना वेदीच्या पुढें करावी. श्रीजिनेश्वराचें त्रैलोक्यसाम्राज्य-

फलकिसलयपुष्पाण्यामपिष्टैः कृतानि ॥
स्फुटरुचिबलिवर्त्याख्यानि नानाविधानि ॥
त्रिदिवभवनजश्रीप्रेषितप्राभृताभा—॥
न्यमरविजयहेतून्यर्हतोऽग्रे न्यसामि ॥

इति बलिवर्तिकास्थापनम् ॥ १३ ॥

जिनेश्वरश्रीचरणांबुजाग्रे सर्वाणि धान्यानि विमिश्रितानि ॥
अनंतधर्मेष्वपि संभवन्तमिर्हन्तु दिव्यध्वनिसप्तभंगीम् ॥
क्षीरान्नदध्यन्नतिलान्नमाषसिद्धान्नशाल्यन्नमयैस्तु हव्यैः ॥
पंचप्रकारैर्विविधोपदंशपक्वान्नयुक्तैर्जिनमर्चयामि ॥ १५ ॥

ओं नमोर्हते सहभूतायानंतसुखसंतृप्ताय चरुं विस्तारयामि स्वाहा ॥

मंगं लाति मलं च गालयति यन्मुख्यं ततो मंगलं ।
देवोर्हन्वृषमंगलोभिविनुतैस्तैर्मंगलैः साधुभिः ॥

---

लक्ष्मीशी लग्न करण्यासाठी ही विवाहवेदी आहे असें मानून वेदीपुढें बलिवर्तिकास्थापना करावी.

१३ 'फलेति' हा श्लोक ह्मणून कच्या पिठाची पानें, फुलें, व फळें तयार करून तीं जिनेश्वर प्रभूपुढें अर्पण करावीं. जणू हीं स्वर्गलक्ष्मीनें पाठविलेले नजराणेच आहेत.

१४-१५ 'जिनेश्वरेति' व 'क्षीरान्नेति' हे दोन श्लोक ह्मणून श्रीजिनापुढें सर्व धान्यें मिसळून अर्पण करावींत. जिनेश्वराचे सप्तभंगीतत्व व वस्तुधर्म हे परस्पर असेच मिसळलेले आहेत ह्मणून हे पदार्थ अर्पण करावेत. खीर, दहीभात, तिळाचा भात, उडदाचें अन्न व अनेक चटण्या हे पूर्णतृप्त जिनाला मी अर्पण करतो.

चंचच्चामरतालवृन्तमुकुरैर्मुख्येतरैर्मंगलै—

मुख्यं मगलामिच्छसिद्धसुगुणान्सप्राप्तुमाराध्यते। ।

ओं ह्रां ह्रीं ह्रूं ह्रौं ह्रः अ सि आ उ सा अर्हत्परमेष्ठिन् मंगलद्रव्यार्चनं गृहाण २ नमः स्वाहा ॥ १६ ॥

विमलसलिलपूर्णं श्वेतभृंगारकुंभं ॥

कुशकिसलयदूर्वाबीजपूरांचितास्यम् ॥

दधिसदकचयाढ्यं श्वेतसूत्रावृतांगं ॥

जिनपति चरणाग्रे स्थापय पूर्णसिद्ध्यै ॥ १७ ॥ भृंगारकस्थापनम् ॥

इत्थं जिनेंद्रे निजशुद्धशुक्लध्यानाग्निदग्धाघवने सतीह ॥

कृत्वाधिवासं विविधैः शुभार्थैरभ्युद्धराम्यर्घ्यमनर्घ्यमस्य ॥ १८ ॥ पूर्णार्घ्यम् ॥

प्रागुक्तपुष्पजपमंत्रेण ओं श्रीं ह्रीं हूं श्रीं नमः इत्यनेन मंत्रेण सप्तवारान्प्रतिमां

स्पृशन्नेवाभिमंत्रयेत् ॥

---

१६ ' मंग लातीति' हा श्लोक ह्मणून श्रीजिनाला चामर वगैरे मंगलद्रव्यें अपण करावीत.

१७' विमलेति ' हा श्लोक व त्याचा मंत्र ह्मणून ज्यांत स्वच्छ पाणी आहे, ज्याच्या मुखावर दर्भ, पान, हराळी, महाळुंग हे ठेविले आहेत, जो दही व अक्षतांनीं युक्त आहे अर्थात् ज्याला दही व अक्षता लावलेल्या आहेत व ज्याला पांढरे सूत गुंडाललेलें आहे असा हा भृंगार ( कमंडलु ) पूर्ण सिद्धि व्हावी ह्मणून जिनचरणाजवळ ठेवितो.

१८ ' इत्थमिति ' हा श्लोक ह्मणून पूर्ण अर्घ्य द्यावें पूर्वी सांगितलेल्या कण्हेरीच्या फुलानीं ' ओं श्रीं ह्रीं हूं नमः ' या मंत्राचा सात वेळा जप करून प्रतिमेला स्पर्श करावा.

अथ स्वस्त्ययनविधानम् ॥

स्वस्त्यस्तु नोसौ पुरुषः पुराणः स्वस्त्यस्तु मोहाद्यजितोऽजितार्हन् ॥
स्वस्त्यस्तु नः शंभवशंभवेशः स्वस्त्यस्तु चानंद्यभिनंदनोऽर्हन् ॥ १ ॥
स्वस्त्यस्तु नः श्रीसुमतिर्मतर्द्धिः स्वस्त्यस्तु पद्माभाजिनः सपद्मः ॥
स्वस्त्यस्तु सत्पार्श्वसुपार्श्वदेवः स्वस्त्यस्तु चंद्राभजिनेद्रचंद्रः ॥ २ ॥
स्वस्त्यस्तु पुष्पायुधपुष्पदन्तः स्वस्त्यस्तु नः शीतलशीतलार्हन् ॥
श्रेयान् जिनः स्वस्ति जनाय भूयात् स्वर्स्तींद्रपूज्यक्रमवासुपूज्यः ॥ ३ ॥
स्वस्त्यस्तु नः श्रीविमलोऽमलात्मा स्वस्त्यस्तु वै नित्यमनंतजिन्नः ॥
स्वस्त्यस्तु शर्मावहधर्मनाथः स्वस्त्यस्तु शांतिर्भवदुःखशान्तिः ॥ ४ ॥
स्वस्त्यस्तु सानंदथुकुंथुनाथः स्वस्त्यस्तु नः शश्वदरोऽमरार्च्यः ॥
स्वस्त्यस्तु नः सल्लयमल्लिनाथः स्वस्त्यस्तु नः श्रीमुनिसुव्रतेशः ॥
स्वस्त्यस्तु नः श्रीनमिनाथदेवः स्वस्त्यस्तु नः स्पष्टमारिष्टनेमिः ॥
स्वस्त्यस्तु नः पार्श्वगतेंद्रपार्श्वः स्वस्त्यस्तु धीवर्द्धनवर्धमानः ॥ ६ ॥

---

१ ६ तदनंतर स्वस्त्ययनाचे श्लोक ह्मणून चोवीस तीर्थंकर आमचे कल्याण करोत अशा अभिप्रायाच्या वर्णनाचे स्वस्त्ययनविधान करावं.

धीदृग्वीर्यसुखाद्यनंतसुगुणैर्ये क्षायिकैरंचिताः ॥
सर्वे श्रीजिनपुंगवा भगवतां तेषां गुणस्तोत्रतः ॥
एतत्स्वस्त्ययनादपैति सकलः संक्लेशभावः शुभो ॥
भावः स्यात्सुकृतं च तच्छुभविधेरादाविदं श्रेयसे ॥ ७ ॥

इति देवस्वस्त्ययनविधानम् ॥

श्रीपंचकल्याणमहार्हणार्हा इत्यादि ऋषिस्वस्त्ययनरूपैकादशपद्यानि पठेत् ॥

अथ आशिर्वादविधिः ॥

श्रीमज्जिनेंद्रा हतमोहतंद्राः सुरेंद्रसंपादितादिव्यपूजाः ॥
फणींद्रयोगींद्रनुतप्रभावास्ते सुप्रसन्ना वरदा भवंतु ॥

तत्र ' स्वागत्य ते ' इत्यत्र स्थले ते सुप्रसन्ना वरदा भवन्तु ॥ इति द्वाविंशत्याशिर्वादपद्यानि पठेत् ॥ ततः पूर्वोक्तमंत्रेण ' ओं श्रीं ह्रीं ह्रं श्रीं नमः ' इत्यनेन जपमंत्रेण नववारानेकविंशतिवारान्वा प्रतिमां स्पृशन्नेव परमात्मानमधिवासयेत् ॥

---

७ ' धीदृग्वीर्येति ' हा श्लोक व श्री पंचकल्याणमहार्हणार्हा इत्यादि ऋषिस्वस्त्ययनाचे ११ श्लोक ह्मणावेत. हें स्तोत्र ह्मटल्यानें सर्व संक्लेशभाव नाहींसे होतात व पुण्य लागतें ह्मणून हा स्वस्त्ययनविधि करावा.

अशीर्वादविधि ।

१ ' श्रीमदिति ' वगैरे आशीर्वादाचे बावीस श्लोक व ' ओं श्रीं , इत्यादि हा मंत्र ९ वेळा अथवा २१ वेळां जपून प्रतिमेला स्पर्श करावा, तदनतर केवलज्ञानवृक्षाची स्थापना करावी.

अथ केवलज्ञानवृक्षस्थापनम् ॥

शाखाच्छायेन योसौ हरति खलु सतां कर्मधर्मांशुतापम् ॥
यः सौख्योदारसारं फलति शुभफलं मोक्षनाकादिभेदम् ॥
सेवंते यं तदर्थं विबुधजनखगा यस्य चैनं प्रभावः ॥
संगाज्जातो हि तस्य त्रिभुवनमहितः सोस्तु बोधिद्रुमोऽयम् ॥ १ ॥

इति तत्तत्तीर्थकरोचितकेवलज्ञानवृक्षस्थापनम् ॥ तद्वृक्षाः प्रागेवोक्ताः ॥

अथ नयनोन्मीलनम् ॥

इत्येवं विविधार्चनोपकरणद्रव्याणि वेदीभुवः ॥
पर्यंतेषु निधाय सम्यगथ लग्ने वर्तमाने शुभे ॥
आशीर्मंगलतूर्यसंस्तवरवैर्व्याप्ते दिशां मंडले ॥
नेत्रोन्मीलनहेतवे जिनपतेः सन्मंत्रमेवं पठेत् ॥ १ ॥

ओं कैवल्यावबोधाद्यनुपमगुणधामार्हदीशो महात्मा ॥
साक्षादत्रावतीर्णो ध्रुवमिति हृदये सन्निधायातिरागात् ॥

---

[illegible] ' शाखाच्छायेनेति ' हा श्लोक म्हणून त्या त्या तीर्थकरांच्या केवलज्ञानाच्या वृक्षाची स्थापना करावी, केवल ज्ञानाच्या वृक्षांचें वर्णन पूर्वी केलें आहे तदनतर नयनोन्मीलन विधि करावा

' इत्येवं ' हा श्लोक म्हणून वाद्यादिकांचा ध्वनि होत असतां, ' ओं कैवल्येति ' हा श्लोक व त्याचा मंत्र म्हणून नयनोन्मीलन क्रिया करावी. अनंतगुणधारक श्रीजिन या भूतलावर अवतरलेला आहे असा संकल्प करून

निर्णिक्तस्वर्णपात्रे निहितहिमपयःशर्कराभिःशलाका—
रत्नोपात्ताभिरर्हत्प्रतिकृतिनयनोन्मीलनं संविदध्मः ॥

ओं ह्रीं अर्हं श्रीं णमो अरहंताणं अ सि आ उ सा श्रीं ह्रीं हूं त्रिकालत्रिलोक-पूजितसर्वज्ञसितरक्तनीलकांचनकृष्णनेत्रोन्मीलनानंतज्ञान—अनंतदर्शन-अनंतवीर्य—अनंतसुखात्मकाय नयनोन्मीलनं विदधामि संवौषट् ॥ इति नयनोन्मीलनमंत्रः ॥ २ ॥

स्वर्णपात्रनिहितेन हिमपयःशर्कराभियुतेन पूर्वाश्रितचंदनेन नयनोन्मीलनं रेचकेण सर्वासां प्रतिमानां युगपदेव कुर्यात् ॥

श्रीखंडपद्मोपमदिव्यगंधजुष्टांगयष्टेर्जिनपुंगवस्य ॥
पूर्वं समाराधितचंदनेन सर्वांगलेपं विदधामि भक्त्या ॥

ओं श्रीं ह्रीं हूं श्रीं सकलकर्मलेपनरहिताय पवित्रांगाय नमः इति गंधलेपनम् ॥ ३ ॥

अथ गुणाध्यारोपणम् ॥

प्रध्वंसतो घातिचतुष्टयस्य प्रजायतेऽनंतचतुष्टयं यत् ॥

---

हृदयांत त्याचे सन्निधीकरण करावें. व सोन्याच्या पात्रांत कापूर, दूध व साखर हे पदार्थ ठेऊन ते सळयीनें घेऊन अर्हताचा नयनोन्मीलनविधि करावा याप्रमाणें सर्व प्रतिमांचा करावा.

'श्रीखंडेति' हा श्लोक ह्मणून व त्याचा मंत्र ह्मणून जिनाच्या सर्वांगाला गंधलेपन करावें.

गुणाध्यारोपण

१ 'प्रध्वंसतः' हा श्लोक ह्मणून चार घातिकर्मांचा नाश झाल्यानें जें जिनाला अनंतचतुष्टय प्राप्त झाले

प्रमाणसिद्धं त्रिजगत्सुसारं प्रादुर्भवत्वत्र जिने स्फुटं तत् ॥ १ ॥
अनतचतुष्टयस्थापनप्रतिज्ञापनाय प्रतिमोपरि पुष्पांजलिं क्षिपेत् ॥
जानाति नित्यं युगपत्स्वतोऽन्यसर्वार्थसामान्यविशेषसर्वम् ॥
निर्बाधकं स्पष्टतरं यदेतदनंतविज्ञानमिहास्तु बिंबे ॥ २ ॥
स्वात्मोत्थसामान्यविशेषसर्वं साक्षात्करोत्येव समं सदा यत् ॥
सुनिश्चितासंभवबाधकं तदनंतसद्दर्शनमत्र भातु ॥ ३ ॥
अनंतविज्ञानमनंतदृष्टिं द्रव्येषु सर्वेषु च पर्ययेषु ॥
व्यापारयन्नित्यमसंकरादि स्तादत्र बिंबे तदनंतवीर्यम् ॥ ४ ॥
आत्मैकजातं गतबाधजातं व्यपेतमानं विगतोपमानं ॥
अचिंत्यसारं जगदेकसारं बिंबेत्र भूयात्तमनंतसौख्यम् ॥

---

होतें तें या जिनबिंबाच्या ठिकाणी प्रगट होवो. असें ह्मणून या चतुष्टयांची स्थापना करण्याकरितां प्रतिमेवर पुष्पांजलि क्षेपण करावी.

२ ' जानातीति ' हा श्लोक ह्मणुन निर्बाध अशा अनंतज्ञानाची प्रतिमेंत कल्पना करावी

३ ' स्वात्मोत्थेति ' हा श्लोक ह्मणून अनंतदर्शनाचा जिनप्रतिमेंत संकल्प करावा.

४ ' अनंतेति ' हा श्लोक अनंतज्ञान व दर्शन या उभयतांना धारण करण्यास समर्थ अशा अनंतशक्तीचा प्रतिमेंत संकल्प करावा.

५ ' आत्मैकेति ' हा श्लोक ह्मणुन आत्म्यापासून उत्पन्न झालेलें निर्बाध, निरुपम, उत्कृष्ट अशा अनंत-

अनंतज्ञानादिचतुष्टयप्रतिष्ठार्थं प्रतिमोत्तमांगे चतुःपुष्पीमारोपयेत् ॥ ५ ॥
सुभिक्षता ॆ शतयोजनेषु नभोगतिः प्राण्यवधः क्रियाभिः ॥
भुक्तेरभावोऽप्युपसर्गहानिस्तेजःप्रभावेन चतुर्मुखत्वम् ॥ ६ ॥
समस्तविद्यापरमेश्वरत्वमच्छायता निश्चलपक्ष्मता च ॥
समत्वभाक्केशनखत्वमेते घातिक्षयात्संतु गुणा दशास्मिन् ॥ ७ ॥
घातिक्षयोद्यद्दशमद्गुणस्त्वं त्वं मानुषाणां प्रकृतिं व्यतीतः ॥
त्वं देवतानामधिदेवतासि बिंबेत्र साक्षाद्भव विश्वनाथ ॥
घातिक्षयजदशातिशयस्थापनार्थं दशपुष्पीं क्षिपेत् ॥
शक्रादेशेन भक्त्या धनदविरचिता या सभा योजनानां ॥
द्वीषट्कायामवृत्ता सितरुचिरशिला दिक्षु सोपानपंक्तेः ॥

---

सुखाचा संकल्प श्री जिनप्रतिमेंत करतांना या चतुष्टयाची स्थापना करण्याकरितां प्रतिमेवर चार फुले अर्पण करावीत.

६–९ 'सुभिक्षतेति' हा श्लोक म्हणून १०० योजने सुकाळ असणें, आकाशांतून गमन, प्राणिहिंसा न होणें, कवलाहार नसणें, उपसर्ग न होणें, तेजाच्या प्रभावानें सर्वांना चार तोंड दिसणें, सर्व विद्यामध्यें पूर्ण नैपुण्य असणें, छाया नसणें, पापण्या न हलणें नख व केश न वाढणें असे दहा अतिशय घातिकर्म क्षय झाल्यानें प्रभूला प्राप्त होतात. यांचा मूर्तिमध्यें संकल्प करण्याकरितां मूर्तीवर दहा पुष्पें टाकावीत.

९ 'शक्रादेशेनेति' इंद्राच्या आज्ञेनें कुबेर समवसरण रचितो तें १२ योजनाचें व गोल आकाराचें असतें फरशी फार सुंदर व पांढरी असते. चारी दिशेला पायऱ्या असतात. जमिनीपासून अडीच कोस उंचीवर आका

खे सार्धक्रोशयुग्मे भुव उपरि चरन्त्या तु तस्यां सधूली–
सालप्रासादचैत्याक्षितिपथिषु चतुर्दिक्षु मन्नाट्यशालाः ॥ ९ ॥
मानस्तंभाः सरस्यो द्वितटगतलसद्वेदिकाखातिकातो ॥
वल्यःसालो वनालीनटनगृहयुता वेदिकावध्वजालिः ॥
सालः कल्पद्रुमौघो नटनसदनवान् स्तूपिका वेदिसौधाः ॥
सालः सन्नाट्यशालास्त्रिभुवनजनतोत्कीर्णसंसात्रिपीठी ॥ १० ॥
तदग्रभागे स्थितगंधकुट्या मध्यस्थसिंहासनसंनिविष्टः ॥
योऽनंतबोधादिचतुष्टयोर्हन्कोट्यर्कचंद्रद्युतिरस्तु सोयम् ॥ ११ ॥
समवसरणस्थापनार्थं प्रतिमायाः समतात्पुष्पाक्षतं क्षिपेत् ॥ इति समवसरणस्थापनम् ॥

शांत ते असते तीन तट त्याला असतात. तेथें महाल चैत्यवृक्ष, उत्तम रस्ते व चारी दिशेला उत्तम नृत्यशाला असतात.

१०–११ 'मानस्तभेति' मानस्तंभ, सरोवरें, दोन्हो तटामध्यें असलेल्या वेदिका, खंदक, वेली, तट उद्यान, नाटकगृहें, वेदिका ध्वजपंक्ति, तट, कल्पवृक्षांचा समूह, नाटकगृह, स्तूपवेदि महाल, तट नाटकगृह, सभा व तीर्थंकर विराजमान होण्याचें ठिकाण असें समवसरणाचें वर्णन आहे. समवसरणातील गंधकुटीच्या मध्यभागीं असलेल्या सिंहासनावर कोटि सूर्यप्रमाणें तेजस्वी, अनंतचतुष्टयधारक अर्हत विराजमान होतात इत्यादि समवसरणाची स्थापना करण्याकरितां प्रतिमेच्या समंताद्भागीं पुष्पक्षेपण करावें.

१२–१९ 'जिनस्येति' इत्यादि श्लोक म्हणावेत व देवांनीं केलेल्या चौदा अतिशयांची स्थापना करण्या—

जिनस्य ब्रुवतोऽर्धार्धसर्वांगमगधोक्तिकां ॥
मगधेरन्वकार्यन्त सभ्या यां सास्तु वागिह ॥ १२ ॥
मैत्रीं प्रीतिकरां कुर्युर्जाति कारणवैरिणः ॥
सर्वर्तुसंपद्वृक्षास्तु रत्नमय्यब्दवन्मही ॥ १३ ॥
अनुवातु जिनं वातो विहरंतं तु विस्मृ[illegible] ॥
इहास्तु परमानंदः सर्वेषां न तनूभृताम् ॥ १४ ॥
जिनाग्रे योजनं भूमिं मार्जयन्त्वानलामराः ॥
तत्र गंधोदवृष्टिं च कर्वन्तु जलदमराः ॥ १५ ॥
पद्मयानं भवेत्पंचविंशतिद्विशतीकजैः ॥
फलभारानतव्रीहीनिचिता भवतु क्षितिः ॥ १६ ॥
प्रसीदन्तु दिशः सर्वाः प्रसीदतु नभःस्थलम् ॥
एतैतेत्याव्हयन्त्वद्य भावनाः सकलामरान् ॥ १७ ॥

करिता सिंहासनावर चौदा फुले टाकावीत चौदा अतिशय याप्रमाण समजावेत —१ जिनेश्वराची अर्ध मागधी भाषा होणे, २ स्वाभाविक वैरी असलेल्या प्राण्याचा द्वेष नष्ट होणे, ३ सर्व ऋतूची शोभा एकवटणें, ४ पृथ्वी रत्नाच्या दर्पणाप्रमाणें होणे, ५ जिनेश विहार करित असतां सुगंध वारा वहाणे, ६ सर्व प्राण्यांना आनंद वाटणें, ७ जिनाच्या पुढें एक योजनपर्यंत वायुकुमाराकडून भूमि स्वच्छ केली जाणे, ८ मेघकुमाराकडून सुगंध जलवृष्टि केली जाणे, ९ दोनशे पंचवीस कमले प्रभु विहार करतांना रचविणे, १० पृथ्वी धान्यपूर्ण होणें ११ दिशा व आकाश

धर्मचक्रं पुरो यातु प्रभाचक्राजितार्ककम ॥

ध्वजव्यजनभृंगारकुंभांश्छत्रं च चामरम् ॥ १८ ॥

सुप्रतिष्ठं च मुकुरं तथोत्तिष्ठो जिनाग्रतः ॥ [illegible] संत्वमी जिने ॥

चतुर्दशदेवोपनीतातिशयस्थापनार्थं पीठिकायां चतुर्दशपुष्पाणि क्षिपेत् ॥

इति दिव्यातिशयस्थापनम् ॥ १९ ॥

अथाष्टमहाप्रातिहार्यस्थापनम् ॥

जिनानां जगदीशत्वव्यंजकानि जनापदां ॥ हंतॄणि प्रातिहार्याणि यानि तानि न्यसाम्यहं ॥ १ ॥

अष्टमहाप्रातिहार्यस्थापनाय पीठिकायामष्टपुष्पीं क्षिपेत् ॥

सुमेरुकुटाभतटाल्लुठच्छ्रीमणिप्रभाविच्छुरितेंद्रचापम् ॥

व्यात्तास्यसिंहोद्धृतसिंहपीठं यदत्र बिंबेद्य तदेतदस्तु ॥ २ ॥

ओं सिंहासनाश्रियै स्वाहा । सिंहासने पुष्पांजलिं क्षिपेत् ॥

मिथ्यांधकारक्षपणैकदक्षज्योतिःपरंज्योतिरवाप्तहेतु ॥

---

निर्मल होणे, १२ भवनवासी देवाकडून सर्व देवांना आमंत्रण दिलें जाणें, १३ सूर्याला जिंकलेलें धर्मचक्र प्रभूपुढें चालणें, १४ ध्वज, पंखा, भृंगार, कलश, छत्र, चामर, सुप्रतिष्ठ व दर्पण अशीं आठ मंगलद्रव्यें याप्रमाणे देवकृत चौदा आतिशय आहेत.

१ 'जिनानामिति' हीं आठमहाप्रातिहार्यें जिनेश्वराचें त्रैलोक्यपतित्व सूचित करितात लोकांच्या आपत्ति नष्ट करितात. यास्तव आठ प्रातिहार्यांचे स्थापन करण्याकरिता पीठिकेवर मी आठ पुष्पं क्षेपण करितो.

२–९ 'सुमेरुरिति' इत्यादि आठ श्लोक व त्याचे मंत्र म्हणून क्रमानें १ सिंहासन, २ दिव्यध्वनि,

गंभीरताद्यातिशयैरुपेता या दिव्यभाषात्र विभातु सैषा ॥ ४ ॥
ओं दिव्यध्वनिश्रियै स्वाहा । सरस्वत्यां पुष्पांजलिं क्षिपेत् ॥
शरच्छशांकांशुनितांतगौरा चलच्चतुःषष्टिसुचामरालिः ॥
विलक्षयक्षामरवीज्यमाना या सात्र साक्षादियमस्तु बिंबे ॥ ४ ॥
ओं चतुःषष्ठिचामरश्रियै स्वाहा । चामरधारियक्षयोः पुष्पांजलिः ॥
जिनार्कसम्यक्परिवेषरूपकोट्यर्कतेजोविजयप्रकाशम् ॥
यत्पश्यतां सप्तभवोपदर्शि भामंडलं चारु तदेतदस्तु ॥
ओं भामंडलश्रियै स्वाहा भामंडले पुष्पांजलिं क्षिपेत् ॥ ५ ॥
वैडूर्यभास्वद्विटपोऽश्मगर्भच्छाविच्छदो विद्रुमरुक्प्रवालः ॥
अशोकताकृज्जगतामशोको नाम्नोर्थतो योस्तु स एष साक्षात् ॥ ६ ॥
ओं रक्ताशोकश्रियै स्वाहा ॥ रक्ताशोके पुष्पां लिं क्षिपेत् ॥
वैडूर्यदंडं परिलंबिमुक्तालंवूषकं भूत्रयनाथचिन्हं ॥
छत्रत्रयं यच्छरदिन्दुबिंबत्रयोपमं नूनमिदं तदस्तु ॥ ७ ॥
ओं छत्रत्रयश्रियै स्वाहा ॥ छत्रत्रये पुष्पांजलिं क्षिपेत् ॥
अर्धाधिकद्वादशकोटिदिव्यवाद्यानि गंभीरमरं ध्वनन्ति ॥

---

…ामय चामरे ४ भामंडल ५ अशोकवृक्ष ६ छत्रत्रय, ७ दुंदुभि … या आठ प्रातिहार्यांची स्थापना

प्रत्यर्थिसंत्रासपटूनि यानि वाद्यानि दिव्यानि भवंतु तानि ॥ ८ ॥

दुंदुभिश्रियै स्वाहा ॥ दुंदुभौ पुष्पांजलिं क्षिपेत ॥

गंगाप्रवाहप्रतिमानुगुंजद्भृंगावलीमंगलगानरम्या ॥

दिव्यप्रसूनोत्करवृष्टिरर्हत्सभांतरे यात्र च सेयमस्तु ॥ ९ ॥

ओं पुष्पवृष्टिश्रियै स्वाहा । मालाविद्याधरयोः पुष्पांजलिं क्षिपेत् ॥

इत्यष्टमहाप्रातिहार्यस्थापनम् ॥

अथ लांछनस्थापनम ॥

तीर्थंकरणां निजवंशरूढं पृथग्विधं संव्यवहारहेतुः ॥

यल्लांछनं तत्र कृतार्हदीशाबिंबस्य योग्यं विलिखामि पीठे ॥ १ ॥

पादपीठलिखितलांछने पुष्पांजलिं क्षिपेत ॥

एतानि वृषभादितीर्थंकराणां पृथग्विधानि लांछनानि:—

गौर्गजोश्वः कपिः कोकः कमलं स्वस्तिकः शशी

म्हणून आठवेळा पीठिकेवर पुष्पांजलिक्षेपण करावें. याप्रमाणें आठ प्रातिहार्यांचा स्थापनाविधि झाला.

लांछनस्थापनविधि.

'तीर्थंकराणामिति' हा श्लोक म्हणून पादपीठावर लिहिलेल्या लांछनावर पुष्पांजलि क्षेपण करावी. तीर्थकरांना ओळखण्याच्या खुणेला लांछन म्हणतात हीं लांछनें त्या त्या तीर्थंकराच्या वंशामध्यें रूढ झालीं आहेत. बैल, हत्ती, घोडा, वानर, कोकपक्षी, कमळ, स्वस्तिक, चंद्र, मगर, श्रीवृक्ष, गेंडा, रेडा, सूकर, सायाळ, वज्र

मकरः श्रीद्रुमो गंडो महिषः कोलसेरिकौ ॥ २ ॥
वज्रं मृगोऽजष्टगरः कलशः कूर्म उत्पलः ॥
शंखो नागाधिपः सिंहो लांछनान्यर्हतां क्रमात् ॥ ३ ॥

अथ यक्षयक्षीस्थापनम् ॥

इंद्रो जिनेंद्रोत्तमशासनस्य त्राणे प्रवीणं प्रतिशासनार्हम् ॥
न्ययुंक्त सत्कृत्य यमादरात्तं न्यसामि यक्षं जिनसव्यभागे ॥ १ ॥
यक्षोपरि पुष्पांजलिं क्षिपेत ॥ १ ॥
लब्धाधिकारां जिनशासनस्य त्राणे ततः शासनदेवतेति ॥
रूढां भुवि प्रौढतरप्रभावां न्यसामि यक्षीं जिनवामभागे ॥
शासनदेवतोपरि पुष्पांजलिं क्षिपेत् ॥ २ ॥

अथ पंचकल्याणस्थापनम् ॥

योत्र स्वर्गावतीर्णः सुरगिरिशिखरे दुग्धवार्द्धेः पयोभि ॥

---

हरिण, बकरा, मासा, कुंभ, कासव, नीळें कमळ, शंख व सर्पराज आणि सिंह हीं क्रमानें २४ तीर्थंकरांचीं लांछनें आहेत.

'इंद्र इति' हा श्लोक ह्मणून इंद्रानें जिनशासनाचें रक्षणाकरितां जिनाच्या उजव्या भागास यक्षस्थापना केली आहे असें समजून यक्षावर पुष्पांजलि टाकावी. याचप्रमाणें यक्षीची देखिल इंद्रानें याच कार्याकरितां जिनाच्या डावे बाजूस स्थापना केली आहे ह्मणून यक्षीवर पुष्पक्षेपण करावें.

लब्ध्वा जन्माभिषेकं शतमखविहितं त्यक्तसाम्राज्यभोगः ॥
प्रव्रज्योग्रैस्तपोभिस्त्रिजगदपचिताहत्यमेत्योपदेष्टा ॥
कर्मध्वंसात्तशर्मा त्रिभुवनशिखरे भाति सिद्धोऽस्तु सोऽयम् ॥
पचकल्याणाभिव्यक्तिप्रतिज्ञापनाय प्रतिमोपरि पुष्पांजलिं क्षिपेत् ॥१॥
स्वर्गावतारकल्याणे सुरेंद्रकृतवैभवे । सद्योजाततयारूढो यः स एव जिनोऽस्त्वयम् ॥
गर्भावतारकल्याणाभिव्यक्तये पुष्पांजलिं क्षिपेत् ॥ २ ॥
जन्माभिषेककल्याणे सुरेंद्रकृतवैभवे वामदेवतयारूढो यः स एव जिनोऽस्त्वयम् ॥
जन्माभिषेकस्थापनाभिव्यक्तये पुष्पाजालिं क्षिपेत् ॥ ३ ॥
दीक्षाग्रहणकल्याणे सुरेंद्रकृतवैभवे अघोरात्मतया रूढो यः स एव जिनोऽस्त्वयम् ॥
निष्क्रमणकल्याणाभिव्यक्तये पुष्पांजलिं क्षिपेत् ॥ ४ ॥
केवलज्ञानकल्याणे सुरेंद्रकृतवैभवे ईशानात्मतयारूढो यः स एव जिनोऽस्त्वयम् ॥
केवलज्ञानकल्याणाभिव्यक्तये पुष्पांजलिं क्षिपेत् ॥ ५ ॥

---

'योत्र' हा श्लोक ह्मणून पंचकल्याणाची स्थापना करण्याकरितां प्रतिमेवर पुष्पांजलि क्षेपण करावी.

'स्वर्गावतारेति, वगैरे तीन श्लोक ह्मणून गर्भकल्याण, जन्मकल्याण आणि दीक्षाकल्याण या तीन कल्याणिककांची अभिव्यक्ति करण्याकरितां क्रमानें तीनदां पुष्पांजलि क्षेपण करावी. जिनेश्वराचें गर्भकल्याणिकाच्या समयीं, सद्योजात, जन्मकल्याणिकाच्या वेळीं वामदेव व दीक्षाकल्याणिकांत अघोर अशा नांवांची रूढी पडली आहे.

५ 'केवलेति' हा श्लोक ह्मणून केवलकल्याणाभिव्यक्तिकरितां पुष्पांजलिक्षेपण करावें. केवलज्ञानकल्याणिकाच्यावेळीं जिनेशांचें 'ईशान' हें नांव रूढ झालें आहे.

भावितत्पुरुषावस्थामद्य यस्माद्बिभर्त्यतः रूढस्तत्पुरुषत्वेन यः स एव जिनोऽस्त्वयं ॥
निर्वाणकल्याणाभिव्यक्तये पुष्पांजलिं क्षिपेत् ॥

अथ कंकणमोक्षणम् ॥

सिद्धामराधीश्वरसाक्षिजीवन्मुक्तिश्रियं सद्गुणभूरिभूतिम् ॥
भजेत्स्वसात्कृत्य जिनेश्वरो यस्तत्कंकणं त्वद्य विमोचयामि ॥ १ ॥
ओं सत्तक्खरसज्झाणं अरहंताणं णमोत्ति भावेण ॥
जो कुणइ अणण्णमणो सो गच्छइ उत्तमं ठाणं ॥ कंकणमोक्षणम् ॥ २ ॥
अरहंताणं नमः इति सप्ताक्षरध्यानम् ॥

अथार्हद्देवसाक्षात्करणध्यानम् ॥

ओं केवलणाणदिवायरकिरणकलावप्पयासियट्ठाणे ॥
णवकेवललद्धुग्गमसुजाणियपरमप्पयवएसो ॥ १ ॥

---

६ 'भावीति' हा श्लोक ह्मणून निर्वाणकल्याणभिव्यक्तिकरितां पुष्पांजलिक्षेपण करावे.

१-१ 'सिद्धात' हा श्लोक व त्याचा अरहताण नमः हा सप्ताक्षरी मंत्र ह्मणून जिनेश्वराचे कंकणमोचन करावे. या जिनेश्वराकडून अनंत गुणांच्या ऐश्वर्यानें युक्त अशा जीवन्मुक्तीचा आश्रय केला जाईल. यास्तव याचा कंकण मोचनविधि मी करितों. 'अरहताण णमो' हा सात अक्षरांचा मंत्र जो भव्य जीव हृदया सतत चिंतितों तो उत्तम स्थान अर्थात् मोक्ष प्राप्त करून घेतो. 'अर्हद्देवसाक्षात्करणाचा विधि.

१-२ 'केवलेति' हे दोन श्लोक ह्मणून व त्याचा मंत्र ह्मणून प्रतिमेवर पुष्पांजलि क्षेपण करावी. अरहंताचा

असहायणाणदंसणसाहिओ इदि केवली हु जोगेण ॥
जुत्तोत्ति सजोगिजिणो अणाइणिहणारिसे उत्तो ॥

इत्येषोर्हन्साक्षादत्रावतीर्णो विश्वं पाति इति स्वाहा ॥ प्रतिमोपरि पुष्पांजलिं क्षिपेत ॥ २ ॥

इत्यर्हद्देवसाक्षात्करणविधानम् ॥

घंटाटंकारवीणाक्वणितमुरजधांन्धांक्रियाकाहलाच्छें ॥
च्छेंकारोदारभेरीपटहधलधलंकारसंभूतघोषे ॥
आक्रम्याशेषकाष्ठातटमथ झटिति प्रोच्छटत्युद्भटेऽभ्रं ॥
शिष्टाभीष्टार्हदिष्टयै जिनमुखपटमुद्घाटये मंत्रपूर्वम् ॥

ओं उसहाइवड्ढमाणाणं पंचकल्लाणसंपण्णाणं महइमहावीरवड्ढमाणसामीणं । सिज्झउ मे महइ महाविज्झा । अट्ठमहापाडिहेरसहियाणं । सयलकलाधराणं । सज्जोजादरूवाणं । चउतिसयंविसेससंजुत्ताणं । बत्तीसदेविंदमाणिमउडमत्थयमहिदाण । सयललोयस्स संतिपुट्ठिबुद्धिकल्लाणाउआरोग्गकराणं । बलदेववासुदेवचक्कहररिसिमुणिजदिअणगारोवगूढाणं ॥

---

साक्षात्कार प्रतिमेमध्ये झाला असें हा विधि करून समजावे अरहंत केवलज्ञानरूपी प्रकाशानें जगांतील सर्व पदार्थ प्रकाशित करितात. सम्यग्दर्शन, ज्ञान, चारित्र, दान, लाभ, भोग, उपभोग, अनंतशक्ति व अनंतदर्शन या नऊ लब्धि जिनेश्वराला प्राप्त होतात. सहायरहित ज्ञान व दर्शन या गुणांनीं युक्त अशा जिनेश्वराला जेव्हां ते योगानें युक्त असतात त्यावेळी त्यांना सयोगकेवली असें जिनागमामध्यें म्हटलें आहे.

उहयलोयसुहफलयराणं । थुइसयसहस्सणिलयाणं । परापरपरमप्पाणं । अणाइणिहणाणं बलि बाहुबलिसहिदाणं । वीरे वीरे ओं ह्रां क्षां सेणवीरे वड्ढमाणवीरे हं सं जयंत वराइये वज्जासिलत्थंभमयाणं सदा भव्वपइट्ठियाणं । यत्थ सण्णिहिदा मे भवदु मे भवदु ठठ क्षक्ष स्वाहा ॥ श्रीमुखोद्घाटनमंत्रः ॥ १ ॥

घातिव्रातप्रघातप्रकटनिरवधिज्ञानदृग्वीर्यरूपः
कल्याणैः पंचभेदैः प्रविलसति चतुस्त्रिंशता चातिशेषैः ॥
यश्चाष्टप्रातिहार्यैस्त्रिभवनपतितालांछनैस्तं यजामि ॥
स्याद्वादामोघवाक्यं त्रिधिरचितमहार्घ्येण देवाधिदेवम् ॥ २ ॥
ओं खवियघणघाइकम्मा चउतीसातिसय पंचकल्लाणा ॥
अट्ठवरपाडिहेरा अरहंता मंगलं मज्झं ॥ भूयासुरिति स्वाहा ॥
परमोत्सवेन महार्घ्यमवतारयेत् ॥ ३ ॥

---

१ 'घंटाटंकारेति' हा श्लोक व 'ॐ उसहाइ' हा मंत्र म्हणून जिनमुखावरील वस्त्र काढावें. हा विधि करितांना नाना वाद्यें वाजवावीत. मुखोद्घाटन मंत्रामध्यें वृषभादि चोवीस तीर्थंकर पंचकल्याण संयुक्त आहेत त्यांना देवेन्द्र, चक्रवर्ती, बलभद्र, नरायण हे नमस्कार करितात. इत्यादि अभिप्राय आहे.

२–३ 'घातिव्रातेति' हा श्लोक व त्याचा मंत्र म्हणून मोठ्या थाटानें भगवंतावरून महार्घ्य उतरावें. चार घातिकर्मांचा नाश करणारे व चौंतीस अतिशयांनीं युक्त आठ प्रतिहार्यसंयुक्त अरहंत माझें कल्याण करोत असें म्हणून अर्घ्य उतरावें.

पुष्पेपोरिषवो वयं पुनरिदं पुष्पेपु निःशेपकम् ॥
निष्पीतानि मधुव्रजैर्वयमिदं निष्पापमम्मेवितम ॥
इत्यालोच्य नमत्यपास्य मदमित्याशंकयंतीश ते
निष्पीताखिलतत्त्वपादकमले पुष्पाणि निःपातये ॥
ओं ऱ्हीं श्रीं क्लीं ऐं अर्हत इदं पुष्पाजलिप्राचन गृण्हीध्वं २ नमोर्ह–
द्भ्यो ध्यातृभिरभीप्सितफलदेभ्यः स्वाहा ॥ पुष्पाजलिः ॥ ४ ॥
कोटीकोटीरवींदुज्वलनस अधिकोद्योतवीतक्रमादि–
ज्ञानज्योतिः समंतोज्ज्वलितसकलसालोकलोकोदरोयम् ॥
देवो विध्वस्तनानावृजिनजिनपतिः प्राप्तकल्याणपूजः ॥
श्रेयःसंपादनैकक्षमपदकमलो वर्द्धतामद्वितीयम् ॥ भगवदाशिर्वादः ॥
विजयविभवविद्यावीर्यमौदार्यमाज्ञां ॥
श्रुतिमतिधृतिनीतीः शांतिकांतिप्रसादान् ॥

४ 'पुष्पेपोरिति' हा श्लोक व मंत्र म्हणून पुष्पांजलि अर्पण करावी.

'कोटीकोटीति' हा श्लोक म्हणून भगवान जिनेश्वर कोट्यावधि चंद्र व सूर्यपेक्षां अधिक तेजस्वी आहेत, पंच कल्याणपूजेला प्राप्त झाले आहेत. जिनाचें ज्ञान क्रमरहित आहे व लोकालोकप्रकाशक आहे व तें मोक्षलक्ष्मी देण्यास समर्थ आहेत. त्यांची स्थिति सदैव अशीच राहो असा आशीर्वाद द्यावा.

६ 'विजयेति' विजय, संपत्ति, ज्ञान, सामर्थ्य, औदार्य, आज्ञा, कांति, नीति शांति, सम्यग्दर्शन, सम्यग्ज्ञान

दृगवगमचरित्रं सिद्धिवृद्धिप्ररिद्धी—

वितरतु जगतोऽत्र स्थापितश्रीजिनेंद्रः ॥

कर्तृणां कार्यकाणा जिनयजनविधेर्भूभृता चापरेषां ॥

भूयाद्भूयाश्च भोगः स्वजनपरिजनैः स्तात्सदारोग्यमग्रयम् ॥

शौर्यं धैर्यं च वीर्यं भवतु बहुतरं जायतां दीर्घमायुः ॥

स्वामिन्भो त्वत्प्रसादात्प्रवरसुखकरो वर्द्धतां शुद्धधर्मः ॥

सद्धर्मश्रीबलायुष्यरोग्यैश्वर्याभिवृद्धयः

सतु सर्वस्य लोकस्य जिनेंद्र त्वत्प्रसादतः ॥ इत्याशीर्वादः ॥ ८ ॥

ज्वलितसकललोकालोकलोकोत्तरश्री—

कलितललितभूर्ते कीर्तितेंद्रैर्मुनींद्रैः ॥

---

व चारित्र हे सर्व उत्कृष्ट गुण श्री जिनेश्वर सर्व जगास अर्पण करो.

७–८ 'कर्तृणामिति' हे दोन श्लोक म्हणून जिनपूजा करणारा, करविणारा, राजा व इतर भव्य जीव यांना श्रीजिनकृपेने नानाविध भोग आरोग्य, शौर्य, धैर्य, दीर्घायु या सर्वांची प्राप्ति होवो हे दोन श्लोक आशीर्वादात्मक आहेत.

९ 'ज्वलितेति' हा श्लोक व मंत्र म्हणून श्रीजिनचरणाजवळ शांतिधारा सोडावी. ही शांतिधारा जगाच्या शांते करितां होवो.

जिनवर नव पादोपांततः पातयामो—

भवदवशमनार्थामथेतः शांतिधाराम् ॥ ९ ॥

ओं ऱ्हीं क्लीं ऐं अर्हंत इमां शांतिधारां गृह्णीध्वं २ र्हं नमः स्वस्ति भद्रं भवतु जगतां शांतये शांतिधारां निःपातयामि । शांतिकृद्भ्यः स्वाहा शांतिधारा ॥ ९ ॥

जयजयेत्यानंदस्तवनं पठेत् ॥

यष्टा समभ्यर्च्य जिनं तदग्रे शक्त्या धनं नित्यमहाय दत्वा ॥

स्वर्मुक्तिकन्यावरणाय शुल्कमाजन्म किंचिद्व्रतमाददीत ॥ १० ॥

एवं यष्टा जिनेंद्रमभ्यर्च्य नित्यमहार्थं अर्हतः कोशेऽर्थं निधाय व्रतमाजन्म किंचिदादाय विपुलारात्रिकमवतार्य धूपघटमुत्क्षिप्य पंचांगप्रणामं कुर्यात् ॥

ततःसहस्रनामादिनानाविधमहास्तवैः । गीतैर्नृत्यैश्चवाद्यैश्च जिनमाराधये मुदा ॥ ११ ॥

सिद्धश्रुतचरित्रार्षिशांतिभक्तीः ससंघकाः । केवलज्ञानकल्याणक्रियां कुर्वन्तु याजकाः ॥ १२ ॥

---

या नंतर 'जयजय' या श्लोकापासून आरंभिलें जाणारें आनंदस्तवन करावें.

१० 'यष्टेति हा श्लोक म्हणून प्रतिष्ठा करणाऱ्यानें नेहमीं जिनाची पूजा चालावी म्हणून यथाशक्ति भांडारांत धन द्यावें. व आजन्म एखादें व्रत घ्यावें. तदनंतर आरती करून पंचांग नमस्कार करावा.

११–१२ 'तत इति' हा श्लोक म्हणून सहस्रनाम वगैरे स्तुति म्हणावी. गीत, व वाद्यांनीं जिनाची आराधना करावी.

१३ 'सुगंधीति' इत्यादि श्लोक म्हणून मुनीची पूजा करावी. 'श्रीमज्जिनेंद्रा' इत्यादि वावीस आशीर्वादात्मक

सुगंधिशीतलैः स्वच्छैः स्वादुभिर्निर्मलैर्जलैः । सार्धद्वीपद्वयातीतभवद्व्ययतीन्यजे ॥ १३ ॥

इत्यादिभिर्मुनिवृंदारकानभ्यर्चयेत् ' श्रीमाज्जिनेंद्रा हतमोहतंद्रा ' इत्यादिद्वाविंशत्याशिर्वाद-पद्याना विजयाविभवविद्येत्यादिपद्यत्रयस्य च पाठेन शेषगंधाक्षताभिः भव्यसंघं संतर्पयेत् ॥

अथ यागमंडलाराधनोक्तप्रथमगद्यपद्याभ्यां प्रथमपद्यमात्रेण वा, प्रधानपूजया वेदिका निवासिसर्वपरिवारदेवानभ्यर्चयेत् ॥

शिलामध्येथ नासाया इत्यादिमंत्रैर्गर्भगृहद्वारे क्षेत्रपालादिद्वारपालकान् । श्रीविमानस्य मध्ये ब्रह्माणं, तत्प्रादक्षिण्येन स्थितदिक्पालकान्, ' मध्येगृहं विधातरम् इत्यादि मंत्रैः संतर्प्य । सर्वाण्हयक्षछत्रत्रयाभ्यां सह गत्वा ग्राममध्ये ब्रह्माणं, ग्रामस्य पूर्वादिदिक्षु दिक्पालान्प्रागुक्तमंत्रै-रेवाभ्यर्चयेत् ॥ ततो वेदिकास्थितचलाजिनबिंबाग्रे श्रीविहारघोषणामुद्घोष्य गंधकुटिसंकल्पे चतुष्के तद्बिंबं निवेश्य महाभूत्या श्रीविमानं परीत्य ग्रामप्रदाक्षिणमपि कृत्वा पूर्वस्थाने जिनबिंबं निवेश्य शांतिबलिमिष्टप्रार्थनां क्षमापणं सर्वदेवताविसर्जनं कृत्वा अष्टोत्तरकलशैर्वक्ष्यमाणविधिना महाभिषेकं एकादशमहामहं च विधाय प्रतिष्ठादिवसाक्रियां निष्ठापयेत् । तद्यथाः—तावदियं विहारघोषणा ॥

---

श्लोक म्हणून व 'विजयेति' तीन श्लोक म्हणून भव्यसमूहास गंध, अक्षता, तांबूल इत्यादिकांनीं खुप करावें.

' अथेत ' तदनन्तर यागमंडलाराधना प्रकरणात लिहिलेल्या पहिल्या गद्यपद्यानें अथवा प्रथम पद्यानें प्रधानपूजेनें वेदिकानिवासि सर्व परिवार देवांची आराधना करावी. ' शिलामध्ये ' इत्यादि मंत्रांनी गर्भ गृहाच्या दरवाज्यावर क्षेत्रपाल वगैरे द्वारपालांना, श्री विमानाच्या मध्यभागीं ब्रह्मा व त्याच्या डाव्या बाजूस असलेल्या दिक्पालकांना, मध्येगृह, इत्यादि मंत्रांनी संतुष्ट करून सर्वाण्हयक्ष व छत्रत्रय यासह जाऊन

विन्यस्तांजालिना विहारसमये शक्रेण विज्ञापिते
लोकानां हितामिच्छनाथ जगतां नाथे विहारोन्मुखे ॥
रोधःक्रोडविसर्पिणी सुरवरा यां चकुराघोषणा—
मास्मिञ्जैनविहारमंगलमुखे सेयं मया घुष्यते ॥ १ ॥

स्वस्ति समस्तसुरासुराधीशमणिमुकुटमकरिकाशोणकोणकपणमसृणितचरणपीठपृष्ठः प्रादुर्भूतानंतचतुष्टयविभूतिर्भुनहितैकतानप्रवृत्तिः संजीवनौषधमाजवजवसंज्वरमूर्च्छितानाम् ॥ प्रथमतरमंगलं मंगलानां । आद्वितीयशरणं शरणार्थिनां । आविष्कृतपरमार्हन्त्यमहिमा भगवानपेक्ष्यमाणः किल लोकहितापादनौत्सुक्यतरलितचेतसः प्राचीनबर्हिषो विहारसमयासत्तिविज्ञापनाम । आचिंतनीय प्रवृत्तिवैभवः सकलजगत्सुकृतसामग्रीमनुमन्यमान इव स्वयमसावलकरोति नभोभागपथे परार्ध्यं पद्मयानकम् ॥

---

गावामध्यें ब्रह्मा व गांवाच्या पूर्वादि दिशामध्यें दिक्पालांना पूर्वोक्त मंत्रांनीच पूजावें. तदनन्तर वेदिकेवर असलेल्या चलजिनप्रतिमेच्या पुढें श्री विहाराची घोषणा करावी. गंधकुटीवर श्री जिनबिंब ठेऊन मोठ्या थाटानें जिनमंदिराला प्रदक्षिणा द्यावी व ग्रामप्रदक्षिणाही करून पूर्वीच्या ठिकाणीं जिनबिंब स्थापावें. त्यावेळीं शांतिबलि, इष्टप्रार्थना, क्षमापण, सर्वदेवताविसर्जन हीं कृत्यें करून १०८ कलशांनीं व पुढें सांगितले जाणाऱ्या विधीनें महाभिषेक व एकादश महामह हे विधि करून प्रतिष्ठादिवसाची क्रिया संपवावी. प्रथमतः विहारघोषणेचें सविस्तरस्वरूप सांगतात. 'विन्यस्तांजालिनेति' हा श्लोक म्हणून इंद्रानें त्रैलोक्याचें हित व्हावें म्हणून जिनेश्वराला हात जोडून विहार करण्यासाठीं प्रार्थना केली.

अमी चानंदनिर्भरैरापूर्यंते सुरशांखिकैः शंखाः । अधरितांभोधरनिर्घोषाणि वाद्यन्ते चातोद्यानि उपरि च सेवते समुन्मिषन्मणिमरीचिनिचयमुषितविरोचनरुचिप्रतानं लोकत्रयाधिपत्यैकलांछनं छत्रत्रयम् । विधूयंते चोच्चलितदुग्धोदवीचिनिचयापहासिनश्चामरनिवहाः । वर्षंति बहलामोदसंमोहितालिकुलानि सुरवारिदाः सुरकुसुमानि । अयं च समुच्चलितवीचिहस्तावकीर्यमाणविचित्ररत्नमुक्ताफलजालजटिलपुरोभागः प्रणमति वेलामूर्ध्ना भगवन्तमंभसां निधिः । तदानीं देदीप्यमानदेहप्रभाव्यतिकरविचित्रितावियत्पथाः समासीदंतु सेवावसरप्रतिपालिनः त्रैविष्टपाः । आगच्छंतु गृहीतोज्वलनेपथ्याः कौतुकवेषानुगमसत्वरपारिजनाः । सभ्रांता नन्मपद्मपरिवृता बद्धांजलयो मध्यमलोकपालाः । आयातु विश्वेश्वराविहारोत्सवाविस्मेरलोचनसहस्राक्षसमार्चितं परीत्य परमेश्वरपादारविंदं ॥ सकलजनस्तुत्यजन्मानः सारस्वतादित्यवन्ह्यरुणगर्दतोयतुषिताव्याबाधारिष्टा लौकांतिकाः । गायतु श्रुतिसुखानि गेयानि किन्नरीभिः सह किन्नराः । स्पृशन्तु वीणाविपंचीप्रमुखतततवाद्यजातमसर्त्याः । वादयंतु घनगंभरिघनजातस्तानीतातिवातीनिरवद्यानिनादगंधर्ववाद्यानि । नृत्यंतु सलीलविरचितकरणांगहारहारिण्यो गगनांगणरंगेषु सुरयोषितः । पालयंतु स्वां स्वां दिशमिंद्राग्नियमनिर्ऋतिवरुणवायुकुबेरैशानशेषशीतांशवो दशापि लोकपालाः । वारयंतु समुद्यन्दृहद्ध्वानाःकुटिलदंष्ट्राः करालमुखाकाराः समुत्सारितहिंस्राः पूजनं परितो राक्षसा रक्षकाः । प्रतिष्ठतामग्रतः परिचारकामरपरिवारपरिवृता परीत्य परमेष्ठिनं पद्महस्तया सह पद्मया देवी सरस्वती । अग्रतो भर्तृप्रकाटितप्रतीहाराधिकारः प्रसादयतु उदग्रपदं राजराजः । प्रचुरामोदमोदितरोधोभागाः परिमार्जयंतु मरुतः परितः । अभ्युक्षंतु समंततः सुखशीतलामोदिभिरंबुभिरम्बुदामराः । मंडयंतु मत्तभ्रमद्भ्रमरनिकरझंकारिभिर्मंदारकुसुमैर्म

रुतः पतितः पुष्पमेघाविकिरणः । विचित्रयंतु च त्रिभिनागनभिन्यामैर्नगवद्विहारपदवीं । आक्रीडंतु नानानर्घ्यरत्ननिर्माणस्थलेषु क्रीडापथेषु पुरःसराः सहैव सुरपुरंध्रीभिः सुराः । गृह्णन्तु यथाकामं कामितार्थप्रदानपरेभ्यः कल्पशाखिभ्य कामितार्थं कामिनो जनाः। उत्तंभितममुत्तुंगमणितोरणप्रभाप्रतानवितानितेषु मार्गोभयपार्श्वेषु सस्पृष्टगगनतलाः परिकल्प्यंतामनल्पप्रसूननिष्यंदिमकरंदगंधाधीकृतमधुकरनिकराः भगवद्व्याख्यानमंडपसन्निभाः सुमनोनार्भिभिः मुनैः सुमनोमंडपाः । पश्यंतु पापप्रध्वंसिनः सप्तभवान्भास्वत्सहस्रप्रभातिशायिनि प्रभोः प्रभामंडले भव्याः । अनुयांतु च भगवंतमधिगतसप्तर्द्धयो भगवंतो मुनिपुंगवाः । परिपूरयंतु चाखिललोकमनोरथंस्तदभीष्टार्थप्रदानेन हेमरत्नादिसारवस्तुवर्षिणो नवानिधयः । उत्कृष्टफणामणिकिरणरंजितव्योमसीमानः परिपठन्तु भगवद्गुणगणं फणाभृतः । समुद्यद्बहलकालागरुधूमधूमव्याप्तनभोभाग धूपघटपटलं बिभ्राणो व्रजंतु सस्त्रो वैश्वासितगोचिषो विरोचनाः । दादयंतु समन्ततो भगवद्विहारस्याध्वानं विबुधाः किंकराः । गौवर्णैश्चीनपट्टमयैश्चातपत्रैर्बिभ्रतु विभ्राजमानध्वजप्रकरमनुकूलपवनाविधूयमानमदभ्रमभ्रंलिहचूलिकम् ॥

प्रतन्यतां चाग्रतः चराचरगुरुमंजुलोत्सवशंसीनि त्रिजगद्विलोचनानि सम्भाजयज्जवाज्ज्वल्यमानारसहस्रकिरणमरीचिजितारिशासनम् । परिपूरयन्तु पुण्यनिधिचक्रं सुत्रामुजः । गच्छन्तु जयध्वानमुखरमुखा वल्गु वल्गंतः प्रकीर्णकाभियोगभाजः । शाम्यता नानाविधाभिः प्रतिहतशक्तयो जगति विश्वे व्याधयः । चिकित्संतु भगवत्माहात्म्यसागरनास्त देन भागत्रैकल्यमूकबाधिर्यपंगवः ॥ विलोलयतु त्रिभुवननाथवैभवं गाधानुवमुदंचत्सस्यरोमांचप्रपंचकंचुकिता वसुधावधूः । भवंतु क्रमापेक्षविलंबमसहमानाः संतो विहारोत्सवसंभावनोत्सुकजनाः । प्रसूतां च प्राप्तसमया भूत—

यो लोकैकशिखामणिर्यमनिशं ध्यायन्ति योगीश्वराः ।
येनादर्शि समस्ततत्वममरा यस्मै नमः कुर्वते ॥
यस्मान्नास्त्यपरो हितस्त्रिजगते यस्यैव युक्तासता ॥
यस्मिन्केवलबोधभानुरुदितः सोऽव्याज्जिनोऽयं जगत ॥

ओं श्रीं ह्रीं हं श्रीं नमः परमशांताय सर्वलोकशांतिर्भवतु स्वाहा ॥

शांतिधारा ॥ ३ ॥

अर्चामग्रे प्रनृत्यत्कलशयुतवधूमग्रभृंगारनिर्यद् ॥
वार्धारापूतधात्रीं बहुतरविभवासादरेणानुयांतः ॥
सर्वाशाः पूरयंतो बलिमनुमुखराः सर्वधान्यैश्चलाजैः ॥
सत्पुष्पैरक्षतौघैर्जिननिलयमिमे त्रिः परीयाम शान्त्यै ॥

ओं अर्हद्भ्यो नमः ॥ ४ ॥

प्रमादाज्ज्ञानदर्पाद्यैरित्यादिना क्षमापणपूर्वकं पंचांगप्रणामः ॥
मोहध्वांतविदारणमित्यादिना गमनाप्रच्छनम् ॥
इत्थं सौधर्मशक्रप्रभृतिसुरवरा यां जिनेंद्रस्य साक्षाद् ॥

---

३ 'यो लोकैक' हा श्लोक म्हणून व मंत्र म्हणून शांतिधारा सोडावी.
४ 'अर्चामग्रे' हा श्लोक म्हणून जिनमंदिराला प्रदक्षिणा द्यावी.

चक्रुः कैवल्यबोधोत्सवविषयमहाश्चर्यकल्याणपूजां ॥
तामारोप्यात्र बिंबे विधिवदिह कृता शक्तितो भूरिभक्त्या ॥
भुक्त्यै मुक्त्यै च यष्टृप्रभृतितनुभृतामस्तु कल्याणपूजा ॥

इष्टप्रार्थनाय पुष्पांजलिः ॥ ५ ॥

इत्थं विधत्ते जिनपुंगवस्य कैवल्यबोधोत्सवमंघिधिं यः ॥
कैवल्यकर्मोत्सवमाशु यास्यत्यमुत्र नूनं स हि धर्मनेमिः ॥ ६ ॥
इत्यर्हत्प्रतिष्ठासारसंग्रहे नेमिचंद्रदेवविरचिते प्रतिष्ठातिलकनाम्नि
केवलज्ञानकल्याणविधिर्नामैकादशः परिच्छेदः ॥ १ ॥

---

५ 'प्रमादादिति' हा श्लोक म्हणून क्षमा मागून श्रीजिनाला पंचांग नमस्कार करावा.

६ 'मोहेति, हा श्लोक म्हणून घरीं जाण्याबद्दल श्रीजिनाची परवानगी घ्यावी.

७ 'इत्थमिति, हा श्लोक म्हणून इष्टप्रार्थनेकरिता पुष्पांजलि क्षेपण करावी. या श्लोकाचा सारांश— या प्रमाणें सौधर्मेंद्र वगैरे इंद्रांनी जो केवलज्ञानोत्सव केला त्या उत्सवाचें आरोपण या जिनप्रतिमेमध्यें मोठ्या भक्तिनें केलें आहे हें कल्याणपूजन यजमान, प्रतिष्ठापक व भव्य लोकांच्या भुक्ति व मुक्तिला कारण होवो.

८ 'इत्थं विधत्ते इति. या प्रमाणें श्री जिनेश्वराचा केवलज्ञानपूजोत्सव जो भव्यजीव करितो तो उत्तरजन्मीं लौकर केवलज्ञानोत्सवास प्राप्त होतो व धर्मप्रवर्तक होतो.

या प्रमाणें नेमिचंद्रदेवांनी रचिलेल्या प्रतिष्ठासारसंग्रहामध्यें केवलज्ञानकल्याणविधिचें प्रतिपादन करणारा अकरावा अध्याय संपला.

# अथ द्वादशः परिच्छेदः ।

अथ निर्वाणकल्याणम् ॥
प्रतिष्ठादिवसात्पश्चाद्द्वितीयेऽह्नि याजकः ॥
यागमंडलमारभ्य समासात्तत्र विष्टरे ॥ १ ॥
जिनबिंबं निवेश्यास्य विदध्यादधिवासनम् ॥
धर्मोपदेशसंकल्पात्तत्वार्थं साधु घोषयेत् ॥ २ ॥
त्रिसंध्यमेवं कुर्वीत प्रतिष्ठोक्ताधिवासनम् ॥
मध्यान्हेस्ति विशेषस्तद्यथा कृत्वाधिवासनाम् ॥ ३ ॥
जिनपादार्चितैर्गंधपुष्पतांबूलसत्फलैः ॥
संतर्प्य भव्यसंदोहं प्रागुक्तविधिनाशिषा ॥ ४ ॥

१–४ प्रतिष्ठादिवसानंतर दुसऱ्या दिवशी प्रतिष्ठाचार्यानें यागमंडलविधि करावा. व तेथें सिंहासनावर-जिनबिंब स्थापून अधिवासनविधि करावा. धर्मोपदेशाच्या संकल्पानें श्रीजिनेश्वर उपदेश देत आहेत अशी घोषणा करावी. या प्रमाणें प्रतिष्ठोक्त अधिवासन त्रिसंध्य करावें माध्यान्हीं थोडासा विधि भिन्न आहे. तो असा —— अधिवासनविधि करून जिनेश्वराच्या चरणाची ज्यांनी पूजा केली आहे अशा गंध, पुष्प, तांबूल व उत्तम फळें यांनीं पूर्वोप्रमाणें आशीर्वाद देऊन भव्याना संतुष्ट करावे.

द्वारपालबलिं ब्रह्मबलिं दिक्पालसद्बलिं ॥
श्रीबलिं च ध्वजबलिं ग्रामसंबंधिनां पुनः ॥ ५ ॥
ब्रह्मदिक्पालकानां च बलिं कृत्वा क्रमात्ततः ॥
पीतैः सुगंधिभिश्चूर्णैः पुंजितैरर्चयेज्जिनम् ॥ ६ ॥
तच्चूर्णं बिभृयुः सर्वे भव्याः शिरसि भक्तितः ॥
विहारघोषमुक्त्वा च सर्वसंघेन सेवितम् ॥ ७ ॥
पद्मयानं समारोप्य देवं पुरि विहारयेत् ॥
कुंभैरष्टशतेनाभिषिच्य देवं समर्पयेत् ॥ ८ ॥
प्रतिष्ठातस्तृतीयेऽन्हि चैवमेव क्रियाक्रमः ॥
किंतु कुंकुमपंकाढ्यतीर्थवारिभिरुंभितैः ॥ ९ ॥

---

५–८ तदनतर द्वरपालबलि, दिक्पालबलि, श्रीबलि, ध्वजबलि हे बलि करून तदनंतर ग्रामसंबंधी ब्रम्ह बलि, व दिक्पालबलि करावा. यानंतर क्रमाक्रमाने पिवळ्या अशा सुगंधिचूर्णाच्या पुंजांनीं श्रीजिनाची पूजा करावी. तें चूर्ण सर्व भव्यजीवांनीं मस्तकावर धारण करावें तदनंतर विहाराची घोषणा करून पद्मयानावर प्रमूस बसऊन सर्व संघासह शहरात विहार करवावा तदनंतर एकशे आठ कुंभांनीं भगवंताचा अभिषेक करून पूजन करावें.

९—१० प्रतिष्ठेपासून तिसऱ्या दिवशीं हाच क्रियाक्रम करावा. परंतु केशराचे गंधाचें मिश्रण ज्यांत आहे

कुंभैरलंकृतैर्देवमाभिषिच्य समर्च्य च ॥
तज्जलं बिभृयुर्भव्याः पापपंकापहारकम् ॥ १० ॥

तद्यथा—प्रतिष्ठादिवसाद्द्वितीयेऽहनि यागमंडलस्य प्रागुक्तगद्यपद्याभ्यां प्रथमपद्यमात्रेण वा समासतः समाराधनां समापयेत ॥

## अथ यागमंडलमध्ये पीठस्थापनम् ॥

श्रीपांडुकाव्हयशिलाग्रिमपीठकल्पं । तद्वेदिकोपरि तटे निदधे भवन्तम् ॥
प्रक्षालयामि शुचिभिः सलिलैः पटेन । प्रच्छादितेत्र निदधेऽक्षतपुष्पदर्भान् ॥

ओं ह्रीं अर्हं क्ष्मं ठठ श्रीपीठस्थापनं करोमि स्वाहा । पीठस्थापनम् ॥

ओं ह्रां ह्रीं ह्रूं ह्रौं ह्रः नमोर्हते भगवते श्रीमते पवित्रतरजलेन श्रीपीठप्रक्षालनं करोमि स्वाहा ॥

---

अशा तीर्थजलांनीं युक्त कलशांनीं प्रभूचा अभिषेक करून पूजा करावी. व तें पापरूपी चिखल दूर करणारें गंधोदक भव्यानीं धारण करावें.

'तद्यथेति', प्रतिष्ठा समाप्तीच्या दुसऱ्या दिवशीं यागमंडलाची आराधना पूर्वी सांगितलेल्या गद्य व पद्यांनीं अथवा प्रथम पद्यानें संक्षेपानें समाप्त करावी.

यागमंडलामध्ये पीठस्थापनाचा विधि.

१ 'श्रीपाडुकेति' हा श्लोक ह्मणून वेदिकेच्या वरच्या तटावर सिंहासन स्थापन करावें.
'ओं ह्रीं' हा पीठस्थापनाचा मंत्र ह्मणून तें स्थापन करावें.
'ओं ह्रां ह्रीं' हा मंत्र ह्मणून तें प्रक्षालित करावें. व त्यावर नवीन वस्त्र आच्छादावें.

पीठप्रक्षालनम् ॥ तत्पीठोपरि प्रागग्रवस्त्राच्छादनम् ॥

ओं ऱ्हीं दर्पमथनाय नमः । सकुसुमाक्षतदर्भस्थापनम् ॥ १ ॥

स्वच्छैस्तीर्थै० पीठं समभ्यर्चये । ओं ऱ्हीं सम्यग्दर्शनज्ञानचारित्राय स्वाहा । पीठार्चनम् ॥

संस्थापयाम्युपरि तस्य जिनेश्वरार्चां

चक्रत्रयं जिनपतेरपसव्यभागे ॥

छत्रत्रयं तनु तस्य तु सव्यभागे ॥

वादित्रजालजटिले सति सर्वलोके ॥

ओं ऱ्हीं श्रीं क्लीं ऐं अर्हं स्वाहा प्रतिमास्थापनम् ॥ २ ॥

जिनमतमिव सूक्ष्ममित्यादिना मुखवस्त्रप्रदानादर्घ्योद्धरणांतमधिवासनां विदध्यात् ॥ जिनदिव्यध्वनिसंकल्पेन प्रतिमाग्रे भव्यसंघस्तत्वार्थं घोषशुध्या पठेत् ॥ एवं त्रिसंध्यमधिवासनां कुर्यात् ॥ श्रीमज्जिनेंद्रा हतमोहतंद्रा इत्याशीर्वादैर्भव्यसघं जिनपादार्चितगंधमाल्यतांबूलफलैः संतर्पयेत् ॥ प्रागु-

---

'ओं ऱ्हीं दर्पेति' हा मंत्र ह्मणून पुष्पें व अक्षता मिश्रित दर्भस्थापन करावें.

'स्वच्छैस्तीं' हा श्लोक व त्याचा मंत्र ह्मणून सिंहासनाचें पूजन करावें.

२ 'संस्थापयामीति' हा श्लोक ह्मणून प्रतिमास्थापन करावें. चक्रत्रय हें उजव्या बाजूला व छत्रत्रय हें डावे बाजूला स्थापन करावें.

'जिनमतमिवेति' हा श्लोक ह्मणून प्रतिमेच्या मुखावर वस्त्राच्छादन करावें व अर्घ्य द्यावें. अशा रीतीनें अधिवासन विधि करावा. जिनेश्वराच्या ठिकाणीं दिव्यध्वनि उत्पन्न झाला असा संकल्प करून भव्यसमूहानें तत्वार्थ शुद्ध रीतीनें ह्मणावें. याप्रमाणें त्रिकाळीं हा अधिवासनविधि करावा

'श्रीमज्जिनेंद्रा' इत्यादि आशीर्वाद श्लोक ह्मणून भव्यांना जिनचरणीं पूजित झालेले तांबूल, गंध, पुष्पहार,

कृतम्मंत्रैर्द्वारपालादिबालिं विदध्यात ॥ उत्सवविधौ वक्ष्यमाणविधिना पीतसुरभिचूर्णं कृत्वा तच्चूर्णपुंजैर्जिनमभ्यर्चयेत ॥

अथ चूर्णार्चनम् ॥

भव्यानुग्रहराग एष किमयं भव्यैकबंधोर्विभो–॥
भव्यानां बहुभक्तिरागविसरः किंवा जिनाघ्रिद्वये ॥
इत्याशंकितपीतचूर्णनिकरैः श्रीवश्यचूर्णोपमैः ॥
संचूर्णीकृतकर्मणो जिनपतेः श्रीपादमाराधये ॥

ओं ऱ्हीं सर्वकर्म चूर्णीकरोतु भगवान्स्वाहा । चूर्णार्चनम् । तच्चूर्णं शिरसि सर्वे भव्या धारयंतु ॥

ततो जिनाग्रे विहारघोषणामुक्त्वा श्रीविहारसंकल्पेन जिनं पुरि विहारयेत् । प्रागुक्तनित्यमहाविधिनाष्टोत्तरशतकलशैरभिषिच्यैकादशमहेन जिनमभ्यर्चयेत

---

फळें द्यावीत. पूर्वी सांगितलेल्या मत्रांनी द्वारपालादिकांचा विधि करावा. हा भव्यावर मोठा अनुग्रह किंवा हा भव्यांच्या भक्तीचा समूह आहे काय अशा चूर्णाने कर्मविनाश करणाऱ्या श्रीजिनाची पूजा करावी. व तें चूर्ण सर्व भव्यांनी मस्तकीं धारण करावें.

'ततो इति' तदनतर जिनाच्या पुढें विहाराची घोषणा करून श्रीविहाराच्या संकल्पानें जिनाचा गांवांत विहार करवावा. पूर्वोक्त नित्यमहाप्रमाणें १०८ कलशांनी जिनाचा अभिषेक करून अकरा प्रकारानें जिनाची पूजा करावी. 'सो इति' हा श्लोक म्हणून देवांचें विसर्जन करावें. परमब्रह्म हृदयांत धारण करावें, शांतिधारा, शांतिबलि, क्षमापण, जाण्याविषयीं परवानगी हा विधि करावा

सर्वे देवाः समाहूताः शिष्टार्हत्प्रभुपूजने ॥
इष्टमस्माकमापाद्य तुष्टा यांतु यथायथम् ॥

ओं जिनपूजासमाहूता देवाः सर्वे विहितमहामहाः स्वस्थानं गच्छत २ जः ३ इति सर्वे देवविसर्जनम् ॥ परब्रह्मात्माध्यासनं शांतिधारा शांतिबलिक्षमापणगमनाप्रछनं विदध्यात् ॥ इति प्रतिष्ठाद्वितीयदिनविधानम् ॥ तृतीयदिनेऽपि पीतचूर्णार्चनं वर्जयित्वा इदमेव विधानमवसेयम् ॥ तत्र कुंकुमोदकपारिपूरितकलशैः प्रागुक्तमध्यकुंभाभिषेकगद्यपद्यमंत्रैर्जिनमभ्यर्चयेत् ॥

इति प्रतिष्ठातृतीयदिनविधानम् ॥

प्रतिष्ठादिवसात्पश्चाच्चतुर्थेऽहनि याजकः ॥
प्रातरेव हि कुर्वीत यागमडलपूजनम् ॥ १ ॥
तत्पुरो भूतले पंचचूर्णैरष्टदलाम्बुजम् ॥
विरच्य भूमिं संशोध्य न्यस्य दर्भान्समर्च्य ताम् ॥ २ ॥
कर्णिकायां न्यसेत्सिद्धान्दलेष्वष्टसु तद्गुणान् ॥

---

हें दुसऱ्या दिवसांचें कृत्य होय. तिसऱ्या दिवशीं पीतचूर्णार्चनविधि सोडून बाकीचा विधि करावा पूर्वी सांगितलेल्या मध्यकुंभाभिषेकाच्या गद्यपद्यमंत्रांनीं केशर गंधाच्या पाण्यानें भरलेल्या कलशांनीं जिनाची पूजा करावी. या प्रमाणें तिसऱ्या दिवसाचा विधि आहे.

१—६ ‘ प्रतिष्ठेति ’ प्रतिष्ठा दिवसापासून चौथे दिवशीं याजकानें सकाळींच यागमंडळपूजन करावें. प्रथम भूमीवर पांच प्रकारच्या चूर्णांनीं आठ पाकळ्यांचें कमळ लिहावें. भूमिसंशोधनविधि करून दर्भस्थापना

तदग्रे विधिना न्यस्य पीठे मंस्थापयेज्जिनम् ॥ ३ ॥
कल्याणमालामारोप्य कृत्वा तामधिवासनाम् ॥
मुखवस्त्रं समुत्सार्य प्रोत्क्षिप्याघ्र्यमनर्घ्यकम् ॥ ४ ॥
सम्यक्त्वादिगुणास्तत्र समारोप्य समर्घ्य च ॥
आराध्य पीठिकामंत्रैः ससधा कुसुमैः सितैः ॥ ५ ॥
मंत्रैस्तैर्गार्हपत्याग्नौ हुत्वान्नाहुतिमन्वतः ॥
स्तुत्वा शिवक्रियां कृत्वा माल्यैः कुसुमचंदनैः ॥ ६ ॥
अक्षताद्यैर्जिनानिष्ट्वा तानि बिभ्रतु भाक्तिकाः ॥
प्रागुक्तविधिना तीर्थजलमानीय तज्जलैः ॥ ७ ॥

---

करावी व भूमीचे पूजन करावें. कर्णिकेमध्यें सिद्धपरमेष्टीची स्थापना करावी व आठ पाकळया मध्यें सिद्धाच्या गुणांची स्थापना करावी. त्या कमळाच्या पुढें पीठावर जिनाची स्थापना करावी. कल्याणमालांचें आरोपण करून अधिवासन क्रिया करावी. मुखावरील वस्त्र काढून अर्घ्य द्यावें. श्री जिनाच्या ठिकाणीं सम्यक्त्वादिक आठ गुणांचें आरोपण करावें व पूजन करावें तदनतर पांढऱ्या फुलांनीं सातवेळां पीठिकामंत्राच्या द्वारें आराधन करावें. व त्याच मत्रांनी गार्हपत्याग्नीमध्यें अन्नाहुति द्यावी. तदनतर स्तुति करून माळा, पुष्प, चंदन यांनीं निर्वाणक्रिया करावी.

'अक्षताद्यैरिति' या पद्याचें स्पष्टीकरणः—अक्षता वगैरे पदार्थांनी जिनाची पूजा करून ते भक्तलोकांनीं आपल्या मस्तकांवर धारण करावेत. पूर्वोक्त विधीनें पवित्र पाणी आणून त्यानें १००८ कुंभ भरावें व जिनाचा अवभृथ नांवाचा अभिषेक करावा व एकादशमह हा विधि करावा. या प्रमाणें अभिषेक झाल्यावर

भूतैरष्टसहस्रेण कुंभैरवभृथाह्वयम् ॥
अभिषेकं प्रभोः कुर्यादेकादशविधं महम् ॥ ८ ॥
अभिषेकक्रिया कृत्वा समभ्यर्च्य श्रुतं गुरुम् ॥
गन्धोदकभृतं यष्ट्रे कुंभं दद्यान्मुदाशिषा ॥ ९ ॥
शेषां च सर्वभव्येभ्यो दद्यात्सागुर्दिनाशिषा ॥
यष्टा सपूजयेत्संघं यथाशक्ति यथोचितम् ॥ १० ॥
अथावरोह्य तद्रात्रौ प्रासादे स्थापयेद्ध्वजम् ॥
पूर्ववत्तेन भात्येष सर्वेषां तच्छुभाय च ॥ ११ ॥
विसर्जनं निर्जराणामध्यात्मध्यासनं विभोः ॥
शांतिधारां ततः शांतिबलिकर्मक्षमापणं ॥ १२ ॥
गमनाप्रच्छनं पश्चात्कृतकर्मफलार्थिनाम् ॥

---

शास्त्र व गुरु यांची पूजा करावी व प्रतिष्ठाकाराला आनंदानें आशीर्वादासह गंधोदकाचा कुंभ द्यावा व पूर्वोक्त आशीर्वादासह सर्व भव्यांना शेषा द्यावी. त्यावेळीं प्रतिष्ठाकारानें सर्व संघाचा यथाशक्ति व यथायोग्य आदर करावा. तदनंतर त्या दिवसाच्या रात्रीं जिनमंदिरावर ध्वजारोपण करावें तो ध्वज त्या जिनमंदिराच्या सहवासामुळें फार शोभतो आणि सर्वांच्या कल्याणास कारण होतो. या शिवाय देवांचें विसर्जन, जिनप्रभूचें आत्म्यामध्यें विराजमान करणें, शांतिधारा, शांतिबलि, क्षमापण, गमनाप्रच्छन व जें पूजन केलें त्याचें भगवंताजवळ फळ मागणें व आशीर्वाद देणें हे विधि करावे आणि गुरुसमक्ष दीक्षामोचन करावें अर्थात् प्रतिष्ठाकार्य-

आशीर्दानविधिं दीक्षामोचनं गुरुसाक्षिकम ॥ १३ ॥
शांतिभक्तिं च कृत्वेन्द्रः प्रतिष्ठां तां समापयेत ॥
निष्ठापितप्रतिष्ठं तं यष्टेन्द्रं बहु मानयेत ॥ १४ ॥
सत्कृत्य शक्त्या भव्यास्त सर्वे यांतु यथायथम् ॥
प्रतिष्ठादिवसे कुर्यादुत्सवं मासि मासि च ॥ १५ ॥
आवर्षादत ऊर्ध्वं तु वर्षे वर्षे च शक्तितः ॥
उत्सवानां विधिर्भेदोप्युत्तरत्राभिधास्यते ॥ १६ ॥
इति जिनप्रतिष्ठाया विधिः सर्वो निरूपितः ॥
अनुक्तमन्यतो ग्राह्यमुचितं लक्षणादिकम् ॥ १७ ॥

---

संपेपर्यंत इद्रानें व यजमानानें एकवेळा जेवणें. ब्रह्मचर्य धारण करणे इत्यादि नियम घेतलेले असतात त्याचा हा सर्व विधि सपल्यावर त्याग करावा. यानतर शांतिभक्ति करून प्रतिष्ठाविधि समाप्त करावा. तदनंतर प्रतिष्ठाकारानें इंद्राचा फार आदर सत्कार करावा व सर्व भव्यानीं शक्तिनें इद्राचा आदर करावा व आप आपल्या ठिकाणी जावें. तदनतर दरमहिन्यात प्रतिष्ठेच्या दिवशी उत्सव करावा. असा प्रकार एक वर्ष पर्यंत करावा तदनंतर यथाशक्ति दरवर्षी करावा. उत्सवाचे प्रकार पुष्कळ आहेत. ते आम्ही पुढें सागू. याप्रमाणें प्रतिष्ठेचा विस्तारयुक्त सर्व विधि आह्मी सांगितला. आम्ही प्रत्यकाचें लक्षणादिक येथें सांगितलें नाहीं. तें अन्य ग्रथापासून ग्रहण करावें.

तद्यथा — प्रतिष्ठादिवसाच्चतुर्थेऽहनि प्रत्युषसि पूर्ववद्यागमंडलमारभ्य तत्पुरस्ताद्वावितोद्देशे प्रागुक्तविधिना भूमिशोधनं दर्भन्यासं भूम्यर्चनं च कृत्वा वेद्यां मंडलमालिख्यार्चितामित्यनेन पद्येन चूर्णस्थापनं कृत्वाष्टदलकमलं विरचय्य कर्णिकायां । ॐ ऱ्हीं णमो सिद्धाणं स्वाहा । इति विलिख्य, पूर्वादिषु दलेषु प्रादक्षिण्येन ॐ ऱ्हीं सिद्धसम्यक्त्वगुणाय स्वाहा। ॐ ऱ्हीं सिद्धज्ञानगुणाय स्वाहा । ओम् ऱ्हीं सिद्धदर्शनगुणाय स्वाहा । ओम् ऱ्हीं सिद्धवीर्यगुणाय स्वाहा । ओम् ऱ्हीं सिद्धसूक्ष्मत्वगुणाय स्वाहा । ओं ऱ्हीं सिद्धावगाहनगुणाय स्वाहा । ओं ऱ्हीं सिद्धागुरुलघुगुणाय स्वाहा । ओम् ऱ्हीं सिद्धाव्याबाधगुणाय स्वाहा । इत्यष्टौ मंत्रान्विलिखेत् । इति लेखनविधानम् ॥

देवस्य देवेंद्रकृतोत्सवस्य सम्प्राप्तकल्याणचतुष्टयस्य ॥
निर्वाणकल्याणचिकीर्षयाहमग्रेऽस्य पुष्पांजलिमुत्क्षिपामि ॥
पुष्पांजलिः । ओम् स्वस्ति २ जीव २ इत्यादि पुष्पांजलिः ॥ १ ॥

' तद्यथेति ' प्रतिष्ठादिवसापासून चौथे दिवशीं प्रातःकाळीं पूर्वप्रमाणें यागमंडलास आरंभून त्याच्या पुढें योग्य स्थानीं पूर्वोक्त विधीनें भूमिशोधन, दर्भन्यास व भूम्यर्चन हे विधि करून ' वेद्यां मंडल ' ह्या पद्यानें चूर्ण स्थापन करून आठ पाकळ्यांचें कमळ काढावें. कर्णिकेमध्यें ' ॐ ह्रीं णमो सिद्धाणं ' हा मंत्र लिहून पाकळ्यामध्यें उजवेबाजूनें सिद्धाचे आठ गुण लिहावेत तदनंतर ' देवस्येति ' हा श्लोक म्हणून देवेंद्रानें ज्याची चार कल्याणिकें केलीं त्या जिनाचा आतां मोक्षकल्याणविधि मी करितो म्हणून त्या कमळापुढें पुष्पांजलि क्षेपण करावी. ' बाह्याभ्यंतरेति ' हा श्लोक व ' ॐ ह्रीं अत्रेप ' हा मंत्र म्हणून सिद्धांचे आव्हान, स्थापन आणि सान्निधीकरण करावें. व ' स्वच्छैस्तीर्थेति ' हा श्लोक म्हणून अष्टद्रव्यांनीं सिद्धांची पूजा करावी.

बाह्याभ्यंतरहेतुजातसुदृशः पूर्वश्रुतैरादिमा—
च्छुक्लध्यानयुगाद्विजित्य दुरितं लब्ध्वा सयोगिश्रियम् ॥
प्राप्यायोगिपदं परेण सकलं निर्जित्य कर्मोत्करं
शुक्लध्यानयुगेन सिद्धसुगुणान्सिद्धान्समाराधये ॥

ओं ह्रीं अशेषभोग्यद्रव्यकर्मनिरपेक्षस्वात्मोपादानमात्रसंजातसातिशयसकलात्मप्रदेशनित्यव्यापकस्य । सर्वदा सर्वबाधावृद्धिक्षयप्रतिपक्षदुःखोदयमानोपमानरिक्तस्य सकलचक्रिकुरुभवार्यफणींद्रसुरेंद्राहमिंद्रात्रिकालसंभावितसुखानंतगुणितक्षणपर्यायस्य । राम्यक्सकलशास्त्रविदृष्टांतसाधितसंसारनाटकावलोकनसंभावितसर्वकालशाश्वनपरमोत्कृष्टसुखस्यैकानिवासानाम् ॥ निरवशेषावरणविश्लेषविशेषाविष्कृतपरमानंतानंतनिर्भासजाज्वलत्त्रिकालत्रिषयलोकालोकवर्तिसर्वद्रव्यपर्यायक्रमकरणव्यवधानातिक्रमसाक्षात्करणदक्षाक्षूणकेवलाख्यज्योतिःप्रभुनस्वाभाविकानंतगुणविशेषविभूषितानाम् । नैगमनयाधिरूढतपोनयसंयमचारित्रज्ञानदर्शनसिद्धप्रसिद्धव्यवहारणां । सकललोकैकमंगललोकोत्तमशरणभूतानां सप्ततिसमेतशतकभूमिभुजनमस्कृतानां भगवत्सिद्धपरमेष्ठिनामष्टतयीमिष्टिं करोमि स्वाहा । ओं ह्रीं सिद्धपरमेष्ठिन् अत्र एहि २ संवौषट् । ओं ह्रीं सिद्ध अत्र तिष्ठ २ ठठ । ओं ह्रीं

---

'बाह्येति' बाह्य व आभ्यंतरकारणांनी सम्यग्दर्शनप्राप्ति झाल्यावर श्रुतज्ञानाच्या बलानें व शुक्ल ध्यानाच्या सामर्थ्यानें केवलज्ञानप्राप्ति करून घेऊन जे कर्म विनाश करून सिद्ध झाले त्यांना मी पूजितो. संपूर्ण कर्मनाशानें सिद्धात्म्याचे प्रदेश शुद्ध होतात त्यांना अनंत सुख प्राप्त होतें. सर्व चक्रवर्ती, उत्तमभोगभूमिज, देवेंद्र, अहमिंद्र यांना जें सुख होतें त्याच्या अनंतपटीनें अधिक सिद्ध

सिद्ध मम सन्निहितो भव २ वषट् आव्हानादिमंत्रः । स्वच्छैस्तीर्थैः श्रीसिद्धनाथान्यजे । ओं ऱ्हीं सिद्धपरमेष्ठिनो जलं । एवं गंधादि ॥

अथ प्रत्येकपूजा ।

पूर्वदलाभ्यतरे ॥

जानाति बोधो यदनुग्रेहण द्रव्याणि सर्वाणि सपर्ययाणि ॥
दुराग्रहत्यक्तनिजात्मरूपं तं सिद्धसम्यक्त्वगुणं यजामि ॥

ओं ऱ्हीं सिद्धसम्यक्त्वगुण एहि २ संवौषडित्यादि । ओं ऱ्हीं सिद्धसम्यक्त्वगुणाय जलमित्यादि ॥ १ ॥

आग्नेयदलाभ्यतरे ॥ जानाति नित्यं युगपत्स्वतोन्यसर्वार्थसामान्यविशेषपूर्वम् ॥
निर्बाधकं स्पष्टतरं च यस्तं सिद्धात्मविज्ञानगुणं यजामि ॥

---

जीवाना एका क्षणांत सुख प्राप्त होतें. त्यांचें ज्ञान अतींद्रिय, क्रमरहित नित्य व सर्व पदार्थांच्या अनंत पर्यायाना ग्रहण करणारें असें असतें. १७० कर्मभूमीमध्यें जीव सिद्ध होतात यास्तव त्याची मी आठ प्रकारें पूजा करितो.

सिद्धाच्या आठ गुणांची पूजा ।

१ 'पूर्वेति' पूर्व दिशेच्या कमलदलामध्यें सिद्धाच्या सम्यक्त्वगुणाचें आव्हान वगैरे करून अष्टद्रव्यांनीं त्याचें पूजन करावें. सम्यग्दर्शन गुणामुळें सिद्धांचा ज्ञानगुण सर्व पदार्थांचे गुण व पर्याय यांना जाणतो. या गुणामुळें आत्मस्वरूप दुराग्रहरहित होतें.

२ 'आग्नेयेति' आग्नेयदिशेच्या कमलदलामध्यें ज्ञानगुणाची पूजा करावी. या गुणाच्या द्वारें सिद्धजीव

ओं ह्रीं सिद्धात्मविज्ञानगुण एहि २ संवौषडित्यादि ॥ २ ॥

दक्षिणदलाभ्यंतरे ॥ स्वात्मस्थसामान्यविशेषसर्वं साक्षात्करोत्येव समं सदा यः ॥

सुनिश्चितासंभवबाधकं तं सिद्धात्मनो दृष्टिगुणं यजामि ॥

ओं ह्रीं सिद्धदर्शनगुण एहि २ संवौषडित्यादि ॥ ३ ॥

नैऋत्यदलाभ्यंतरे ॥ अनंतविज्ञानमनतदृष्टिं द्रव्येषु सर्वेषु च पर्ययेषु ॥

व्यापारयंतं हतसकरादिसिद्धात्मवीर्याख्यगुणं यजामि ॥

ओं ह्रीं सिद्धवीर्यगुण एहि २ संवौषडित्यादि ॥ ४ ॥

पश्चिमदलाभ्यंतरे ॥ अबाधकं मानमबाध्यमेव निर्णीतसर्वार्थमसंगसंगम् ॥

सर्वज्ञवेद्यं तदवाच्यमेव सिद्धात्मसूक्ष्माख्यगुणं यजामि ॥

ओं ह्रीं सिद्धसूक्ष्मगुण एहि २ संवौषडित्यादि ॥ ५ ॥

वायव्यदलाभ्यंतरे ॥ एकत्र सिद्धात्मानि चान्यसिद्धा वगांश्चरांबाधमनंतसंख्याः ॥

---

पदार्थांचें पूर्ण स्वरूप एकदम निर्भ्रान्त व स्पष्टरीतीन जाणतात.

३ 'दक्षिणेति' दक्षिणदिशेच्या कमलदलात सिद्ध दर्शन गुणाची पूजा करावी.

४ 'नैऋत्येति' नैऋत्य दिशेच्या कमलदलांत सिद्धाच्या वीर्य गुणाची पूजा करावी. हा वीर्य गुण अनंत विज्ञान व अनंत दर्शन या दोन गुणांना सर्व पदार्थांचें स्वरूप जाणण्यांत प्रवृत्त करितो.

५ 'पश्चिमेति' पश्चिम दिशेच्या कमलदलामध्ये सिद्धाच्या सूक्ष्म गुणाचें पूजन करावें.

६ 'वायव्येति' वायव्य दिशेत कमलदलामध्यें सिद्धाच्या अवगाहन गुणाचें पूजन करावें. या अवगाहन

यस्य प्रभावात्सुनयास्थितं तं सिद्धावगाहाख्यगुणं यजामि ॥ ५ ॥

ओं ऱ्हीं सिद्धावगाहगुण एहि २ संवौषडित्यादि ॥ ६ ॥

उत्तरदलाभ्यंतरे ॥ अधो न पातोस्ति यथा शिलादेर्न तूलवद्वायुकृतेरणं च ॥

सिद्धात्मनां तेन सुयुक्तिसिद्धं गुणं यजामोऽगुरुलघ्वभिख्यम् ॥

ओं ऱ्हीं सिद्धागुरुलघुगुण एहि २ संवौषडित्यादि ॥ ७ ॥

ईशानदलाभ्यंतरे च ॥ भवाग्निशांत्यै विहितश्रमो ऽव्याबाधात्मना यं परिणामसेति ॥

स्वात्मोत्थसौख्यैकनिबधनं तं सिद्धात्मनिर्बाधगुणं यजामि ॥

ओं ऱ्हीं सिद्धाव्याबाधगुण एहि २ संवौषडित्यादि ॥ ८ ॥

एवं सिद्धपरमेष्ठिनं तद्गुणानभ्यर्च्य शरच्चन्द्रमरीचिरोचिर्षोतश्चेतसि चिंतयन्ननादिसिद्धमंत्राभिमंत्रितकर्पूरहरिचंदनद्रवालुलितसुरभिशुभ्रपुष्पांजलिभिरेकविंशतिवारानधिवास्य पूर्णार्घ्यदानेन बहु मानयेत् ॥ अयमिहानादिसिद्धमंत्रः—

---

गुणाच्या सामर्थ्यानें एका सिद्धामध्यें अनंत सिद्ध राहतात

७ 'उत्तरेति' उत्तर दिशेच्या कमलदलामध्यें सिद्धांच्या अगुरुलघुगुणाचें पूजन करावें. ह्या गुणामुळें सिद्धजीवाचें खालीं पतन व वर गमनही होत नाहीं.

'ईशानेति' ईशान दिशेच्या कमलदलामध्यें अव्याबाधगुणाचें पूजन करावें. या गुणामुळें सिद्धजीव बाधा रहित होतात.

, एवमित्यादि या प्रमाणें शरत्कालच्या चंद्रकिरणाप्रमाणें सुंदर अशा सिद्ध परमेष्ठींचें व त्यांच्या गुणांचें पूजन करून व त्यांचें चिंतन करून अनादिसिद्ध मंत्रानें अभिमंत्रित झालेले आणि कापूर, चंदनगंध, यांनीं

ओं णमो सिद्धाणं, सिद्धा मंगलं, सिद्धा लोगुत्तमा, सिद्धे सरणं पव्वज्जामि । ऱ्हीं शांतिं कुरु २ स्वाहा ॥ इत्यनादिसिद्धमंत्र' ॥

इत्थं समभ्यर्चितसिद्धनाथसम्यक्त्वमुख्याश्च गुणास्तदीयाः ॥
सर्वार्चिताः सर्वजनार्चनीयाः स्वात्मो त्पत्त्यै मम सतु तेऽपी ॥

पूर्णार्घ्यं ॥ १ ॥ अथ तत्र वेद्युपरि पीठस्थापनम् ॥

वेद्या मूर्ध्नि निधाय पीठमु नं प्रक्षाल्य ती र्थांबुभिः ॥
प्रत्यग्रेण महाघनेन परित प्रोक्ष्य दर्भै रि ॥
अभ्यर्च्योपरि तस्य सिद्धनिकरं न्यास्यामि मताम र्चिताम् ॥
न्यस्याचामि समर्च्य समर्घि म्लत्रैः ममागधाये ॥

ओं ऱ्हीं र्हं क्ष्मं ठठ श्रीपीठस्थापनं करोमि स्वाहा । ओं ऱ्हां ऱ्हीं ऱ्हूं ऱ्हौं ऱ्हः नमोर्हते भगवते श्रीमते पवित्रतरजलेन पीठप्रक्षालनं करोमि स्वाहा । पीठप्रक्षालनम् ॥ ओं ऱ्हीं दर्पमथनाय नमः सकुसुमाक्षतदर्भस्थापनम् ॥ स्वच्छैस्तोय० पीठं समभ्यर्चये ॥ ओं ऱ्हीं सम्यग्दर्श

---

सुगंधित अशा शुभ्र पुष्पांजलीनें एकवीस वेळां आवाहन करून पूर्णार्घ्यदानानें सिद्धगुणांचा व सिद्ध परमेष्ठींचा बहुमान करावा. ओं णमो सिद्धाणं वगैरे सिद्धमंत्र आहे. या प्रमाणें मी सिद्ध व त्यांच्या गुणांची स्तुति पूजा केली आहे सिद्धांचे गुण सर्वजनपूजनीय आहेत. व ते गुण माझ्या आत्मप्राप्तीला कारण होवोत.

१ 'वेद्या' हा श्लोक ह्मणून वेदीवर पीठस्थापन करावें. त्यावेळीं 'ओं ऱ्हीं र्हं' इत्यादि हा मंत्र ह्मणावा 'ओं ऱ्हां ऱ्हीं' हा मंत्र ह्मणून पवित्र पाण्यानें ते धुवावें. 'ओं ऱ्हीं दर्पमथनाय नम' हा श्लोक ह्मणून

नज्ञानचारित्राय नमः स्वाहा ॥ पीठार्चनम् ॥ ओं ऱ्हीं श्रीं क्लीं ऐं हँ आहूता तिष्ठ २ ठठ स्वाहा ॥ प्रतिमास्थापनं ॥

आहूता इव मिमुक्षाक्तिवानितां मुक्तान्यसंगा ययुः ॥
तिष्ठन्त्यष्टमभूमिसौधशिखरे सानंतसौख्याः सदा ॥
साक्षात्कुर्वंत एन सर्वमानिशं मालोक ठेक सम ॥
तानद्धर्ध्वविशुद्धसिद्धानिकरानावाहनाद्यैर्यजे ॥

ओं ऱ्हीं हँ णमो सिद्धाणं सिद्धपरमेष्ठिन्नत्र एहि २ संवौषट् ॥
ओं ऱ्हीं तिष्ठ २ ठठ । ओं ऱ्हीं मम सन्निहितो भत्र भव वषट् ॥ २ ॥

अथ कल्याणपंचकारोपणम्

योत्र स्वर्गावतीर्णः सुरगिरिशिखरे दुग्धाद्रैः पयोभिः इत्यादि कल्याणमालारोपणाविधिं निर्वाणकल्याणस्थापनाय प्रतिमोपरि पुष्पांजलिं क्षितिपर्यंतं कुर्यात् ॥ १ ॥

---

पुष्पाक्षतासहित दर्भस्थापन करावे ' स्वच्छैस्तीर्थ ' हा श्लोक ह्मणून व ' ओं ऱ्हीं सम्यग्दर्शनेत्यादि ' हा मंत्र ह्मणून पीठाची पूजा करावी ' ओं ऱ्हीं श्रीं क्लीं ' हा मंत्र ह्मणून प्रतिमास्थापन करावें.

२ ' आहूता इवेति ' हा श्लोक ह्मणून व त्याचा मंत्र ह्मणून सिद्ध परमेष्ठीचें आव्हान, स्थापन, सन्निधीकरण हे विधि करावेत.

कल्याणपंचकारोपण.

१ ' योत्रेति ' हा श्लोक म्हणून निर्वाणकल्याणापर्यंत पांच कल्यणाचें आरोपण करण्याकरितां प्रतिमेवर पुष्पांजलि क्षेपण करावी,

अथाधिवासनाविधानम् ।

जिनमतमित्र सूक्ष्मामित्यादिरभ्युद्धराम्यर्घ्येननर्घ्यमस्य ॥ पूर्णार्घ्यपर्यन्तं विधिं कुर्यात् ॥ प्रागुक्तानादिसिद्धमंत्रेण सप्तवारान्प्रतिमा स्पृशन्नेवाभिमंत्रयेत् ॥ इत्याधिवासनम् ॥ २ ॥

घंटाटंकारवीणाक्वणितमुरजधांधांक्रियां काहलाच्छे
च्छेंकारोदारभेरीपटहधलधलंकारसंभूतघोषे ।
आकम्याशेपकाष्ठातटमथ झटिति प्रोच्छटत्युद्भटेऽभ्रं ॥
शिष्टाभीष्टार्हदिष्टयै जिनमुखपटमुद्घाटये मंत्रपूर्वम् ॥

ओं उसहाइवड्ढमाणाणं, पंचकल्लाणसंपण्णाण, महइमहावीरवड्ढमाणाणं सामीणं, सिज्झउ मे महइमहाविज्जा, अट्ठमहापाडिहेरसियाणं, सयलकलाधराणं, सज्जोजादरूवाणं, चउतीसातिसयविसेससंजुत्ताणं, बत्तीसदेविंदमणिमउडमत्थयमहिदाणं, सयललोयस्स संतिपुट्ठिबुद्धिकल्लाणआरोग्गकराणं बलदेववासुदेवचक्कहररिसिमुणिजदिअणगारोवगूढाणं, उहयलोयसुहफलयराणं, थुइसयसहस्सणिलयाणं, परापरपरमप्पाण, अणाइणिहणाणं बलिबाहुबलिसाहिदाणं, वीरे वीरे, ओं ह्रां क्षां सेणवीरे वड्ढमाणवीरे हंस जयंतवराइये वज्जासिलत्थंभ-

---

२ 'जिनमतेति' हा श्लोक म्हणून पूर्णार्घ्यापर्यंत अधिवासनविधि करावा हा विधि मागील अध्यायांत विस्ताराने लिहिला आहे तो पहावा. सात वेळा अनादिसिद्ध मंत्र म्हणून प्रतिमेला स्पर्श करावा.

३ 'घंटाटंकारेति' हा श्लोक म्हणून व 'ओं उसहाइ वड्ढमाणाणं हा मंत्र पूर्ण म्हणून प्रतिमेच्या मुखा

मयाणं, सदभव्वपइट्ठियाणं, । यत्थसण्णिहिदा मे भवंतु, मे भवंतु ठठ क्षक्ष स्वाहा ॥ मुख-वस्त्रोद्घाटनम् ॥ ३ ॥

वार्गंधतंडुलल्लतांतहवि:प्रदीपैर्धूपैः फलैः कनकपात्रगतैर्जिनाग्रे ॥
नंद्यादिवर्तदधिस्वस्तिकदर्भदूर्वासिद्धार्थकैश्च कृतमर्घ्यमिहोद्धराम: ॥ ४ ॥

ॐ अट्ठविहकम्मवियला सीदीभूदा णिरंजणा णिच्चा ॥
अठ्ठगुणा किदकिच्चा लोयग्गणिवासिणो सिद्धा ॥ ५ ॥
भूयासुरिति स्वाहा ॥ महोत्सवेन महार्घ्यमवतारयेत ॥

अथ गुणारोपणम् ॥

जानाति बोधो यदनुग्रहेण द्रव्याणि सर्वाणि सपर्ययाणि ॥
दुराग्रहत्यक्तनिजात्मरूपं सिद्धत्र सम्यक्त्वगुणं न्यसामि ॥१॥

---

वरील वस्त्र वाद्यांचा ध्वनि होत असतां काढावें.

४ 'वार्गंधेति' हा श्लोक म्हणून अर्घ्य द्यावा

५ ' ॐ अठ्ठविहेति ' हा श्लोक म्हणून महार्घ्य द्यावा. सिद्ध हे आठ कर्मांनीं रहित आहेत ते शांत झाले आहेत, भावकर्ममलहीन आहेत, नित्य आहेत, आठ गुणांनीं युक्त, कृतकृत्य व लोकाग्री विराजमान झालेले आहेत.

सिद्धामध्यें गुणारोपण विधि.

१ 'जानातीति' हा श्लोक व मंत्र म्हणून प्रतिमेवर पुष्पांजलि क्षेपण करावी आणि सिद्धाच्या ठिकाणी

ओं ह्रीं परमावगाढसम्यक्त्वगुणभूषिताय नमः। इति प्रतिमोपरि पुष्पांजलिं क्षिप्त्वा तद्गुणमोरापयेदेवमुत्तरत्रापि विधेयम् ॥ १ ॥

जानाति नित्य युगपत्स्वतोन्यत्सर्वार्थसामान्यविशेषसर्वम् ॥
निर्बाधकं स्पष्टतरं च यस्तं सिद्धेत्र विज्ञानगुणं न्यसामि ॥ २ ॥

ओं ह्रीं अनन्तज्ञानभूषिताय नमः ॥

स्वात्मस्थसामान्यविशेषसर्थं साक्षात्करोत्येव समं सदा यः ॥
सुनिश्चितासंभवबाधकं तं सिद्धेत्र दृष्ट्याख्यगुणं न्यमामि ॥ ३ ॥

ओं ह्रीं अनन्तदर्शनभूषिताय नमः ॥

अनंतविज्ञानमनंतदृष्टि द्रव्येषु सर्वेपु च पर्ययेपु ॥
व्यापारयंत हृनमंकरादिं सिद्धेत्र वीर्याख्यगुणं न्यमामि ॥४॥

ओं ह्रीं वीर्यगुणभूषिताय नमः ॥ ४ ॥

अबाधकं मानमबाध्यमेव निष्पीतमर्वार्थमनगमंगम् ॥

---

सम्यक्त्वगुणाचें आरोपण करावें यात्र क्रमान बाकीच्याही गुणाचें आरोपण करावें

२ 'जानाति नित्यमिति ' हा श्लोक व त्याचा मंत्र म्हणून पुष्पांजलि पूर्वक अनंतज्ञान गुणाचें आरोपण करावें

३ 'स्वात्मस्थेति' हा श्लोक व त्याचा मंत्र म्हणून अनंतदर्शन गुणाचें आरोपण करावे.

४ 'अनंतेति' हा श्लोक व त्याचा मंत्र म्हणून वीर्यगुणाचें आरोपण सिद्धाचें ठिकाणी करावें.

सर्वज्ञवेद्य तदवाच्यमेव सिद्धेत्र सूक्ष्माख्यगुणं न्यसामि ॥५॥

ओं ऱ्हीं सूक्ष्मगुणभूषिताय नमः ॥ ५ ॥

एकत्र सिद्धात्मनि चान्यासिद्धा वमत्यसबाधमनंतसंख्याः ॥

यस्य प्रभावात्सुनयास्थितं तं सिद्धेवगाहाख्यगुणं न्यसामि ॥ ६ ॥

ओं ऱ्हीं अवगाहनगुणभूषिताय नमः ॥६॥

अधोनुपतोऽस्ति यथा शिलादेर्न तूलवद्वायुकृतेरणं च ॥

सिद्धात्मना तेन सुयुक्तिसिद्धं गुणं न्यसामोऽगुरुलघ्वभिख्यम् ॥ ७ ॥

ओं ऱ्हीं अगुरुलघुगुणभूषिताय नमः ॥७॥

भवाग्निशान्त्यै विहितश्रमोऽव्याबाधात्मना यं परिणाममेति ॥

स्वात्मोत्थसौख्यैकनिबंधनं तं सिद्धेत्र निर्बाधगुणं न्यसामि ॥८॥

ओं ऱ्हीं अव्याबाधगुणभूषिताय नमः ॥८॥

इति गुणारोपणम् ॥

---

५ 'अबाधकेति' हा श्लोक व मंत्र म्हणून सूक्ष्मगुणाचें सिद्धांचे ठिकाणी आरोपण करावें.

६ 'एकत्रेति' हा श्लोक व त्याचा मंत्र म्हणून अवगाहन गुणाचें आरोपण करावें.

७ 'अधोन्वति' हा श्लोक व मंत्र म्हणून अगुरुलघु गुणाचें आरोपण करावें.

८ 'भवाग्नीति' हा श्लोक व त्याचा मंत्र म्हणून अव्याबाध गुणाचें सिद्धामध्यें आरोपण करावें. याप्रमाणें गुणारोपण विधि आहे.

अथ पूजा ।

गंगादितित्थप्पहवप्पएहिं सगंधदा णिम्मलपएहिं ॥
अच्चेमि णिच्चं परमट्ठसिद्धे मव्वट्ठसंपादयसव्वसिद्धे ॥

ओं ऱ्हीं श्रीं नमः सिद्धाधिपतये जलम ॥ १ ॥
गंधेहिं धाणाण सुहप्पएहिं समच्चयाणंपि सुहप्पएहिं ॥ अच्चेमि ॥ गंधं ॥ २ ॥
पेंतछोणीसयकारणेहिं वरक्खएहिं सियकारणेहिं ॥ अच्चेमि ॥ अक्षतं ॥ ३ ॥
पुप्फेहि दिव्वेहिं सुवण्णएहिं कव्वे कऊसेहिं सुवण्णएहिं ॥ अच्चेमि ॥ पुष्पं ॥ ४ ॥
चब्भेहि णाणासुरसप्पएहिं भव्वाण णाणाइरसप्पएहिं ॥ अच्चेमि ॥ चरुं ॥ ५ ॥

---

अथ सिद्धपूजा ।

'गंगेति' हा श्लोक म्हणून सिद्धपरमेष्टींना जल अर्पण करावे. सिद्ध परमेष्ठी संपूर्ण उत्कृष्ट पदार्थ देणारे आहेत. त्यांची मी गंगादि नद्यांच्या सुगंध निर्मल पाण्याने पूजा करितो.

२ 'गंधेहि' हा श्लोक म्हणून गंधाने सिद्धाची पूजा करावी. नाकास अतिशय सुख देणाऱ्या व पूजकास पुण्य प्राप्तिस कारण अशा गंधानें मी सिद्धांची पूजा करितो.

३ 'पेरंतेति' शेवटची पृथ्वी जो मोक्ष त्याची प्राप्ति करून देण्यास कारण अशा उत्कृष्ट अक्षतांनी मी सिद्ध परमेष्टींची पूजा करितो

४ 'पुप्फेहि' दिव्य व उत्तम वर्णाच्या पुष्पांनीं मी सिद्धाची पूजा करितो.

५ 'चब्भेहीति' नाना सुरस पदार्थांनीं बनविलेल्या व भव्यांना अनेक तऱ्हेचें ऐश्वर्य देणाऱ्या पक्वान्नांनी मी सिद्धांची पूजा करितो.

दद्दिव्वमाणप्पहदीवएहिं संऊयआणं सिरिदीवएहिं ॥ अच्चेमि ॥ दीपं ॥ ६ ॥

कालाअरुं भूयसुहूवएहिं । जीयाण पावाण सुहूवएहिं ॥ अच्चेमि ॥ धूपं ॥ ७ ॥

अणग्घभूएहिं फलव्वएहिं भव्वस्स संदिण्णफलव्वएहिं ॥ अच्चेमि ॥ फलं ॥ ८ ॥

णयेण णाणेण य दंसणेण तवेग उट्टेग य मंजमेण ॥

सिद्धे तिकालेसु विसुद्धबुद्धे समग्घयामो सयलेवि सिद्धे ॥

ओं न्हीं श्रीं नमः सिद्धाधिपतये जलादियज्ञांगदूर्वादर्भदधिसिद्धार्थादिमंगलद्रव्यविनिर्मितमहार्घ्यंवतारयेत ॥ अर्घ्यं ॥ ९ ॥

अथ सप्तविधपीठिकामंत्रैः सिद्धाराधनम् ॥

सिद्धार्चायां ये क्रियामंत्रसंज्ञा जैने वेदे साधनाद्याश्च मंत्राः ॥

---

६ 'देदिव्वेति' हा श्लोक म्हणून ज्यांची प्रभा उज्ज्वल आहे व जे पूजकांना लक्ष्मी देतात अशा दीपकांनी मी सिद्धाची पूजा करितो

७ 'कालेति' जो जीवांच्या पापाचा नाश करितो अशा कालागुरु धुपानें मी सिद्धांची पूजा करितो.

८ 'अणग्घेति' भव्यांना मोक्ष फल देणाऱ्या अशा अमूल्य फलांनी मी सिद्धाची पूजा करितो.

९ 'णयेणेति' जे नय, ज्ञान, संयम, तप यांनी युक्त आहेत त्या निर्मल सिद्धांची मी अर्घ्यद्वारें पूजा करितो असें म्हणून जल दर्भ, दूर्वा दही, पांढऱ्या मोहऱ्या, वगैरे मंगलद्रव्यांनीं अर्घ्य तयार करूनतें सिद्धपरमेष्ठीवरून उतरावें

१ 'सिद्धेति' जैन शास्त्रांमध्यें सिद्धांच्या पूजनसमयीं जे क्रियामंत्र व साधन मंत्र आणि गार्हपत्य, दक्षिण

त्रेताहोमे होममंत्रास्तदैतैः जपैः पुष्पै सिद्धमाराधयामि ॥ १ ॥

ओं सत्यजाताय नमः इत्यादिसप्तविधपीठिकामंत्रैरभिमंत्रितैः कर्पूरहारिचंदनद्रवालुलित-सुरभिशुभ्रकुसुमैः सिद्धपरमेष्ठिनमाराधयेत् ॥

विविधदुरितशुद्धान्सर्वतत्त्वार्थसिद्धान् ।
परमसुखसमृद्धान्युक्तिशास्त्राविरुद्धान् ।
बहुविधगुणवृद्धान्सर्वलोकप्रसिद्धान् ॥
प्रमितसुनयसिद्धानर्घये सर्वसिद्धान् ॥ पूर्णार्घ्यः ॥ २ ॥

अथ तदग्रोपकल्पितचतुरस्रकुंडे गार्हपत्याग्नौ होमविधानम् ॥ तद्यथा—प्रागुक्तविधिना आ-सनस्थापनादिचतुरस्रकुंडार्चनविधिं विधाय, क्षिपामि कुंडस्येत्यादिना परिधिपरिस्तारणकल्पनं आम्नाये-त्यादिना गार्हपत्याग्नेः स्थापनं सधुक्षणं संनिधीकरणैकसमिधाहुत्यर्चनानि परिसमाप्य होमविधौ प्रागुक्ताज्याहुतिविधिं विस्तरेण विदध्यात ॥ इति होमविधानम ॥

---

व आहवनीय या तीन होमाने जे मंत्र सांगितले आहेत त्या सर्व मंत्रांनी शुभ्र पुष्पांच्या द्वारे जप करून मी सिद्धांचें आराधन करितो.

२ ' विविधेति ' हा श्लोक ह्मणून पापरहित, सर्व तत्वज्ञ, पूर्णसुखी, अनंतगुणयुक्त, अशा सर्व सिद्धांना अर्घ्य समर्पण करावा. तदनंतर सिद्ध प्रतिमेच्या पुढें चौकोनी कुंडामध्यें गार्हपत्य अग्नीमध्यें होम करावा. तो याप्रमाणें- पूर्वोक्तविधीनें आसनस्थापन वगैरे विधि व चौकोनी कुंडाचें पूजन हा विधि करून ' क्षिपामि कुंडस्य ' वगैरे श्लोक ह्मणून समिधा होमामध्यें पसराव्या व आम्नायेत्यादि श्लोक ह्मणून गार्हपत्याग्नीचें स्थापन, सधुक्षण, संनि-धीकारण वगैरे करून एक समिधाहुति द्यावी. तदनंतर पूर्वी सांगितलेला आज्याहुतिविधि विस्ताराने करावा.

सिद्धश्रुतचरित्रार्षिशिवशांतीशभक्तिभिः ॥
भक्त्या निर्वाणकल्याणक्रियां कुर्वंतु याजकाः ॥ १ ॥

इति निर्वाणकल्याणक्रियां विधिवद्विधाय सर्वोऽपि संघस्ततो बहुतरमाल्यचंदनाक्षतराशिभिर्जिनमभ्यर्च्य तन्माल्यादिकमुत्सवेन धृत्वा प्रागुक्तविधिना तीर्थोदकमानीय । तज्जलपरिपूरिताष्टोत्तरशतकलशैर्वक्ष्यमाणमहाभिषेकविधिना महाभिषेकं विदध्यात् ॥

अथाभिषेकक्रियाप्रयोगविधानम् ॥

अथ चलजिनेंद्रप्रतिबिंबप्रतिष्ठाचतुर्थदिनस्नपनाक्रिया । तत्रेयं कृत्यप्रतिज्ञा भगवन्नमोस्तु ते एषोहं चलजिनेंद्रप्रतिबिंबप्रतिष्ठाचतुर्थदिनस्नपनाक्रियां कुर्यामिति । शेषं समानम् ॥

अथ चलजिनेंद्रप्रतिबिंबप्रतिष्ठाचतुर्थदिनस्नपनाक्रियायां पूर्वाचार्यानुक्रमेण सकलकर्मक्षयार्थं भावपूजास्तववंदनासमेतं सिद्धभक्तिकायोत्सर्गं करोम्यहम् ॥ इत्युच्चार्य सामायिकदंडकचतुर्विंशति

---

१ 'सिद्धेति'-सिद्धभक्ति श्रुतभक्ति, चारित्रभक्ति, ऋषिभक्ति, निर्वाणभक्ति, व शांतिभक्ति या भक्ति करून याजकांनीं निर्वाणकल्याण क्रिया करावी. याप्रमाणें निर्वाणकल्याण क्रिया करून सर्व सर्वांनीं पुष्कळ फुलें, चंदन, अक्षत यांनीं जिनाची पूजा करावी. पुष्पें, चंदन अक्षतादिक आदरानें मस्तकावर धारण करून पूर्वोक्त विधीनें तीर्थोदक आणून १०८ कलशांनीं पुढें सांगितल्याप्रमाणें महाभिषेक विधि करावा.

अभिषेकक्रियाविधि

'अथेति' जिनेंद्राच्या चल प्रतिबिंबाची प्रतिष्ठा झाल्यावर चौथ्या दिवशीं अभिषेकक्रिया करतेवेळीं. हे भगवन् मी आपल्याला नमन करितो व उपर्युक्त कृत्य करितो अशी प्रतिज्ञा करावी.

'अथेति, चलबिंबप्रतिष्ठेपासून चौथ्या दिवशीं पूर्वाचार्यानुक्रमानें सर्वकर्मक्षयार्थ भावपूजास्तववंदना-

